श्री.

# सुभाषित.

कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर

यांनीं

आपल्या निबंधमाला मासिक पुस्तकाच्या
नवव्यापर्यंत अंकांत दिलेलें सर्व एक-
त्र करून त्यांचें हें पुस्तक

चित्रशाळा छापखान्यांत
छापून प्रसिद्ध केलें.

आक्टोबर १८८२

किंमत चौदा आणे.

श्री.

# सुभाषित.

सुभाषितेन गीतेन युवतीनां च लीलया ॥
यस्य न द्रवते चित्तं स वै मुक्तोऽथवा पशुः १

सुभाषित, गायन, आणि तरुण स्त्रियांच्या लीला, या तिहींनं ज्याचें मन त-न होऊन जात नाहीं, तो एक जीवन्मुक्त योगी म्हणावा किंवा पशु म्हणावा!”

गीर्वाणवाणीषु विशिष्टबुद्धिस्तथापि भाषांतरलोलुपोऽहं ॥
यथा सुराणां सुधयां च सत्यां स्वर्गांगनानामधरासवे रुचिः २

“संस्कृत भाषेकडेच जरी माझा मोठा ओढा आहे, तरी इतर भाषांविषयींही-ण मला उत्कंठा आहे; जसें स्वर्गींच्या देवांस प्राशन करण्यास चंद्राचें अमृत असतां-ना अप्सरांच्या अधरांचें मद्यही त्यांस आवडतें!”

सायं नातपभृद्रति वासरमणिश्चंद्रो न चंडद्युतिः ।
दावाग्निः कथमंबरे किमशनिः स्वच्छांतरीक्षे स्थितः ॥
हंतेदं निरगाग्नि पांथरमणीप्राणानिलाशाशया ।
धावद्दारविभावरीविषधरीभोगस्य भीमो मणिः ३

कालिदास — शृंगारमाष्टक.

जिचा नवरा प्रवासास गेला आहे अशी कोणी विरहिणी नुकत्याच उगवले-ल्या पूर्णिमेच्या चंद्रास बघून उन्मादावस्थेंत त्यावर उत्प्रेक्षा करते——

“आतां संध्याकाळ झाला आहे, तेव्हां हा खचीत सूर्य उगवलेला नव्हे;—बरें, जर चंद्र म्हणावा, तर यापासून संताप होतो हें कसें? — रानांतील वणवा म्हणावा, तर तो आकाशांत कां? — अशनि* म्हणावा, तर हा स्वच्छ निरभ्र आकाशांत आ-हे! तेव्हां वरील कल्पना कोणतीच वसत नाहीं.— पण हां समजलें! पांथांच्या स्त्रि-यांच्या प्राणरूप वायूनें —— या आशेनें रात्रिरूप घोर सर्पिणी धांवत

* 'अशनि' म्हणजे 'वज्र'

…रा शब्द स्त्रीलिंग असल्यामुळें तो वर घालतां आला नाहीं.

तें नमन नाहीं!— जे तिला आवडतात ते तिला पत्करीत नाहींत; व ज्यांस ती आवडते ते तिला नकोत!”

म्हणजे जे थोर पुरुष स्तुतीस वास्तविक पात्र असतात त्यांस आपली प्रशंसा कोणीं केलेली आवडत नाहीं; पण ज्यांगीं कांहींच योग्यता नसूनही जे आपली शेखी चोहींकडे मिरवूं पाहतात त्यांची कोणीच स्तुती करीत नाहींत. उलट त्यांचा उपहास मात्र होत असतो:— थोडक्यांत खुबीदार अर्थ लिहिण्याची आचार्यांची शर्थ आहे!

जडास्तपोभिः शमयंति देहं बुधा मनः सर्वविकारहेतुं ॥
श्वा मुक्तमस्त्रं दशतीह कोपात् मोक्तारमुद्दिश्य हिनस्ति सिंहः ॥७

“ जे अज्ञान असतात ते तपश्चरण करून देहाचें शमन करतात; पण ज्ञाते पुरुष सर्व विकारांचें मूळ जें मन त्याचेंच दमन करतात. याला दृष्टांत. कुत्र्यावर जर बाण टाकला तर तो त्या बाणासच रागानें चावूं लागेल; पण सिंह बाण सोडणारावर झेंप घालून त्यास ठार करून टाकील.” सारांश, कर्ममार्ग गौण; ज्ञानमार्ग श्रेष्ठ होय!

वाङ्माधुर्यान्नान्यदस्ति प्रियत्वं वाक्पारुष्याच्चापकारोऽपि नष्टः ॥
किं तद्द्रव्यं कोकिलेनोपनीतं को वा लोके गर्दभस्यापराधः ॥८॥

“ मधुर भाषणाप्रमाणें लोकांस वश करणारें कांहीं नाहीं; व कर्कश भाषणानें केलेल्या उपकारासही कोणी विचारीत नाहीं. पहा बरें, कोकिल कोणास काय द्रव्य आणून देतो? व गाढव कोणास काय उपद्रव करतें?” पण पहिला केवळ गोड वाणीनें सर्वांस प्रिय होऊन राहिला आहे; व दुसरा सार्‍या जन्मभर लोकहितार्थ खपत असतांही एका हाड ओरडण्यानें सर्वांच्या तिरस्कारास पात्र झाला आहे!

खलसख्यं प्राङ्मधुरं वयोऽन्तराले निदाघदिनमंते ॥
एकाऽऽदिमध्यपरिणतिरमणीया साधुजनमैत्री ॥९॥

“ दुष्टांची मैत्री पहिल्यानें गोड वाटते; मनुष्याचें आयुष्य मध्यकाळीं, म्हणजे तारुण्यांत; आणि उन्हाळ्याचा दिवस शेवटीं, म्हणजे संध्याकाळीं. पण आरंभीं, मध्यें, व शेवटीं अशा तिन्हीकाळीं रमणीय अशी एक सज्जनांची मैत्री मात्र!”

ऊर्णा नैव बिभर्ति नैव विषयो दोहस्य वाहस्य वा ।

तृप्तिर्नास्य महोदरस्य बहुभिर्ग्रासैः प्रयासैरपि ॥
हा कष्टं कथमस्य पुच्छशिखरं गोणी समारोप्यते ।
को गृण्हाति कपर्दकैरलमहो ग्राम्यैर्गजो हास्यते १०

गांवढळ लोकांस हत्ती कोठून पाहीत असावा? त्यांनीं तो नव्यानेंच पाहिला असतां ते त्याचा उपहास करतात:—

"अहो! काय हो विलक्षण पशु हा! याच्यापासून लोकर मिळावयाची नाहीं; दूधही मिळावयाचें नाहीं; हा बसावयाच्याही उपयोगी नाहीं! याचें केवढें हें पोट! गवत कोठा पांचे दहा गांवचें ओंगही याला पुरेसें होणार नाहींत! — असो हें ही राहूं द्या; ओझ्याला उपयोग म्हणून घेतला म्हणावें तरी या धुडाच्या पाठीवर गोणी ही कोणी चढवावी! — छे! याला घेऊन काय करा? कोणी दोन कवड्यांलाही याला पुसणार नाहीं!!"

कस्त्वं लोहितलोचनास्यचरणो हंसः कुतो मानसात् ।
किं तत्रास्ति सुवर्णपंकजवनान्यम्भः सुधासन्निभम् ॥
रत्नानां निचयाः प्रवाललतिका वैडूर्यरोहः क्वचित् ।
शंबूका नहि संति नेति च बकैराकर्ण्य हीहीकृतम् ॥११॥

एका डबक्याशीं बगळ्यांची मंडळी बसली असतां तेथें एक हंस आला; त्यास ते हालहवाल विचारतात.—

"अरे! तुझे डोळे, तोंड व पाय तिन्ही लाल आहेत असा तूं कोण पक्षी? हंस उत्तर देतो—'मी हंस.' 'कोठून आलास?'—'मानस सरोवरापासून.' 'तेथें काय काय असतें?'—'कोठें सोन्याचीं कमळें, कोठें अमृतासारखें गोड पाणी, कोठें रत्नांचे समुदाय, कोठें पोंवळ्यांच्या वेली, व कोठें पाचेचे अंकुर, असे जागोजाग आहेत!' 'बरें, पण किड्यांच्या शिंपा आहेत काय?'—'नाहींत.' 'नाहींत ना! मग आहे काय तर तेथें?' असें म्हणून सर्वांनीं हा—हा—हा—करून त्याचा उपहास केला!"

पातस्तात समस्त याचकविधौ वैरायसे सर्वथा ।
यद्वा विक्रमशालिवाहनमहीभृन्मुंजभोजादयः ॥
भस्मंतं चिरजीविनो न विहिता ये विश्वजीवातवो ।

मार्कंडेयध्रुवलोमशप्रमुनयः सृष्टाः प्रभूतायुषः ॥१२॥

कोणी याचक ब्रह्मदेवास म्हणतो—

"बापा ब्रह्मदेवा! आमच्या याचकमंडळाशीं तुझें मोठें वैर आहेसें दिसतें! कां नल, विक्रम, शालिवाहन, मुंज, भोज इत्यादि जे जगाचा भार वाहणारे उदार राजे त्यांस चिरंजीव करण्याचें टाकून मार्कंडेय, ध्रुव, लोमश, इत्यादिकांस— कीं ज्यांपासून कोणास कांहीं लभ्य नाहीं, अशांस मात्र आयुष्याची रगाड करून ठेविली आहेस!"

भद्रं कृतं कृतं मौनं कोकिलैर्जलदागमे ॥
दर्दुरा यत्र वक्तारस्तत्र मौनं हि शोभनम् ॥१३॥

कवि म्हणतो— "पावसाळ्याच्या दिवसांत कोकिल मौन धरतात हें फार चांगलें करतात; कारण, जेथें बेडूक वक्ते आले तेथें कोकिलांची काय शोभा राहिली!" सारांश, मूर्ख लोकांच्या समाजांत पंडितास मौनच उचित होय.

वयं काका वयं काका इति जल्पंति वायसाः ॥
तिमिरारिस्तमोहंतुः शंकाऽतंकितमानसाः ॥ १४ ॥

चांदण्या रात्रीं कावळे ओरडतांना पाहून कवि त्या ओरडण्यावर उत्प्रेक्षा करतो— "कावळे का— का— का— असें ओरडताहेत ते चंद्राला असें सांगताहेत कीं, 'काकाः! काकाः!' (आम्ही कावळे! आम्ही कावळे!) आम्ही अंधकार नाहीं! नाहींतर अंधकाराबरोबर आमचेंही काशात काढशील!"

### सूकर सिंह संवाद.

सूकरः— दश व्याघ्रा जिताः पूर्वं सप्त सिंहास्त्रयो गजाः ।
पश्यंतु देवताः सर्वा अद्य युद्धं त्वया मम ॥
सिंहः— गच्छ सूकर! भद्रं ते ब्रूहि सिंहो मया जितः ।
पंडिता एव जानंति सिंहसूकरयोर्बलम् ॥१५॥

एका डुकराची आणि सिंहाची गांठ पडली. तेव्हां डुकर सिंहास म्हणतो— "अरे! मीं पूर्वीं दहा वाघ, सात सिंह, आणि तीन हत्ती जिंकले. आज तुझी वरी गांठ पडली! होऊंदे युद्ध! सर्व देवता तें आज पाहोत!"

सिंहानें उत्तर केलें — "अरे डुकरा! तूं खुशाल ऐस. मी जातों. तूं हवें तर सर्वांस सांगत फीर कीं, 'मीं सिंहास जिंकिलें.' पंडितास सिंहाचें व डुकराचें बळ किती असतें तें ठाऊक आहेच!"

विद्या विवादाय धनं मदाय शक्तिः परेषां परिपीडनाय ॥
खलस्य साधोर्विपरीतमेतत् ज्ञानाय दानाय च रक्षणाय १६

मूर्ख व ब्राह्मण या मधील अंतर :— "मूर्खास विद्या प्राप्त झाली कीं तो त्यागीं त्यागीं वादाला उभा राहतो; धन मिळालें कीं गर्वानें ताठून जातो; अंगीं सामर्थ्य असलें, कीं दुसऱ्यास पीडा करूं लागतो. हा मूर्खाचा प्रकार झाला. आतां ब्राह्मणाचा ऐका; तो वरल्याच्या अगदीं उलट :— म्हणजे विद्येचा उपयोग तो ज्ञान समजतो; धनाचा दान, व शक्तीचा दुर्बळांचें रक्षण."

अपूर्वः कोऽपि कोशोऽयं विद्यते तव भारति ॥
व्ययतो वृद्धिमायाति क्षयमायाति संचयात् १७

"हे सरस्वति! तुझें भांडार मोठें विचित्र आहे. त्याचा जों जों खर्च करावा, तों तों तें वाढत जातें; व जों जों राखून ठेवूं लागावें, तों तों तें कमी होत जातें!"

यस्मादासीत्कुमारः कुवलयदलवल्लालयो वाह गंगां ।
वामा यस्यांगसंगा विहितजनवयो यो गवाशाध्वजोऽपि ॥
लंकेशाद्येकनाथो हिमकररुचिभृद्विशेषाश्रयोऽसौ ।
वर्णस्याद्यस्य लोपादपहरतु हरिः पातकं वः स्मरारिः १८ *

या श्लोकांत विष्णूचें व शिवाचें वर्णन आहे. नुसता श्लोक घेतला तर शिवाचें व पहिलें अक्षर काढून टाकलें असतां तेंच विष्णूचें वर्णन होतें:—

"ज्यापासून कुमार (कार्तिकस्वामी, मार (मदन)) झाला; ज्यानें कमलपत्रा प्रमाणें भूषणार्थ (पक्षीं — सहज) गंगा धारण केली आहे (गां — पृथ्वीतें (वराहावतारीं) धारण केली); ज्यानें वामा म्ह० पार्वती अर्द्धांगीं धरिली आहे (मा — लक्ष्मी ज्याच्या जवळ आहे); ज्याचा ध्वज गवीश म्ह० नंदी (वीश — गरुड) आहे; जो लंकेशादिकांचा म्ह० रावण, बाणासुर इत्यादिकांचा (पक्षीं — ब्रह्मदेवादिकांचा) ए-

---

* या श्लोकांतील कांहीं पदें बरोबर समजत नाहींत. यांत कांहीं पाठदोष असेल कीं काय न कळे.

र. नाथ होय; ज्यानें चंद्राची कांति ( मस्तकावर ) धारण केली आहे, व जो पर्वतावर — ( हिमाचलावर ) भमतो ( वशी — समुद्रांत भमतो ); तो शिव ( आणि विष्णु ) तुमच्या पातकाचें हरण करो."

स्वर्धुनि तव महिमानं वक्तुमनीशः फणीशोऽपि ॥
त्रिनयनि यत्पदमच्युतमच्युतपदविच्युताऽपि त्वं १९

कवी गंगेस म्हणतो—— "हे स्वर्गनदि! तुझा महिमा सहस्त्रमुख जो शेष त्याच्यानेंही वर्णवणार नाहीं! कां कीं, तूं स्वतः अच्युतपदापासून ( विष्णूच्या पायापासून ) पडली आहेस तरी अच्युत पद ( अढळ स्थान ) देतेस!"

गुरुरेकः कविरेकः सदसि मघोनः कलाधरोऽप्येकः ॥
अद्भुतमत्र सभायां गुरवः कवयः कलाधराः सर्वे २०

कवी कोणा राजाची सभा वर्णितो —— " इंद्राच्या सभेंत गुरु ( बृहस्पति ) एक, कवि ( शुक्राचार्य ) एक, आणि कलाधर ( चंद्र ) हा एकच; पण या सभेंत पहा! सर्व पंडित गुरु, कवि आणि कलाधर ( कलांत निपुण ) आहेत!"

भारतं चेक्षुदंडं च कलानाथं च वर्णय ॥
कालिदासः कविर्ब्रूते मतिपर्व रसावहं २१

. भोजराजानें कालिदासास म्हटलें, " कविराज! भारत, इक्षुदंड ( ऊंस ), आणि चंद्र, या तिहींचें एकदम वर्णन करा." कवीनें उत्तर केलें —— " तिहींचा रस प्रतिपर्वी चढतो."—' पर्व ' शब्द श्लिष्ट आहे; त्याचा पहिला अर्थ प्रसिद्ध आहेच, दुसरा ' पेर,' आणि तिसरा ' पर्वणी.'

विद्यायां दुर्मदो यस्य कार्पण्यं विभवे सति ॥
तेषां दैवाभिशप्तानां सलिलादग्निरुत्थितः २२

" त्यांस विद्येपासून दुर्मद म्हणजे दुष्ट गर्व आणि संपत्तीपासून कृपणपणा जडतो, त्यांस दैवानें शापच दिला असें समजावें! पाण्यापासून अग्नि निघून जसा मनुष्य भाजावा, त्याप्रमाणेंच वरील दोघां इसमांची स्थिति होय!"

असाधुः साधुर्वा भवति खलु जात्यैव पुरुषो।
न संगाद्दौर्जन्यं नच सुजनता कस्यचिदपि ॥
प्ररूढे संसर्गे मणिभुजगयोर्जन्मजनिते ।
मणिर्नाहेर्दोषान् स्पृशति नच सर्पो मणिगुणान् २३.

"पुरुष जो सज्जन किंवा दुष्ट होतो तो जातीनेंच ह्मणजे स्वभावेंकरूनच असतो; दुसऱ्याचें दौर्जन्य किंवा सौजन्य कोणास संगतीनें लागत नाहीं. पहा कीं, सर्प व त्याच्या शिरांतला मणि यांचा सहवास सार्‍या जन्मभर असतो; पण त्या रत्नास सर्पाचे दोष लागत नाहींत. व सर्पासही रत्नाचे गुण लागत नाहींत."

हे दारिद्र्य नमस्तुभ्यं सिद्धोऽहं त्वत्प्रसादतः॥
पश्याम्यहं जगत्सर्वं न मां पश्यति कश्चन २४

कोणी दरिद्री कवि दारिद्र्यास उद्देशून मौजेनें ह्मणतो:—"हे दारिद्र्या! तुझा काय प्रभाव सांगावा! तुझ्या कृपेनें मी सिद्ध झालो आहें! कसा ह्मणशील तर मी सर्व जगास पाहत असतां मला कोणी पाहत नाहीं!" तात्पर्य हें कीं, गरीब मनुष्यास कोणी पुसत नाहीं.

इतरपापफलानि यथेच्छया वितर तानि सहे चतुरानन ॥
अरसिकेषु कवित्वनिवेदनं शिरसि मा लिख मा लिख मा लिख २५.

"हे ब्रह्मदेवा! मीं जीं पातकें केलीं असतील त्यांचीं इतर फळें तूं मला खुशाल दे, तीं मी सोशीन. पण एक मात्र माझ्या कपाळीं नको—नकोच लिहूं. तें येवढें दुःसह काय?—अरसिकांपाशीं कवित्वनिवेदन. ह्मणजे कवितेचा रस समजून देणें!" आमच्या वाचकांपैकीं कोणासही वरील श्लोक न लागो म्हणजे झालें!

परिचरितव्याः संतो यद्यपि कथयंति नो सदुपदेशं ॥
यास्तेषां स्वैरकथास्ता एव भवंति शास्त्राणि ॥२६॥

"सत्पुरुषांनीं साक्षात् उपदेश जरी केला नाहीं, तरी त्यांच्या सहवासानें नेहमी असावें; कां कीं, त्यांचें जें सहज बोलणें तें पुरें बोधें अर्थयुक्त असतें!"

तावन्मौनेन नीयंते कोकिलैश्चैव वासराः ॥
यावत्सर्वजनानंददायिनी वाक् प्रवर्तते ॥ २७ ॥

"कोकिळ तोंपर्यंत मौनच धरून दिवस घालवितात, कीं जोंपर्यंत सर्व जनांस आनंद देणारी वाणी त्यास प्राप्त झालेली नसते!" ही अन्योक्ति आहे. जोंपर्यंत लोकांत मोठेपणा मिळविण्याची शक्ति आपले ठायीं आली नसते, तोंपर्यंत चतुर पुरुष अप्रसिद्धच राहतात.

परिपीय रदच्छदं तदीयं वचनानि स्खलयन्नुपागतोऽसि ॥
उचितं तदिदं मुकुंद मन्ये रसना बिंबफलेन जाड्यमेति ॥ २८ ॥

राधेच्या घरून आपणाकडे आलेल्या कृष्णास सत्यभामा म्हणते—"हे मुकुंदा! तिच्या अधराचें पान करून तूं माझ्याकडे आला आहेस हें मी समजतें! कशावरून म्हणशील, तर तुझ्या अडखळण्यावरून व अडतच बोलण्यावरून! तोंडल्यानें जीभ जड होते हें सर्वांस माहीत आहे!"

एकं वस्तु द्विधा कर्तुं बहवः संति धन्विनः ॥
जयत्येकः स्मरो धन्वी द्वैतमेकीकरोति यः ॥ २९ ॥

"कोणी कांहीं म्हणोत, प्रत्येक वस्तूचे दोन भाग करणारे पुष्कळ धनुर्धर आहेत. पण दुजेपण मोडून दोहोंस एक करणारा असा धनुर्धर एक कामच!"

संगमविरहविकल्पे वरमिह विरहो न संगमस्तस्याः ॥
संगे सैव यदेका त्रिभुवनमपि तन्मयं विरहे ॥ ३० ॥

"प्रियेशीं (आवडत्या स्त्रीशीं) संगम किंवा विरह यांतून तुला कोणतें हावें म्हणून जर मला कोणी विचारलें, तर मी विरह बरा, संगम नको असें सांगेन! कां कीं, समागम झाला असतां ती एकटीच मला मिळणार; पण जर विरह पडला, तर अवघ्या त्रिभुवनांत ती मला जिकडे तिकडे दिसेल!"

बंधनानि खलु संति बहूनि प्रेमरज्जु दृढबंधन-माहुः ॥
दारुभेदनिपुणोपि षडंघ्रिर्निष्क्रियो भवति पंकजकोशे ३१

" बंधनें अनेक आहेत खरीं; पण मनांत प्रेमरज्जूचें बंधन अत्यंत दृढ होय. पहा बरें! भ्रमर हा लाकडांचीं कोरडें फोडून काढतो. पण कमळाच्या गाभ्यांत त्याचें कांहीं चालत नाहीं!"

जातःस्वल्पं न जघान कंठीरवकिशोरकः ॥
नखव्यापारग्यामाम कुंजे कुंजरगामिनि ३२

" सिंहाचा बच्चा गजगंडांत फाडून दूध प्याला नाहीं अगोदर दंतांच्या कुंजांकडे त्यानें दृष्टि केली!"

गृण्हात्येष रिपोः शिरः परिजनं कर्षत्यसौ वाजिनं।
नीत्वा वर्मं धनुः प्रयाति पुरतः संग्रामभूमावपि ॥
एवं वीर्यकथां तथा च शपथं कुर्याच्च वामः करो।
दानानुद्यमतां विलोक्य विधिना शौचाधिकारी कृतः ३३

एके समयीं कोणा एका राजाचे दोन्ही हात धरून दोघे कवी फिरत होते. तेव्हां एकेकानें आपआपल्या हाताचें वर्णन आरंभिलें. उजवा हात धरून जो चालला होता तो ह्मणाला:— "हा हात शत्रूचें शिर धरतो. तसेंच घोड्याचा लगाम धरून त्यास भटकावांत ठेवतो. आणि रणभूमीवर ढाल किंवा धनुष्य घेऊन हाच चालतो.—इतकेंच नव्हे तर उजव्या हाताचे अवगुणही यांत नाहींत— हा डावा हा-न पून संवळत नाहीं. चोरी करीत नाहीं अथवा शपथही वाहात नाहीं." दुसऱ्या कवीनें हें सर्व ऐकून घेतलें. आणि यांतूंच उत्तर केलें कीं "हें सर्व खरें. पण दानकर्मास हा अयोग्य जाणून विधात्यानें त्याची योजना— कडे केली आहे." हा श्लोक एरवीं फार उत्कृष्ट आहे; पण शेवटल्या पदाच्या अश्लीलत्वानें याची थोडीशी खराबी झाली.

तिर्यक्त्वं भजतु प्रतारयतु वा धर्मक्रियाकोविदं।
हंतु स्वां जननीं पिबत्वपि सुरां स्नुषां वधूमुज्झतु ॥
वेदान्निंदतु वा हिनस्तु जनतां किंवाऽनया चिंतया।
लक्ष्मीर्यस्य गृहे स एव भजति मायो जगत्पूज्यतां ३४

ह्या श्लोकांत विष्णूच्या दहा अवतारांस उद्देशून कवीनें असें योजिलें दशवि-

तें आहे कां. मनुष्याच्या ठायीं संपत्ति असली म्हणजे तिच्या आड सारे अवगुण लपून जाता-त —— " मनुष्य दुष्टपणानें कर्म करो, धार्मिक मनुष्यास ताडून त्यास तोंडपडशी पाडो, आपल्या भाईचा वध करो, मद्यपान करो, निरपराध स्त्रीस टाकून देवो, वेदांची निंदा करो, लोकांस मारो — कांहीं करो; त्यासाठीं लक्ष्मी (पक्षीं, संपत्ति) असली म्हणजे जगास तो पूज्य (पक्षीं, मान्यतेस पात्र) व्हावयाचाच!"

गुरवो बहवः संति शिष्यवित्तापहारकाः ॥
दुर्लभः स गुरुर्लोके शिष्यचित्तापहारकः २५

" शिष्याच्या वित्ताचें अपहरण करणारे गुरु पृथ्वीच्या पाठीवर पुष्कळ आहेत; पण असा गुरु थोडाच की जो शिष्याच्या चित्ताचें अपहरण करतो!"

सुखार्थी चेत्त्यजेद्विद्यां विद्यार्थी चेत्त्यजेत्सुखं ॥
सुखार्थिनः कुतो विद्या कुतो विद्यार्थिनः सुखं २६

" ज्यास सुख पाहिजे तेंच हवें असेल त्यानें विद्या सोडून द्यावी; व ज्यास विद्या हवी असेल त्यानें सुख सोडून द्यावें. कारण ज्यास सुख हवें त्यास विद्या कोठची? व ज्यास विद्या पाहिजे त्यास सुख कोठचें? "

अर्थातुराणां न पिता न बंधुः कामातुराणां न भयं न लज्जा ॥
क्षुधातुराणां न बलं न तेज- श्चिंतातुराणां न सुखं न निद्रा २७

" पैशाकरतां जे लोकांच्या मुंड्या मुरगाळणार त्यांस बाप नाहीं व भाऊही नाहीं. जे कामांध झाले त्यांस भय नाहीं व लज्जाही नाहीं; जे नेहमीं बुभुक्षित असणार त्यांस बळ नाहीं व तेजही नाहीं; आणि जे चिंतेनें व्यापले त्यांस सुख नाहीं व निद्राही नाहीं. "

कृतांतो वा कांतः समजनि न भेदः प्रथमतः ।
ततो हिंस्रैर्मासैर्मनुज इति जग्राह हृदयम ॥
ततोऽसौ मन्येयानहमपि तदीया प्रियतमा ।
क्रमाद्वर्षे मासि प्रियतममयं ज्ञातमखिलम् ॥२८॥

कोणी तरुण स्त्री आपल्या मनाच्या निरनिराळ्या वृत्ति आपल्या सखीस नि-

वेदन करितें — " जेव्हां माझ्या पहिल्यानें प्रेम घडलें तेव्हां कांत (नवरा) कीं कृतांत (यम) यांत मला भेद वाटत नसे; पुढें दोन तीन महिन्यांनीं तो आपल्यासारखाच मनुष्य आहे असें मला वाटूं लागलें; त्यानंतर तो माझा प्रियकर आणि मी त्याची आवडती स्त्री असें माझ्या बुद्धीस वाटूं लागलें; आणि हळूं हळूं वर्ष होत आलें तेव्हां तर सर्व त्रिभुवनांत तो मला दिसूं लागला !"

## राम मत्स्य संवाद.

रामः— पश्य लक्ष्मण पंपायां बकः परमधार्मिकः ।।
शनैर्मुंचति पादाग्रं प्राणिनां वधशंकया ।।
मत्स्यः— सहवासी विजानाति सहवासिविचेष्टितं ।।
बकं किं वर्ण्यसे राम येनाहं निष्कुलीकृतः ३९

राम व लक्ष्मण सीतेचा शोध करीत करीत पंपासरोवराशीं आले तेव्हां तेथील अपूर्व शोभा पाहत असतां राम लक्ष्मणास म्हणतो :— " हे लक्ष्मणा ! पहा, या पंपासरोवरांत बगळेही केवढे धार्मिक आहेत ते ! तो बगळा पहा : पायांखालीं एखादा जीवजंतु चिरडेल या शंकेनें कसा हळूं हळूं पाय टाकतो आहे तो !"

हें भाषण ऐकून एक मासा रामास म्हणतो :— " हे रामा ! कोणाची वागणूक कशी आहे हें त्याच्या शेजाऱ्यास पुसावें ! अरे, तूं या बगळ्यास मोठा धार्मिक, मोठा हिंसाभीरु म्हणून मानतोस ! यानेंच माझें कुळ चट खाऊन टाकून मला एकटें ठेवलें ना !"

हा संवाद रामायणांतलाच आहे किंवा दुसऱ्या कोणी कवीनें केला आहे कोण जाणें ? पण कोठलाही असला तरी हा फार बहारीचा आहे यांत संशय नाहीं. यांत एक तर त्या काव्यप्रसिद्ध रम्य सरोवराचें थोडक्यांत मजेदार वर्णन आहे; आणि शिवाय मनुष्य आपल्याच हृदयवृत्तींवरून दुसऱ्यांच्या वृत्तींचें मान नेहेमीं कसें करीत असतो याचेंही हें खुबीदार उदाहरण होय. तसेंच या पद्याची रचनाही अगदीं साधी असून सुंदर असल्यामुळें मागें सांगितलेल्या अत्युत्तम काव्याचा हाही आणखी एक मासला होय.

अनंतरत्नप्रभवस्य यस्य हिमं न सौभाग्यविलोपि जातं ।।
एको हि दोषो गुणसन्निपाते निमज्जतींदोः किरणेष्विवांकः ४०

कुमारसंभव. १

कालिदास हिमालयाच्या वर्णनांत ह्मणतो :— " या पर्वतांत अगणित र-त्नें निपजतात. यास्तव यावर जरी चोहोंकडे बर्फ पडलें आहे तरी येवढ्यानेंच याच्या रम्यतेची हानि होत नाहीं; कां तर ज्याप्रमाणें चंद्राच्या प्रभेंत त्याचा डाग लपून जातो. त्याप्रमाणें गुणांच्या समुदायांत एक दोष लोपून जाऊन दि-सेनासा होतो. "

याच्यावर दुसऱ्या एका कवीनें कोटी केली आहे:—

एको हि दोषो गुणसन्निपाते निमज्जतींदोरिति यो बभाषे ॥
नूनं न दृष्टं कविनाऽपि तेन दारिद्र्यदोषो गुणराशिनाशी ४१

हा कवि दरिद्री असावा असें दिसतें. तो ह्मणतो :—

" ' गुणसमुदायांत एक दोष लपून जातो ' इत्यादि ज्यानें लिहिलें त्याच्या नजरेंतून स्वतः कवि असतांही[+] येवढें चुकलें असावें कीं, एक दारिद्र्यदोष असला ह्मणजे तो सर्व गुण लोपवून टाकतो ! " तस्मात् वरील नियम सर्वथैव खरा ह्मणतां येत नाहीं.

पृथ्वी तावदियं महत्सु महती तद्वेष्टनं वारिधिः ।
पीतोऽसौ कलशोद्भवेन मुनिना स व्योम्नि खद्योतवत् ॥
तद्विष्णोः परमं पदं कलयतः पूर्णं पदं नाभवत् ।
सोऽपि त्वद्धृदि वर्तते खलु भवंस्त्वत्तः परः को महान् ४२

कोणी कवि कोण्या भगवत्परायण साधूस ह्मणतो :— " हे महापुरु-षा ! तुझ्याहून थोर कोण आहे ? — कसें ह्मणशील तर पहा. ही पृथ्वी मोठ्यांत मोठी म्हणजे फार विस्तीर्ण आहे; तिचें वेष्टन समुद्र; त्या समुद्रास ज्यानें पिऊन टाकिलें तो अगस्त्य मुनि[†] आकाशांत केवळ काजव्याप्रमाणें आहे; तें येवढें अगाधव्य आकाश विष्णूच्या एका पावलास पुरलें नाहीं; पण येवढा व्यापक परमेश्वर असतां तो तुझ्या हृदयांत वास करतो ! तेव्हां तूं केवढा मो-ठा !! " या अलंकारास संस्कृतांत सार व इंग्रेजींत Climax म्हणतात.

अर्थो गिरामपिहितः पिहितश्च कश्चित् ।

---

[+] ' ते न देखे रवी । ते देखे कवी ॥ ' अशी मराठींत ह्मण आहे.

[†] (अगस्त्य तारा) तारा दक्षिण गोलार्धांत आहे. तो या दिवसांत संध्याकाळीं दक्षिणेकडे दिसत असतो.

सौभाग्यमेति मरहट्टवधूस्तनाभः ॥
नो गुर्ज्जरीस्तन इवातितरां निगूढो ।
नांध्रीपयोधरइवातिविघट्टिताभः ४३

जगन्नाथराय.

कवितेचा अर्थ कसा असावा याविषयीं पंडितराय लिहितात:——

" मरहट्ट (मारवाडी) स्त्रियांच्या स्तनाप्रमाणें जेव्हां काव्याचा अर्थ धड उघडा नाहीं धड झांकलेलाही नाहीं असा असतो, त्यावेळेस फार शोभतो; पण जेव्हां गुर्जरीस्तनाप्रमाणें तो अत्यंत गूढ असतो, किंवा* आंध्रीस्तनाप्रमाणें अगदीं उघड असतो, तेव्हां तो तसा शोभत नाहीं."

कल्पांतक्रूरकेलिः क्रतुकदनकरः कुंदकर्पूरकांतिः ।
क्रीडन् कैलासकूटे कलितकुमुदिनीकामुकः कांतकायः ॥
कंकालक्रीडनोत्कः कलितकलकलः कालकालीकलत्रः ।
कालिंदीकालकंठः कलयतु कुशलं कोऽपि कापालिकोनः ४४

" तो योगिश्रेष्ठ आमचें कल्याण करो — जो कल्पांतीं भयंकर क्रीडा करतो. ज्यानें यज्ञाचा (दक्षाच्या) विध्वंस केला, ज्याची कांति कुंदपुष्पाप्रमाणें व कापुराप्रमाणें आहे, जो कैलासाच्या शिखरावर क्रीडा करतो, ज्यानें चंद्र धारण केला आहे, ज्याचें शरीर सुंदर आहे, जो (स्मशानीं) मृतास्थींशीं रमतो, जो अट्टहास करतो, ज्याचें कलत्र काळी जी काली ती होय, आणि ज्याचा गळा यमुनेप्रमाणें काळा आहे." या शब्दालंकारास प्रास म्हणतात.

क्वचिद्वीणावाद्यं क्वचिदपि च हाहेति रुदितं ।
क्वचिद्विद्वद्गोष्ठी क्वचिदपि सुरामत्तकलहः ॥
क्वचिद्रम्या रामाः क्वचिदपि गलत्कुष्ठवपुषो ।
न जाने संसारः किममृतमयः किं विषमयः ४५

कवि संसाराची सुखदुःखविचित्रता वर्णितो:- "अहो! हा संसार विषमय आहे कीं अमृतमय आहे याचा मला निश्चय होत नाहीं! कोठें पहावें तो सतार झडते; कोठें

* आंध्रदेश दक्षिण हिंदुस्थानांत आहे. त्याचें आतांचें नांव माहित नाहीं.

विलापाचा स्वर कानीं येतो; कोठें विद्वज्जनांचा समुदाय विनोदांत रमलेला दिसतो; कोठें दारू पिवून मस्त झालेल्यांचा कल्ला ऐकूं येतो; कोठें रम्य स्त्रिया असतात; आणि कोठें त्याच रोगग्रस्त दृष्टीस पडतात. तस्मात् संसार मोठा विचित्र आहे!"

यः पूतनामारणलब्धकीर्तिः काकोदरो येन विनीतदर्पः ॥
यशोदयालंकृतमूर्तिरव्यात् पतिर्यदूनामथवा रघूणां ४६

या प्रकारच्या श्लोकांत श्लेषद्वारा कृष्णाचें व रामाचें वर्णन केलें आहे:—

"( रामपक्षीं ) ज्याचें नाव पुण्यप्रद आहे, ज्यानें रणांत कीर्ति मिळविली, ज्यानें काकोदराचा ( विशेषनाम आहे कीं काय कोण जाणें!) गर्व शमविला, ज्याची मूर्ति यश व दया यांहीं अलंकृत आहे, तो रघुपति तुमचें रक्षण करो.

"( कृष्णपक्षीं ) जो पूतनेच्या वधानें प्रसिद्ध झाला आहे, ज्यानें सर्पाची ( कालियसर्पाची ) खोड मोडली, ज्यास यशोदेनें नटवला आहे, असा यदुपति—"

अशा श्लोकास सभंगश्लेष म्हणतात.

करवालकरालवारिधारा यमुना दृश्यतरंगिणी च कीर्तिः ॥
तव कामद तीर्थराज दूरात् अनुबधाति सरस्वती कवीनां ४७

कोणी कवि राजास उद्देशून म्हणतो:—"हे उदार राजा! तुझ्या तरवारीची तीव्र धार हीच ( काळेपणामुळें ) यमुना होय; तुझी कीर्ति ही ( शुभ्रत्वामुळें ) भागीरथी होय; व यास्तवच कवींची सरस्वती ( वाणी-पक्षीं, या नांवाची नदी ) ही दुरून तुजकडे येऊं पाहते; कां तर, तूं तीर्थराज म्हणजे प्रयाग आहेस!"

खद्योतो द्योतते तावद्यावन्नोदयते शशी ॥
उदिते तु सहस्रांशौ न खद्योतो न चंद्रमाः ४८

"जों पर्यंत चंद्र उगवला नाहीं तों पर्यंत काजव्याची चमक; आणि सहस्रकिरण जो सूर्य तो उगवला म्हणजे तर काजवाही एकीकडे राहतो व चंद्रही एकीकडे राहतो." ही अन्योक्ति आहे. एकाहून एक वरचढ गुणी आले असतां मागले निस्तेज होऊन जातात!

वदनं प्रसादसदनं सदयं हृदयं सुधामुचो वाचः ॥

करणं परोपकरणं येषां केषां न ते वंद्याः ॥ ४९॥

सज्जन पुरुषांचें यांत पूर्ण वर्णन आहे:— " ज्यांचें मुख नेहेमीं प्रफुल्लित, हृदय कोमळ, वाणी अमृत स्रवणारी, शरीर परोपकारार्थ सतत झिजणारें, असे जे पुरुष असतील ते कोणास वंद्य नव्हेत? " या आर्येंत सर्वत्र अनुप्रास आहे.

( ५० ) कोणी कवि विक्रम राजाच्या सभेस जाऊन त्यानें हीं श्लोकपद्यें त्या राजापुढें म्हटलीं:—

सर्वदा सर्वदोऽसीति त्वं मिथ्या कथ्यसे बुधैः ॥
नारयो लेभिरे पृष्ठं न वक्षः परयोषितः ॥ १ ॥

'हे राजा! तूं सर्वकाळ सर्वांचें दान करीत असतोस ही तुझी मिथ्या स्तुति कवि गातात! कां तर, आजपर्यंत शत्रूंस तूं कधीं पाठ दिली नाहींस, व परस्त्रियांस तुझें वक्षस्थळही कधीं लाधलें नाहीं.' हा व्याजनिंदा अलंकार होय.

अपूर्वेयं धनुर्विद्या भवता शिक्षिता कुतः ॥
मार्गणौघः समभ्येति गुणो याति दिगंतरं ॥ २ ॥

"हे राजा! तूं ही अपूर्व धनुर्विद्या कोणापाशीं शिकलास? चमत्कार काय कीं, मार्गणांचा ( बाणांचा, पक्षीं याचकांचा ) समुदाय तुजकडे येतो; आणि गुण ( धनुष्याचा दोरी, पक्षीं कीर्ति ) दिगंतरास जातो!" नेहमीं हा व्यापार धनुष्याच्या नेहेमींच्या व्यापाराहून अगदीं उलट झाला!— श्लेष काढला असतां अर्थ तर सर्व ठीकच आहे.

सरस्वती स्थिता कंठे लक्ष्मीः करसरोरुहे ॥
राजेंद्र कुपिता कीर्तिस्तेन देशांतरं गता ॥ ३ ॥

" हे राजा! सरस्वती तुझ्या कंठाचे ठायीं वास करते आहे ( पक्षीं कंठालिंगन करते आहे ), आणि लक्ष्मी तुझ्या हस्तकमलाच्या ठायीं आहे— म्हणजे तूं मोठा दानशूर आहेस ( पक्षीं, लक्ष्मीचें करांनीं लालन करितो आहेस ), यास्तव कीर्तीस ( सवतीमत्सरास्तव ) राग येऊन ती ( धिक्काऱ्यानें तुला टाकून ) देशांतरास रुसून गेली!" काय चमत्कारिक अर्थ वर्णिला आहे!

हे तिन्ही श्लोक विक्रम चरित्रांत आहेत. तेथें असें लिहिलें आहे कीं, या श्लोकांनीं राजा प्रसन्न होऊन गेला कीं, प्रत्येक श्लोकाबरोबर एकेक दिशेचें राज्य त्यानें त्या कवीस बक्षीस केलें— वस्तुतः पाहतां त्यांची योग्यता खरोखरच तशी आहे!!

न नीतमुपनासिकं परिमलव्यपायाशंकया ।
न हृत विनिवेशितं विरहवन्हिकुंडे हृदि ॥
दृशोर्विहितिरिति श्रुतौ न निहितं प्रियप्रेषितं ।
करे कमलमर्पितं मृगदृशा दृशा पीयते ॥ ५१ ॥

एका स्त्रीस तिच्या प्रियकरानें एक कमल पाठवून दिलें. तेव्हां तिनें त्याची याप्रमाणें व्यवस्था केली.—— " तें तिनें नाकाशीं नेऊन त्याचा वास घेतला नाहीं. कां तर तशानें त्याचा सुगंध कमी होईल. या भयानें; तें तिनें आपल्या हृदयांत खोंवलें नाहीं, कां तर विरहाग्नीच्या धगीनें तें न जाणों कोमेजून जाईल म्हणून; तसेंच तें तिनें आपल्या कानावरही ठेविलें नाहीं,- डोळ्या आड होतें म्हणून. तर केलें काय?- तें त्या मृगनयनेनें आपल्या हातांत घेऊन त्याचें दृष्टीनें प्राशन करीत राहिली." नाजूक शृंगाराचा हा एक उत्कृष्ट मासला होय!

गुणानामज्ञाता प्रचुरधनदाताऽपि न मुदे ।
मुदे विद्याज्ञाता भवति मितदाताऽपि गुणिनां ॥
दृशौ ग्राम्या दत्ते न पुनरवबध्नेच चतुरे ।
दृशः प्रांतं दत्वा वशयति नितांतं पुरवधूः ५२

" पुष्कळ धन देतो खरा. पण त्यास गुण कळत नाहीं तो धनी गुणिजनांस आनंदप्रद होत नाहीं; आणि बक्षीस थोडेंच का देईना, पण त्यास मनुष्याच्या अंगातली करामत समजते त्याच धन्यास ते राजी होतात. कसें?— तर जशी ग्राम्य स्त्री ही जाणाऱ्या पुरुषाकडे डोळे भरून पाहते, पण चतुर पुरुष तिजकडे लक्ष सुद्धां देत नाहीं; पण नगरांतील स्त्री डोळ्याचा किंचित् कोपरा त्याकडे करते, पण मन वेधूनच टाकते!" सारांश, खरा परीक्षक भेटला म्हणजे गुणाचें चीज होतें.

मम प्रेम नवोढास्यं स्पर्धया वर्द्धते द्रुतं ॥
जेतव्य मत पौः केन न जाते पंकजानने ५३

कोणी कामी आपल्या मनांत भरलेल्या स्त्रीस उद्देशून ह्मणतो :—

" हे कमलानने! माझें तुजवरचें प्रेम आणि तुझें मजविषयीं औदासीन्य हीं जणों काय चढाओढीनें वाढताहेत. आतां या दोहोंतून कोणाची सरशी होई-ल तें मला समजत नाहीं ! "

श्रीवर्धनकरो राजा मंत्री तु पटवर्धनः ॥
तथापि श्रीः पटो नास्ति वाग्वर्धनकरस्य मे ५४

कोणी कवि पेशव्यांच्या दरबारीं आला असता गादीस उद्देशून ह्मणतो:-

" राजा श्रीवर्धनकर. ( लक्ष्मीचें वर्धन करणारा, पक्षीं श्रीवर्धनचा मुळचा राहणारा. ) आणि मंत्री पटवर्धन ( वस्त्रांची वृद्धि करणारा, पक्षीं आडनांव ). तरी वाग्वर्धनकरास ( बहुभाषण करणारास, पक्षीं वाग्वर्धनकरास ) मला श्री ( संपत्ति ) नाहीं व पट ( वस्त्र ) ही नाहीं ! "

कन्या वरयते रूपं माता वित्तं पिता श्रुतं ॥
बांधवाः कुलमिच्छंति मिष्टान्नमितरे जनाः ५५.

विवाहसमयीं निरनिराळ्या पक्षांचे कसकसे मनोरथ असतात ते यांत दाख-विले आहेत :— " कन्येस नवरा रूपवान असावा येवढीच इच्छा असते; तिच्या आईस तो घरचा संपन्न असला ह्मणजे झालें; बापाचें पाहणें त्याच्या केवळ विद्वत्तेवर असतें; भाऊबंदांच्या मनांत तो कुलीन असावा इतकेंच असतें; आणि बाकीच्या लोकांस चार दिवस चमचमीत भोजन असलें ह्मणजे झालें ! "

मंडले मंडलाकारो रेखा वाजिमयी जले ॥
सव्यापसव्ये द्विमुखो नकुलाधिष्ठितो हयः ५६

पांडवांतला चौथा नकुल अश्वविद्येंत मोठा निपुण होता. तो विराटराजा-च्या पदरीं ग्रंथिक नाम धारण करून राहिला होता हे सर्वत्र प्रसिद्ध आहेच. त्या-च्या कौशल्याविषयीं कोणी कवि ह्मणतो:—

" नकुलानें घोड्याकडून जेव्हां रिंगण घेववावें तेव्हां तो घोडा वर्तुलच आ-हे काय असा भास होई; जेव्हां समोर सारखा काढावा, तेव्हां घोड्यांची एक लांबच लांब रेघ दिसे; डावी उजवीकडे फिरवी, तेव्हां घोड्यास दोन तोंडें आहे-

न काय असा भास व्हावा!"

असंमुखालोकनमाभिमुख्यं निषेध एवानुमतिप्रकारः ॥
प्रत्युत्तरं मुद्रणमेव वाचो नवांगनानां नवएव पंथाः॥ ५७॥

कवि नूतन वधूंचा प्रकार वर्णितो :— "नुकताच ज्यांचा विवाह झाला अशा नूतन स्त्रियांचा [illegible]हा नवीच म्हणजे मोठी विचित्र असते! ती अशी कीं, त्यांनें दुसरीकडे पाहणें म्हणजेच नवऱ्याकडे पाहणें. नको म्हणणें म्हणजेच रुकार देणें. आणि मुकस्तब्ध राहणें म्हणजेच प्रत्युत्तर देणें!" अशाच अर्थाचे एक दोन श्लोक 'शाकुंतल' नाटकाच्या पहिल्या दुसऱ्या अंकांत आहेत ते आमच्या संस्कृतज्ञ वाचकांस माहीत असतीलच.

कमलभूतनया वदनांबुजे। वसतु ते कमला कर-पल्लवे ॥
वपुषि ते रमतां कमलांगजः। प्रतिदिनं हृदये कमलापतिः ५८

कोणी कवि राजास आशीर्वाद करतो :—— "हे राजा! तुझ्या मुखाचे ठायीं कमलभूतनया (सरस्वती) वास करो; हस्ताचे ठायीं कमला (लक्ष्मी) वास करो; तुझ्या शरीराचे ठायीं कमलांगज (मदन) विहार करो, आणि हृदयाचे ठायीं नेहमीं कमलापति (विष्णु) वास करो." सारांश, वक्तृत्व, दातृत्व, सौंदर्य आणि भक्ति हीं तुझेठायीं नांदोत.

त्यजंति शूर्पवद्दोषान् गुणान् गृण्हंति साधवः॥
दोषग्राही गुणत्यागी चालनीरिव दुर्जनाः॥५९॥

"सज्जन रसिक जे असतात ते सुपाप्रमाणें ग्रंथांतील दोष टाकून गुण तेवढे ग्रहण करतात; आणि दुर्जन असतात ते चाळणीप्रमाणें गुण गाळून टाकून दोष तेवढे घेतात."

मीनः स्नानरतः फणी पवनभुक् मेषस्तु पर्णाशनः ।
नीराशः खलु चातकः प्रतिदिनं शेते बिले मूषकः ॥
भस्मोद्धूलनतत्परः खलु खरो ध्यानाधिरूढो बकः ।
सर्वे किं ननु यांति मोक्षपदवीं ज्ञानप्रधानं तपः ६०

"मासा नेहमीं पाण्यांत बुडतो, साप वारा पितो, मेंढा पानें खाऊन राहतो, चातक नुसतें पाणी पितो, उंदीर नेहमीं बिळांत एकांतवासी असतो, गाढव राखेनें भरलेला असतो, आणि बगळा ध्यान लावून बसतो,— मग हे सर्व मोक्षास जातात काय? तेव्हां तपश्चरण ज्ञानाशिवाय व्यर्थ होतें."

यद्यपि बहु नाधीषे तथापि पठ पुत्र व्याकरणं ॥
स्वजनः श्वजनो माभूत्सकलं शकलं सकृच्छकृत् ६१

बाप आपल्या मुलास व्याकरणाचा उपयोग सांगतो:— "हे पुत्रा! तूं दुसरें कांहीं पढला नाहींस तरी निदान व्याकरण तरी शीक; म्हणजे 'स्वजना'च्या ठिकाणीं 'श्वजन' (कुत्र्यांचा समुदाय) 'सकला' बद्दल 'शकल' (तुकडा) 'सकृत्' (एकदां) याच्या जागीं 'शकृत्' (विष्ठा) असे हास्यास्पद दोष तुझ्या भाषणांत येणार नाहींत."

सकृज्जल्पन्ति राजानः सकृज्जल्पन्ति पण्डिताः ॥
सकृत्कन्याः प्रदीयन्ते त्रीण्येतानि सकृत्सकृत् ६२

"राजे (म्हणजे जे खरे थोर असतात ते) एक वार भाषण करतात, तसेच पंडित. त्याप्रमाणेच कन्यादान एकदाच होतें:— ह्या तीन गोष्टी एकदां झाल्या म्हणजे झाल्या, मग माघारीं येत नाहींत."

सज्जनस्य हृदयं नवनीतं । यद्वदन्ति कवयस्तदलीकम् ॥
अन्यदेहविलसत्परितापात् । सज्जनो द्रवति नो नवनीतं ६३

"सज्जनांचें हृदय लोण्यासारखें असतें असें जें कवि म्हणतात तें खोटें आहे; कां तर, सज्जन दुसऱ्यास झालेल्या तापानें द्रवतात, आणि लोणी केवळ आपल्याच तापानें विरघळतें." या स्थळीं व्यतिरेकालंकार आहे

अपूर्वेयं धनुर्विद्या मदनस्य महात्मनः ॥
शरीरमक्षतं कृत्वा भिनत्त्यन्तर्गतं मनः ॥ ६४ ॥

"पराक्रमी जो मदन त्याचें हस्तकौशल्य कांहीं विलक्षण आहे! कसें तर, शरीरास क्षत न पाडतां तो आंतल्या हृदयास विंधतो." येथेंही वरचाच अलं-

परीक्ष्य सत्कुलं विद्यां शीलं शौर्यं सुरूपताम् ॥ *
विधिर्ददाति निपुणः कन्यामिव दरिद्रताम् ॥ ६५ ॥

सर्वगुणसंपन्न पुरुषही कधीं कधीं दरिद्री असतात, या गोष्टीवर कोणी चतुर कवि उत्प्रेक्षा करतो.—— " उत्तम कुळ, शील, विद्या, शौर्य, रूप इत्यादि सर्व गुण पाहून नवऱ्या मुलास शाहणा बाप जशी आपली मुलगी देतो, त्याप्रमाणें वरील सर्व उत्कृष्ट गुणांची परीक्षा करून ब्रह्मदेव तेथें दरिद्रतेची योजना करतो. "

यद्यपि बहुगुणगम्यं जीवनमेतस्य कूपमुख्यस्य ॥
जयति तथापि विवेको दानं पात्रानुमानेन ॥ ६६ ॥

" या मोठ्या कूपाचें (विहिरीचें) पाणी काढण्यास जरी मोठी दोरी लागते, तरी याचा विवेक म्हणजे तारतम्यविचार मोठा प्रशंसनीय होय; कीं पात्राच्या मानानेंच दान. " ही अन्योक्ति आहे. एकादा मोठा धनिक, कीं ज्यापाशीं सवड होण्यास मोठाच गुण अंगीं लागतो, आणि जो पात्रत्वाचा विचार करून त्या मानानेंच दान करतो, त्याकडे हिचें अनुसंधान आहे. कूपपक्षीं, तो खोल असल्यामुळें बहुगुण (श्लिष्टशब्द आहे) लागतो, आणि जेवढें भांडें असेल तेवढेंच अर्थात पाणी निघेल.

रटतो निबद्धमुष्टेः कोशनिषण्णस्य सहजमलिनस्य ॥
कृपणस्य कृपाणस्य च केवलमाकारतो भेदः ॥ ६७ ॥

---

* या श्लोकास 'सुभाषितरत्नाकर' नांवाच्या मासिकांत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांतून कांहीं श्लोक घेतले आहेत, व तसे पुढेंही मधून मधून घेतले जातील. हा उल्लेख येथें दोन कारणांवरून केला आहे. एक तर तसें करणें रास्त आहे म्हणून; आणि दुसरें कारण हा उत्कृष्ट ग्रंथ आमच्या वाचकांपैकीं कोणास ठाऊक नसेल तर तो माहीत व्हावा. हा ग्रंथ सर्व संस्कृतज्ञांच्या आश्रयास पात्र असतां त्याच्या योग्यतेप्रमाणें त्याचा प्रसार झाला असेलसें वाटत नाहीं. याचें कारण उघडच आहे. जर एखाद्या जर्मनपरदेशीय [illegible] महा पंडितानें तो रचला असता, तर तो पांडित्याचें शिखर होऊन सगळें जग त्याच्या समागमास धांवलें होतें! एकीकडे युरोप व दुसरीकडे अमेरिका-खंड यानें पाहिलें असतें. पण कर्ता पडला एतद्देशीय संस्कृतज्ञ तेव्हां मराठी मसलत अंगावर न घेतां आपल्याला सर्व सर्व [illegible] म्हणजे परमभाग्य!

कवि कृपण व कृपाण (खड्ग) यांचें सादृश्य वर्णितो — " दोहोंची मूठ वळकट धानलेली असते (म्ह० कृपणाच्या हातून कवडी सुटायाची नाहीं, आणि तरवारीची मूठ बळकट अर्थातच केलेली असते), दोघे कोशांत (पैसा ठेवण्याच्या खोल्यांत; म्यानांत) पडून राहिलेले असतात; आणि दोघे स्वभावतःच मलिन (मळकट वस्त्रें वापरल्यामुळें, निळ्या रंगामुळें) असतात. भेद म्हणून काय तो एका आकारांत (दिसण्यांत. कारण एक मनुष्य आणि दुसरें शस्त्र; पक्षीं, 'आ' या अक्षरांत) मात्र आहे!"

निद्राप्रियो यः खलु कुंभकर्णो । हतः समीके स रघूत्तमेन ॥
वैधव्यमापद्यत तस्य कांता । श्रोतुं समायाति कथां पुराणं ६८

कथेच्या पुराणाच्या वेळीं हटकून झोंप येते, यावर कोणी विनोदी कवि कल्पना बांधतो :---- "कुंभकर्ण जो निद्राप्रिय होता त्याला रामचंद्रांनी रणांत खपविला. तेव्हां ती निद्रा विधवा होऊन आतां कथापुराणें वगैरे ऐकण्यास येते!"

अल्पिष्ठोऽपि खलीनं दत्वाऽस्ये पुच्छ वाजिराजस्य ॥
आरूढस्तत्पृष्ठे भूमौ बभ्राम मंडलाकारम् ॥ ६९ ॥

जेव्हां पेशवा इंग्रजांसमोर पळत होता त्यावर कोणीं* लिहिलें आहे :— "स्वतः अल्पिष्ठ† (अत्यंत लहान) असतांही‡ बाजिराजाच्या (बाजीरावाच्या; मोठ्या घोड्याच्या) पाठीवर चढून त्याच्या तोंडांत खलिन (वायुः लगाम) देऊन त्यानें त्यास भूमीवर मंडलाकार फिरविलें." या आर्येंत बाजिरावाचा थोड्या फौजेनें पराभव व पळतां पळतां जे त्याचे हाल झाले (त्याबद्दल खलीन म्ह० वायु) ते हीं दोन्हीं सुचविलीं आहेत.

उपकर्तुं प्रियं वक्तुं कर्त्तुं स्नेहमकृत्रिमम् ॥
सज्जनानां स्वभावोयं केनेंदुः शिशिरीकृतः ७०

"दुसऱ्यावर उपकार करावा, गोड बोलावें, निष्कपट स्नेहानें वागावें, हा स-

* पेशव्याच्या पदरीं त्रिविक्रमशास्त्री म्हणून कोणी होते, त्यांनीं केलेल्या पैकीं ही आर्या होय असें ऐकण्यांत आहे. † एल्फिन्स्टन् पुण्यास रेसिडेंट असतां त्यास पुष्कळ लोक अल्पिष्टन् किंवा अल्पिष्ठ असें म्हणत असत. या दुसऱ्या नांवावर वरील आर्येंत श्लेष केला आहे. ‡ क्वचित्पाठभेद. [illegible] 'वाजिराज' म्हणजे 'उत्तम घोडा' — 'अपुच्छ' याचा अर्थ नीट कळत नाहीं.

ज्जनांचा स्वभावच होय! चंद्रास कोणी थंड केला? "

भक्ते द्वेषो जडे प्रीतिररुचिर्गुरुलंघनम् ॥
मुखे कटुकता नित्यं धनिनां ज्वरिणामिव ७१

" धनवान् आणि ज्वरी ह्मणजे तापकरी यांची स्थिति एक असते. कशी कीं, भक्त ह्मणजे निष्ठेनें चाकरी करणारे लोक, (पक्षीं) भात, यांविषयीं दोघांस ही द्वेष असतो; जड ह्मणजे मूर्खलोक, (पक्षीं) पाणी यांवर दोघांची प्रीति; दोघांसही अरुचि प्राप्त होते; दोघांसही गुरुलंघन ह्मणजे वडील माणसांची अमर्यादा करणें (पक्षीं) अन्नाशिवाय राहणें, हें आवडतें; दोघांचीही तोंडें कडू (दोन्ही अर्थ उघडच आहेत) होतात. "

शतेषु जायते शूरः सहस्रेषु च पंडितः ॥
वक्ता दशसहस्रेषु दाता भवति वा न वा ७२

" शंभरांत एक शूर सांपडेल, हजारांत पंडित सांपडेल, दहा हजारांत वक्ता सांपडेल; पण दाता असा होईल किंवा न होईल. " यावरून दातृत्व किती कठीण आहे व याचें कारण जो पैशाचा लोभ तो मनुष्यांत किती सबळ आहे याची कवीची खात्री होती असें दिसून येतें.

इंदीवरेण नयनं मुखमंबुजेन । कुंदेन दंतमधरं नवपल्लवेन ॥
अंगानि चंपकदलैः स विधाय धाता । कांते कथं घटितवानुपलेन चेतः ७३

कालिदास— शृंगारतिलक

" हे कांते! तुझे डोळे इंदीवराचे, तोंड कमळाचें, दांत कुंदाच्या कळ्यांचे, अधरोष्ठ नव्या पल्लवाचा, याप्रमाणें कोमळ कोमळ पदार्थांनीं तुझें बाकीचें सर्व शरीर घडून तुझें हृदय मात्र विधात्यानें कसें दगडाचें घडलें? "

शब्दशय्येव कुर्वाणा सर्वदानवनिर्वृतिम् ॥
काव्यविद्या श्रुतिगता स्यान्मृतस्यापि जीवनी ७४

कवि कवितेचें आणि संजीवनी विद्येचें साम्य वर्णितो :— " (कविता पक्षीं) कविता ही केवळ शब्दांच्याच सामर्थ्यानें नेहमीं नवा नवा आनंद मनास देते. आणि

कानीं पडतांच मेलेल्यासही उठवून बसवील! (येथें शेवटीं अमळ अपुर्णाचा दोष येतो.)

"(संजीवनी पक्षीं) शुक्राचार्याची श्रुति-(वेद)-प्रसिद्ध विद्या केवळ उच्चारमात्रें करून मेलेल्यांस उठवून सर्व दानवांस आनंददायक झाली."

दयिता बाहुपाशस्य कुतोऽयमपरो विधिः ॥
जीवयत्यर्पितः कंठे मारयत्यपवर्जितः ७५

"स्त्रियांच्या बाहुपाशाचा काय विपरीत प्रकार आहे हा! तो कंठीं पडला असतां जीव येतो (आनंद होतो). आणि निघाला म्हणजे मरण येतें (त्यासारखें दुःख होतें)!

मुग्धे मुंच विषादमत्र बलभित् कंपो गुरुस्त्यज्यतां।
सद्भावं भज पुंडरीकनयने मान्यानिमान्मानय ॥
इत्थं शिक्षयतः स्वयंवरविधौ धन्वंतरेर्वाक्छला-।
दन्यत्र प्रतिषिद्धमात्मविहितं जानन् हरिःपातु वः ७६

(प्राचीन काळची स्वयंवराची चाल सर्वांस माहीतच आहे कीं, कन्येनें आपणास मागणी घालण्यास आलेल्या वरांतून आपला नवरा आपल्या खुषीनें निवडावा. अशा प्रसंगीं आलेल्या वरांचें कुलशीलादि वर्णन करण्यास कन्येबरोबर दासी किंवा तिचा भाऊ असें कोणी तरी असे. पुढील श्लोकांत स्वयंवरकाळीं तिचा भाऊ धन्वंतरि हा स्वयंवरास आलेल्या देवांचें वर्णन करतो आहे. या श्लोकांत कवीनें खुबी काय केली आहे. कीं बाहेरून त्याचे बोलणें आलेल्या देवांस व लक्ष्मीस उद्देशून आहे असें दाखवून खरा अर्थ सगळा विष्णूकडेच लागेसा केला आहे.)

"हे वेडे! गांगरूं नको, धैर्य नाहींसें करणारें हें कांपणें सोडून दे, चांगली स्वस्थ हो; आणि हे कमलनयने! या मान्य देवांचा चांगला सत्कार कर"—हा वरवरचा सकृद्दर्शनीं दिसणारा अर्थ झाला; पण विवक्षित अर्थ श्लेषानें असा होतो—

**"हे वेडे! या विषादास (शंकरास) सोड, हा येथें इंद्र बसला आहे यास टाकून दे, तसेच वरुण व बृहस्पति हेही राहूं दे; विष्णूच्या ठायीं प्रेम धरून या**

वार्धकाच्या कोणासही भ्यावूं नको ; " यामध्यें स्वयंवराचे वेळीं धन्वंतरीनें लक्ष्मीस वकीलीनें आपल्या पक्षाचा अभिप्राय सांगितला असतां तो जाणणारा विष्णु तुमचें रक्षण करो. "

प्राक् पादयोः पतति खादति पृष्ठमांसं ।
कर्णे कलं किमपि रौति शनैर्विचित्रम् ॥
छिद्रं निरूप्य सहसा प्रविशत्यशंकः ।
सर्वं खलस्य चरितं मशकः करोति ॥ ७७ ॥

काणी, चतुर व विनोदी कवि मशकाचें आणि दुष्टाचें साम्य वर्णितो :——
" मशक हा खळाचीं सर्व कृति करून दाखवितो. कशी ? तर पहिल्यानें पायां पडतो ( पायांशीं गुणगुणतो; आर्जव करतो ); मग पाठीचें मांस खातो ( पाठीला चावतो; न कळत कांहीं उपद्रव करतो ); नंतर कांहीं वेळ कानाशीं विचित्र गायन करतो ( कानाशीं गुणगुणतो; त्याचप्रमाणें दुष्ट गोड गोड बोलणीं बोलतो ); आणि शेवटीं छिद्र पाहून दबून बेधडक आंत शिरतो ( नाकाकानांत वगैरे घुसून जातो. व्यंग पाहून दबून निःशंकपणें घात करूं लागतो )." हा बहारीचा श्लोक 'हितोपदेशां'त आरंभीं आहे; पण कवीला काय तें कांहीं माहीत नाहीं !

धनानि भूमौ पशवश्च गोष्ठे भार्या गृहद्वारि जनः श्मशाने ॥
देहश्चितायां परलोकमार्गे । कर्मानुगो गच्छति जीव एकः ७८

" मरणसमयीं पैसा भुईंत, गायी म्हशी गोठ्यांतल्या गोठ्यांत, स्त्री घराच्या दारापर्यंत, इष्टमित्र श्मशानापर्यंत, आणि शरीर चितेवर राहतें; परलोकास जातांना एकटाच जाणारा असून त्याबरोबर त्याचें एक कर्म मात्र येतें !" सर्व वैराग्याचें तत्त्व या एका पद्यांत आहे !

अकृत्वा परसंतापमकृत्वा खलनम्रताम् ।
अनुसृत्य सतां वर्त्म यत्स्वल्पमपि तद्बहु ७९

" दुसऱ्यास ताप न करतां दुष्टांशीं नमून न वागतां, आणि सज्जनांच्या मार्गास अनुसरून, जें मिळेल तें थोडें असलें तरी लाखाच्या जागीं होय !"

सकृत्कंदुकपातेन पतत्यार्यः पतन्नपि ॥

तथा पतति मूर्खस्तु मृत्पिंडपतनं यथा ८०

थोरांत व हलक्यांत अंतर :— "थोर आहे तो पडला तरी चेंडूसारखा पडतो; आणि मूर्ख आहे तो मातीच्या गोळ्यासारखा पडतो." ह्मणजे पहिल्याच्या अंगीं स्थितिस्थापकत्वाचा गुण असल्यामुळे तो जसा पुनः वर उसळतो तसा बुद्धिमान् पुरुष पुनः आग्यास चढतो; आणि दुसऱ्याच्या अंगीं तो गुण मुळींच नसल्यामुळें तो जसा फतकन खालीं पडला की पडला, तसा मंदबुद्धि मनुष्य एकदां घसरला कीं घसरला!

नवैष विद्रुमच्छायो मरुमार्ग इवाधरः ॥
करोति कस्य नो बाले पिपासाकुलितं मनः ८१

"हे कुमारिके! तुझा अधरोष्ठ मारवाड देशांतील मार्गा प्रमाणें विद्रुमच्छाय ( ज्यावर झाडांची सावली नाहीं असा ) आहे. यास्तव त्याच्या योगानें कोणास पान करण्याची इच्छा होत नाहीं? पक्षीं, विद्रुमच्छाय ह्मणजे पोवळ्याची लाली ज्यावर मारते आहे असा तुझा अधरोष्ठ आहे, तेव्हां तो कोणास पानाविषयीं उत्कंठित करीत नाहीं? अर्थात् सर्व सहृदय जनांस उत्सुक करतो!"

निर्वाणदीपे किमु तैलदानं। चोरे गते वा किमु सावधानं॥
वयो गते किं वनिता विलासः। पयो गते किं खलु सेतुबंधः ८२
वेतालभट्ट.

"दिवा विझाल्यावर आंत तेल घालून काय उपयोग? चोर गेल्यावर 'सावध रे सावध!' ह्मणून हाकाटी करून काय फळ? वय गेल्यावर विषयोपभोगांत काय मौज? पाणी ओसरून गेल्यावर मग पूल तो कशाला?"

कंधरां समपहाय कंधरां। प्राप्य संयति जहास कस्यचित्॥
सां किलाननमपतः स्वपूर्तये। दुर्भरा त्किमुदराद्वियोगतः॥८३॥

युद्धांत एकाचें शिर वर उडालें असतां हंसलें; त्यावर कोणी कवि उत्प्रेक्षा करतो — "एका पुरुषाचें शिर मानेपासून उडून भुईवर पडलें असतां हंस-

लें. कां? तर त्यास असें वाटलें कीं, आपली भर करण्याकरतां जें मला नेहेमीं बांकवीत होतें त्या या दुर्भर उदरापासून माझा आज वियोग झाला, यांत काय वाईट झालें? "

गवीशपत्रो नगजापहारी। कुमारतातः शशिखंडमौलिः॥
लंकेशसंपूजितपादपद्मः। पायादनादिः परमेश्वरो नः॥८४॥

"या श्लोकांत शिवाचें व विष्णूचेंही वर्णन आहे —— "(शिवपक्षीं) बैल ज्याचें वाहन आहे, ज्यानें पार्वतीचें हरण केलें, जो कार्तिकेयाचा बाप, ज्यानें चंद्राची कोर मस्तकावर धारण केली आहे, रावणानें ज्याच्या पदकमलांची पूजा केली, असा अनादि शिव आमचें रक्षण करो."

(दुसरा अर्थ करतांना वरील प्रत्येक पदाचें पहिलें पहिलें अक्षर काढावें. हें गेवटल्या चरणांतील 'अनादि' पदानें सूचविलें आहे.)

"(विष्णुपक्षीं) गरुड ज्याचें वाहन आहे, ज्यानें गजेंद्राला (नक्राच्या तोंडातून) सोडविला अथवा कंसाच्या कुवलयापीड हत्तीला मारला, जो मदनाचा पिता, ज्याच्या मुकुटावर मोराचें पीस खोंवलें आहे, ब्रह्मदेव आणि शिव ज्याच्या पदकमलांची पूजा करतात, असा रमेचा पति ——————"

चत्वारो धनदायादा धर्माग्नि नृप तस्कराः॥
तत्र ज्येष्ठावमानेन त्रयः कुप्यंति बांधवाः ८५

"धर्म (दान करणें), अग्नि, राजा, आणि चोर हे धनाचे चार वांटेकरी आहेत. यास्तव यांच्या वडील भावाचा (धर्माचा) जेव्हां अवमान करावा, तेव्हां धाकटे तिन्ही बंधु कोपतात!"

दूरेऽपि श्रुत्वा भवदीयकीर्तिं। कर्णौ हि तृप्तौ न च चक्षुषी मे॥
तयोर्विवादं परिहर्तुकामः। समागतोऽहं तव दर्शनाय ८६

"आपली कीर्ति दूर पासून ऐकली असतां माझे कान तृप्त झाले, पण डोळे झाले नाहींत. यास्तव त्यांचा तंटा मिटविण्याकरतां आपल्या दर्शनार्थ आलों आहें."

मणिः शाणोल्लीढः समरविजयी हेतिनिहतो।
मदक्षीणो नागः शरदि सरितः श्यामपुलिनाः॥

कलाशेषश्चंद्रः सुरतमृदिता बालवनिता ।
तनिम्ना शोभंते गलितविभवाश्चार्थिषु नृपाः ८७

भर्तृहरि.

" माहाणेवर घांसलेलें रत्न, रणांत जय पावून आलेला शूर घायाळ झालेला, ज्याच्या गंडस्थळापासून मदस्राव व्हायाचा बंद झाला असा हत्ती, शरदृतूंत ज्याचीं वाळवंटें उघडीं पडलीं आहेत अशा नद्या, ज्याची नुसती कोर मात्र उरली आहे असा चंद्र, संभोगानें श्रांत झालेली तरुण स्त्री, आणि अर्थिजनांस दान करून निःस्व झालेले राजे, हीं सर्व आपल्या क्षीणत्वानें अत्यंत रमणीय दिसतात!" *

परान्नं प्राप्य दुर्बुद्धे मा प्राणेषु दयां कुरु ॥
परान्नं दुर्लभं लोके प्राणा जन्मनि जन्मनि ८८

कोणी भटजी आपल्या पुत्रास उपदेश करतात:— " मुला! परान्न प्राप्त झालें असतां प्राणावर भगदीं लोभ ठेवीत जाऊं नको; सडकून जेवीत जा! कां, तर हे प्राण बेट्या फुकाचे आहेत. जन्मोजन्मीं ठेवलेच आहेत; पण परान्न बरीक परम दुर्लभ आहे!! "

बालत्वे च मृता माता वृद्धत्वे च मृताः सुताः ॥
यौवने च हता भार्या पातकं किमतः परं ८९

" जन्म झाला तों आई मेली; तरुणपण आलें तों बायको मेली; आणि म्हातारपण झालें तों मुलगे आटपले:— यापरतें पातक कोणतें? "

काकः कृष्ण पिकः कृष्णस्त्वभेदः पिककाकयोः ॥
वसंते समुपायाते काकः काकः पिकः पिकः ९०

" कावळा काळा आणि कोकिळही काळा, तेव्हां दोघे सारखेच; पण व-

---

* वरील श्लोकाचें वामनानें भाषांतर केलें आहे तें येणेप्रमाणें:—

शाणोल्लेख जया असा मणि रणीं जो वीर घायाळला ।
संभोगें शिणली अशी नववधू हस्ती न मस्तावला ॥
ज्यांचीं स्वच्छ शरदृतूंत पुलिनें त्या निम्नगा चंद्रही— ।
बीजेचा प्रभु पात्ररत्नधन जो हे शोभती सर्वही ॥

संत ऋतु आला कीं, कावळा तो कावळा, आणि कोकिळ तो कोकिळ!” ही अन्योक्ति आहे. समयास मनुष्या मनुष्याची पारख होते!

अंगुल्याः कः कपाटं प्रहरति कुटिले माधवः किं वसंतो ।
नो चक्री किं कुलालो न हि धरणिधरः किं द्विजिव्हः फणींद्रः ॥
नाहं घोराहिमर्दी त्वमसि खगपतिर्नो हरिः किं कपींद्र ।
इत्येवं गोपकन्याप्रतिवचनजितः पातु वश्चक्रपाणिः ॥ ९१ ॥

इतर नायिकांच्या घरून मध्यरात्रीं कृष्ण आला असतां राधेचा व त्याचा संवादः—

“ दार कोण ठोठावीत आहे? — हे कुटिले ( कुरकरे! ), मी माधव आहे — कोण, वसंत? — नाहीं, मी चक्री आहे — कोण, कुंभार? — नाहीं, मी धरणीधर आहे — कोण, द्विजिव्ह ( दुसऱ्या सर्पाचा चहाड ) सर्प? — नव्हे, मी घोर सर्पाचें मर्दन करणार आहें — कोण, तूं गरुड आहेस काय? — नाहीं नाहीं, मी हरि आहें — कोण, वानर? — याप्रमाणें त्या गोपकन्येच्या उत्तरांनीं ज्यास हार खावी लागली, तो चक्रपाणि तुमचें रक्षण करो!”

व्याघ्रे च महदालस्यं सर्पे चैव महद्भयम् ॥
पिशुने चैव दारिद्र्यं तेन तिष्ठंति जंतवः ९२

“ वाघाचे ठायीं मोठा आळस, सापाचे ठायीं भय, आणि चहाडास दारिद्र्य, ह्या तीन गोष्टी सुदैवेंकरून एकेकाचे ठिकाणीं आहेत म्हणूनच सगळ्या जगाचा बचाव आहे!”

दृष्ट्वैकासनसंस्थिते प्रियतमे पश्चादुपेत्यादरा-।
देकस्या नयने पिधाय विहितक्रीडानुबंधच्छलः॥
ईषद्वक्रिमकंधरः सपुलकः प्रेमोल्लसन्मानसा- ।
मंतर्हासलसत्कपोलफलकां धूर्तोऽपरां चुंबति ९३

अमरुशतक.

कोणा पुरुषास दोन बायका होत्या. त्या दोघीही त्याच्या आवडत्या होत्या. एके समयीं असें झालें, त्या दोघी महालांत एकेच जागीं बसल्या असतां हा न कळत आंत गेला. तेव्हां आपणावरच विशेष प्रीति आहे असें दो-

घींस वाटण्याकरतां त्या चतुर पुरुषानें ही युक्ति केली :——

" दोघीही अत्यंत प्रिय अशा आपल्या स्त्रिया एकेच ठिकाणीं बसल्या आहेत असें पाहून तो मागें गुपचुप गेला, आणि विनोदाच्या मिषानें त्यानें एकीचे डोळे आपल्या हातांनीं गपकन झांकले; आणि अंमळ वांकडी मान करून हर्षरोमांचित होत्साता त्या धूर्तानें, प्रेमानें जिचें हृदय उचंबळतें आहे, आणि आंतल्या आंत हंसल्यानें जिचे गाल प्रफुल्लित झाले आहेत अशा दुसऱ्या स्त्रीचें वळून चुंबन केलें! "— याप्रमाणें दोघींसही आपापल्या मनांत वाटलें कीं, मीच नवऱ्याची ज्यास्त आवडती आहें!

नौ— र्दुर्जनजिव्हाच प्रतिकूलं विसर्पिणी ॥
परमतारणार्थेव दारुणा केन निर्मिता ॥ ९४ ॥

कवि नावेचें आणि चहाडाच्या जिभेचें श्लेषानें वर्णन करतो:——

" ( नौकापक्षीं ) प्रत्येक तीराला लागणारी आणि दुसऱ्यास तारून नेण्याकरतां लांकडाची केलेली. "

" ( जिव्हापक्षीं ) ज्याच्या त्याच्या मर्माचा उच्चार केल्यानें नेहेमी विरुद्ध वागणारी, आणि दुसऱ्यास फसवण्याकरतां दारुण म्ह० भयंकर होत्साती विधात्यानें निर्माण केलेली. "

रे रे कोकिल मा भज मौनं। किंचिदुदंचय पंचमरागम् ॥
नो चेत्त्वामिह को जानीते। काककदंबकपिहिते चूते ९५

" रे कोकिळा! असें मौन धरून बसूं नको, पंचमस्वर किंचित तरी काढ; नाहीं तर कावळ्यांच्या मंडळींत या आंब्याच्या झाडावर तुला कोण ओळखतो!"

कराविव शरीरस्य नेत्रयोरिव पक्ष्मणी ॥
अप्रोक्तमपि कुर्वंति तन्मित्रं मित्रलक्षणं ९६

" तोच खरा मित्र कीं जो, हात जसे शरीरास, किंवा पापण्या डोळ्यास, त्याप्रमाणें केवळ स्वतःच्या प्रेरणेनेंच जो सर्व कामीं उपयोगी पडतो! "

रात्रिर्गमिष्यति भविष्यति सुप्रभातं ।
भास्वानुदेष्यति हसिष्यति पद्मजालं ॥

इत्थं विचिंतयति कोशगते द्विरेफे ।
हा हंत हंत नलिनीं गज उज्जहार ९७

" रात्र जाईल, चांगली पहाट होईल, सूर्य उगवेल, आणि सर्व कमळें विकसतील.— याप्रमाणें कमळांत गुंतलेला भ्रमर जों मनाचे संकल्प करतो आहे तोंच हत्तीनें देंठासकट तें पार उपटून टाकलें ! "

गर्जसि मेघ न यच्छसि तोयं । चातकपक्षी व्याकुलितोऽहं ॥
दैवादिह यदि दक्षिणवातः । क त्वं क्वाहं क च जलपातः ९८

चातकपक्षी मेघास उद्देशून बोलतो :—" हे मेघा ! तूं नुसता गर्जतोस मात्र, पण वृष्टि करीत नाहींस; हा मी चातकपक्षी पहा कसा तान्हेनें व्याकूळ होऊन गेला आहे ! अरे, विचार कर कीं जर दैवेंकरून इतक्यांत दक्षिणेचा वारा सुटला, तर तूं कोठें, मी कोठें, आणि जलवृष्टि कोठें अशी गत होऊन जाईल ! " ही अन्योक्ति आहे. जोंवर हातांत आहे तोंवर सत्पात्रीं दान केल्याचें श्रेय पदरांत घेऊन टेवावें; कां कीं, वैभव केव्हां जाईल याचा काय नेम सांगावा !

वार्त्ता च कौतुकवती विमला च विद्या ।
लोकोत्तरः परिमलश्च कुरंगनाभेः ॥
तैलस्य बिंदुरिव वारिणि दुर्निवार-।
मेतत्त्रयं प्रसरति स्वयमेव लोके ॥ ९९ ॥

" अद्भुत वार्त्ता, उत्कृष्ट विद्वत्ता, आणि मृगनाभीचा ( कस्तूरीचा ) लोकोत्तर परिमळ, हीं तीन तेलाचा बिंदु जसा पाण्यांत त्याप्रमाणें आपोआप चोहोंकडे पसरतात ! "

मारस्य मित्रमसि किंच सुधामयूख ।
अंभावपि प्रणयिनां प्रकटी करोषि ॥
विश्वासपात्रमसि यद्दिवसोत्सवोर- ।
प्येतत्तव प्रकृतिशुद्धतनोश्चरित्रं ॥ १०० ॥

"हे चंद्रा! तूं मदनाचा मित्र आहेस, व तसाच शिवाचाही आवडता आहेस. ते परस्पर शत्रु असतांही तूं दोघांचें स्नेहपात्र झाला आहेस हा तुझ्या स्वभावसिद्ध मुग्धपणाचा (मुग्धपणाचा ; पक्षीं, मनाच्यासरळपणाचा) महिमा होय!"

को न याति वशं लोके मुखे पिंडेन पूरितः ॥
मृदंगो मुखलेपेन करोति मधुरध्वनिं ॥ १०१ ॥

"तोंड भरलें असतां कोण या जगांत वश होत नाहीं; पहा. मृदंग सुद्धां तसें केल्यानें मधुर ध्वनि करायाला लागतो!"

काचं मणिं कांचनमेकसूत्रे। मुग्धा निबध्नंति किमत्र चित्रं ॥
विचारवान् पाणिनिरेकसूत्रे। श्वानं युवानं मघवानमाह १०२

"स्वभावतःच मुग्ध अशा ज्या स्त्रिया त्या कांच व सोन्याचे मणी एकाच सूत्रांत (गळेसरींत) ओंवतात यांत काय आश्चर्य आहे? पहा कीं, एवढा बुद्धिमान् पाणिनि, पण त्यानें सुद्धां एकाच सूत्रांत श्वा (कुत्रा), युवा (तरुण), आणि मघवा (इंद्र) या तिघांस ओंवून दिलें!"

जनस्थाने भ्रांतं कनकमृगतृष्णाकुलधिया।
वचो वैदेहीति प्रतिपदमुदश्रु प्रलपितम् ॥
कृतालंकाभर्तुर्वदनपरिपाटीषु रचना ।
मयाप्तं रामत्वं कुशलवसुता न त्वधिगता १०३

धनतृष्णेमुळें आपली झालेली विटंबना कोणी याचक वर्णितो :—

"अहो! माझ्यांत व रामचंद्रांत काय उणें आहे? मी त्याची सर्व कृति केली! कशी?—— (रामपक्षीं) तो सुवर्णमृगानें लोभावला जाऊन जनस्थानांत* त्याच्या मागें फिरला; पुढें सीता नाहींशी झालीसें पाहून खिन्नांतःकरण होत्साता पावलोपावलीं 'हे जानकि' असा डोळ्यांत अश्रु आणून तिचा ध्यास त्यानें घेतला; शेवटीं रावणाची बातमी लागल्यावर त्या लंकापतीशीं घोर संग्राम करून त्याची मस्तकपंक्ति बाणांनीं उडविली ;——

* सांप्रत ज्यास नाशिक म्हणतात तेथल्या प्रदेशाचें पूर्वीचें नांव 'जनस्थान' येथेंच सुवर्णमृगाचा प्रसंग घडला हें लोकविश्रुत आहे.— या शब्दाचा श्लेषार्थ 'जन-स्थान' (लोकांची वस्ती) हा उघडच आ-

( कविपक्षीं ) मीही धनाशारूप जें मृगजळ त्याच्या पाठीस लागून धनिकां-च्या दारोदार हिंडलों; पावलोंपावलीं ' मला द्या ' असें दैन्यपूर्वक सगद्गद स्वरानें ज्या त्याशीं म्हटलें; आणि दुष्ट व अदन्य अशा धनिकांच्या कपाळावर आपल्या ञामरूप दर्शनानें आठ्या पाडविल्या;———— पण रामास सरते शेवटीं सी-ता प्राप्त होऊन कुश व लव हे दोन पुत्रही झाले; त्याप्रमाणें कुशल-वक्र-ता-(धनसंपन्नता) मात्र मला प्राप्त झाली नाहीं ! "

राजा कदाचित् संध्यामालोक्य प्राह—

परिपतति पयोनिधौ पतंगः ।

ततो बाणः प्राह—— सरसिरुहामुदरेषु मत्तभृंगः ॥

ततो महेश्वरः कविः — उपवनतरुकोटरे विहंगः ।

ततः कालिदासः प्राह — युवतिजनेषु शनैःशनैरनंगः १०४

——भोजप्रबंध.

" एके समयीं भोजराजा संध्याकाळची शोभा पहात होत्साता म्हणाला-—पहा! पतंग ( सूर्य ) समुद्रांत बुडतो आहे ——

तेव्हां बाण म्हणाला:—— कमलांच्या गाभ्यांत मधास लोभावलेला भृंग ( भुंगा ) गुंतून पडतो आहे ——

नंतर महेश्वर म्हणतो —— बागांतील झाडांच्या कोठ्यांत विहंग ( पक्षी ) जाऊन दडतो आहे ——

शेवटीं कालिदासः—— तरुण स्त्रियांच्या ठायीं अनंग ( मदन ) हळू-हळू संचार करतो आहे —— "

धनुः पौष्पं मौर्वी मधुकरमयी चंचलदृशां ।

दृशां कोणो बाणः सुहृदपि जडात्मा हिमकरः॥

स्वयं चैकोऽनंगः सकलभुवनं व्याकुलयति ।

क्रियासिद्धिः सत्त्वे भवति महतां नोपकरणे १०५.

" पहा ! मदनाचें धनुष्य काय तर पुष्पः—धनुष्याची दोरी तरी कशी ? तर भ्र-मरांची;— बाण कोणता ? तर चंचल नेत्री ज्या तरुण स्त्रिया त्यांच्या डोळ्यांचा को-परा ( कटाक्ष );— साह्यकारी तरी कोण मोठा समर्थ?— तो तर जडात्मा ( चं-

द्बुद्धि; पक्षीं, जनमय ) असा चंद्र;-आणि स्वत: काय तो एकटा :— पण इतकें असतांही हा अनंग ( ज्याला शरीरही नाहीं ! ) सगळ्या विश्वास व्याकुळ करून सोडतो. तेव्हां थोर जे आहेत त्यांची क्रियासिद्धि त्यांच्या अंगच्या सामर्थ्यावरच केवळ घडते, उपकरणांत म्हणजे त्यांच्या जवळ असणाऱ्या साहित्यांत-( सैन्यांत, शस्त्रांत वगैरे ) काय जीव आहे ! ''

रथस्यैकं चक्रं भुजगयमिताः सप्ततुरगा ।
निरालंबो मार्गश्चरणविकलः सारथिरपि ॥
रविर्यात्येवांतं प्रतिदिनमपारस्य नभसः ।
क्रियासिद्धिः सत्वे भवति महतां नोपकरणे १०६

हाही श्लोक वरच्याच तात्पर्यावर आहे:——'' सूर्याची सामग्री पहा ! रथाला चाक एक; घोडे अडनीड सात; त्यांचे दोर फळफळीत असे साप; मार्ग निराधार; आणि सारथि पाहिला तर व्यंग ( ज्याला मांड्या नाहींत असा-थोटा ); पण येवढ्या अडचणी असतांही अपरंपार जें आकाश तें प्रतिदिवशीं लंघून सूर्य जातो ! तेव्हां क्रियासिद्धि साधनांवर नाहीं, तर मनुष्याच्या अंगच्या हिमतीवर होत असते ! ''

नपुंसकमिति ज्ञात्वा प्रियायै प्रेषितं मनः ॥
तत्तु तत्रैव रमते हताः पाणिनिना वयं १०७

'' मन हें नपुंसक जाणून प्रियेकडे पाठविलें; पण तें कसलें लबाड ! तें तिचे शीं रममाण झालें ! — तेव्हां पाणिनीनें आम्हांस फसविलें ! ''

दोषाकरोऽपि कुटिलोऽपि कलंकितोऽपि।
मित्रावसानसमये विहितोदयोऽपि ॥
चंद्रस्तथापि हरवल्लभतामुपैति ।
नैवाश्रितेषु गुणदोषविचारणा स्यात् १०८

'' चंद्र हा दोषाकर ( दोषांची खाण; प्रदोषसमयीं म्ह॰ संध्याकाळीं प्रकाश करणारा ), कुटिल ( दुष्ट; वांकडा ), कलंकित ( दोन्ही अर्थ स्पष्ट आहेत ), आणि मित्राच्या ( पक्षीं, सूर्याच्या ) अंतकाळीं उदय पावणारा, असा आहे : तरी

शिवास तो अत्यंत प्रिय आहे. तस्मात् प्रभु जे आहेत ते आपल्या आश्रिताचे गुण-दोष पाहात नसतात!''

आश्वास्य पर्वतकुलं तपनोष्णतप्त- ।
मुद्दामदावविधुराणि च काननानि ॥
नानानदीनदशतानि च पूरयित्वा ।
रिक्तोऽसि यज्जलद सैव तवोत्तमश्रीः १०९

'' हे मेघा! सूर्याच्या उन्हानें तापलेले पर्वत व वणव्यानें पेटलेलीं रानें यांची पीडा हरण करून आणि शेंकडो नद्या व नदही भरून टाकून तूं रिक्त झालास, हेंच तुझ्या वैभवास अत्यंत भूषण झालें!'' ही अन्योक्ति आहे; व हिचा गर्भित अर्थही उघड आहे.

स्तनयुगमश्रुस्नातं समीपतरवर्त्तिहृदयशोकाग्नेः ॥
चरति विमुक्ताहारं व्रतमिव भवतो रिपुस्त्रीणां ११०
कादंबरी.

पोपट राजाची स्तुति करतो:—— '' हे राजा! तुझ्या शत्रूंच्या स्त्रियांचें स्तनयुग अश्रूंनीं स्नान होत्सातें व विमुक्ताहार ( त्यक्त भोजन; पक्षीं मुक्ताहाररहित ) होऊन जवळच्या शोकाग्नीची उपासनाच करतें आहे काय असें वाटतें!''

साधारणतरुबुद्ध्या न मया रचितस्तवालवालोऽपि ॥
लज्जयसि मामिदानीं चंपक भुवनाधिवासितैः कुसुमैः १११

'' हे चांफ्या! तूं कोणी यःकश्चित् वृक्ष असशील अशा समजुतीनें मी तुला तुझें आळेंही रचलें नाहीं. पण तोच तूं आतां परभर वास भरणाऱ्या फुलांनीं मला लाजवतो आहेस!'' ही अन्योक्ति आहे. मंद दिसल्यावरून वगैरे ज्याची आपण अवगणना केली असतां जो पुढें नांवा लौकिकास आला अशा चाकरास, शिष्यास वगैरेस ही लागते.

कस्येयं तरुणि प्रपा पथिक नः किं पेयमस्त्यां पयः ।
धेनोर्वा उत माहिषं बधिर रे नारः कथं मंगलः ॥
सोमो वाऽथ शनैश्चरोऽमृतमिदं तत्तेऽधरे दृश्यते ।

श्रीमत्पांथ विलासरसुंदर सखे यद्रोचते तत्पिब ॥ ११२

कोणी पांथ एका पाणपोईवर पाणी प्यावयास आला असतां तेथें एका तरुणी-स पाहून ह्मणतो:—— " हे तरुणि! ही पोई कोणाची आहे?— हे पांथा, आम-ची.—— हीत पिण्यास काय आहे?——पय.—गाईचें कीं म्हशीचें?——रे बहि-र्या, वार: ( उदक ).— सोमवार कीं शनवार?— नाहीं नाहीं. हें अमृत आहे.——कोणतें? तुझ्या अधराचे ठायीं दिसत आहे तें काय?— हे चतुर व सुंदर पां-था, तुला जें हवें तें पी! "

अमंत्रमक्षरं नास्ति नास्ति मूलमनौषधं ॥
अयोग्य: पुरुषो नास्ति योजकस्तत्र दुर्लभ: ११३

" कोणतेंही अक्षर मंत्राखेरीज नाहीं. मुळी औषधाखेरीज नाहीं, किंवा पुरुष योग्यतेखेरीज नाहीं! योजक मात्र पाहिजे! "

कमलासनकमलेक्षणकमलारिकिरीटकमलभृद्वाहैः ॥
नुतपदकमला कमला करधृतकमला करोतु मे कमलं ११४

" ब्रह्मदेव, विष्णु, शिव, आणि वरुण (?) हे जिच्या पदकमलाची स्तुति करतात, आणि जिच्या हातांत कमल आहे, अशी लक्ष्मी माझें पुष्कळ कल्याण करो. " या आर्येंत सर्वत्र अनुप्रास आहे.

उपशमितमेघनादं प्रज्वलितदशाननं रमितरामं ॥
रामायणमिव सुभगं दीपदिनं हरतु वो दुरितं ११५.

कवि रामायणाचें आणि दीपदानाचें ( दिवाळीचें ) साम्य वर्णन करतो:——

" ( रामायणपक्षीं ) ज्या काव्यांत मेघनादाचा ( इंद्रजिताचा ) उपशम ( अं-त ) आहे, रावण कोपायमान झाला आहे, आणि राम आनंदित झाला आहे:—

( दीपदिनपक्षीं ) पावसाळा नुकताच गेल्यामुळें मेघांचा गडगडाट ज्यांत ना-हींसा झाला आहे, वातींच्या दशा ( टोकें ) ज्यांत प्रज्वलित झाल्या आहेत, स्त्रि-यांस ज्यांत मोठा उत्सव प्राप्त होतो,— असा हा सण तुमच्या पातकाचें हरण करो! "

आहारे विरतिः समस्तविषयग्रासे निवृत्तिः परा ।

नासाग्रे नयनं तदेतदपरं यच्चैकतानं मनः ॥
मौनं चेदमिदं च शून्यमधुना यद्विश्वमाभाति ते ।
तद्ब्रूयाः सखि योगिनी किमसि भोः किंवा वियोगिन्यसि ११६

पतीच्या विरहामुळें उदास झालेल्या एका स्त्रीस तिची सखी विचारते:——

"हे सखि! तूं जेवण टाकलेस, सर्व विषयांपासून अत्यंत पराङ्मुख झालीस, नाकावर दृष्टि लावून बसली आहेस. तसेंच तुझें मन केवळ एकाग्र झालेसें दिसत आहे, मौन धारण केलें आहेस, सर्व विश्व तुला शून्य भासतें आहे,—— तेव्हां सांग तूं योगिनी (योगधारण केलेली) आहेस कीं वियोगिनी (विरहिणी) आहेस!"

किमिंदुः किं पद्मं किमु मुकुरबिंबं किमु मुखं ।
किमब्जे किं मीनौ किमु मदनबाणौ किमु दृशौ ॥
खगौ वा गुच्छौ वा कनककलशौ वा किमु कुचौ ।
तडिद्वा तारा वा कनकलतिका वा किमबला ११७

कवि कोण्या रूपवतीचें वर्णन करतो:——"हा चंद्र आहे कीं कमल आहे, कीं आरसा आहे, कीं तोंड आहे!— हीं कमळें आहेत, कीं मासे आहेत, कीं मदनाचे बाण आहेत, कीं डोळे आहेत!— तसेंच हे कोण? चक्रवाक, फुलांचे अंड, सुवर्णाचे कलश, कीं कुच!— तसेंच ही वीज आहे काय! कीं चांदणी, कीं सोन्याची वेली, कीं स्त्री!"

श्रुतिलंघनकृतप्रयासयोर्मलिनाभ्यंतरयोरधीरयोः ॥
स्मृतिलोकपरत्वमेतयोरुचितं लोचनयोर्मृगीदृशः ११८

"जे डोळे श्रुतिलंघनाविषयीं (कर्णप्रदेशापर्यंत पोंचण्याविषयीं; वेदोल्लंघनाविषयीं) उत्सुक आहेत, ज्यांचें अभ्यंतर मलिन आहे (एके अर्थी, काजळानें; दुसऱ्या अर्थी जे मलिनांतःकरण आहेत), जे अधीर आहेत (चंचल; विवेकशून्य), ते स्मृतीचा (स्मरणाचा; शास्त्रादिकांचा) लोप करतात हें ठीकच आहे!"

विद्वज्जनसभामध्ये नारीप्रथमसंगमे ॥
रणे रिपुसमाकीर्णे को न कातरतां व्रजेत् ११९

" पद्मिनांच्या समाजांत, स्त्रीच्या माधमिक समागमाचे वेळीं, आणि रणांगणांत शत्रूंनीं पाहिल्याने गांठ पडली असतां कोणाचा उर धडाडत नाहीं!"

अकस्मादागारे रहसि मिलितापि प्रियतमा ।
समाश्लिष्टा नागंतुकपिशुनभीतेन मनसा ॥
अथैषा मामज्ञं निपुणमथ सावज्ञमथवा ।
न जाने किं मेने प्रतिपलमतस्ताम्यति मनः ११९

कोणी कवि स्वानुभूत एक चमत्कारिक वृत्तांत वर्णितो:—" माझ्या प्रियेची आणि माझी अकस्मात् एकीकडे गांठ पडली असतांही मी तीस आलिंगिली नाहीं: कां कीं न जाणों इतक्यांत कोणी आले तर तें सर्वांस कळेल असा मला धाक वाटला! पण आतां माझ्या मनाला सारखी चुरचुर लागून गेली आहे कीं, त्या माझ्या कृतीवरून ती मला अज्ञान समजली, पक्का समजली, कीं तिची मीं अवज्ञा केली असें तीस वाटलें, कायजणें!"

पातु वो निकषग्रावा मतिहेम्नः सरस्वती ॥
प्राज्ञेतरपरिच्छेदं वचसैव करोति या १२०

" मति हेंच कोणी सोनें हें जिच्यावर तेव्हांच कसलें जाऊन एक्या वचनांतच जी शाहाणा व मूर्ख यांचा भेद कळवते, त्या सरस्वतीस नमन असो."

वेणी श्यामा भुजंगीयं नितंबान्मस्तकं गता ॥
वक्त्रचंद्रसुधां लेढुं सान्द्रसिंदूरजिव्हया १२१

कोणी कवि वेणीवर उत्प्रेक्षा करतो:—" मला वाटतें, ही वेणी काळी सर्पीण आहे। आणि ही मुखचंद्राच्या ठायीं असणारें जें अमृत तें आपल्या सिंदूररूप लालजिभेनें चाटण्याकरतांच नितंबस्थलापासून वर गेली आहे काय!" वेणीचा शेवटाशीं निमुळता होत गेलेला आकार, पेडांची वीण, आणि दुसऱ्या शेवटाशीं होत जाणारा पसरटपणा, तसाच काळा रंग, हे सर्व वरील उत्प्रेक्षेचे अवयव होत; आणि भांगांत शेंदूर पालतात यावरही वरील श्लोकांत लक्ष्य आहे.

भूमौ स्खलितपादानां भूमिरेवावलंबनं ॥

त्वयि जातापराधानां त्वमेव शरणं मम १२२

कोणी भक्त परमेश्वरास ह्मणतो :— " हे देवा! भूमीवर पदस्खलन झाले असतां ह्मणजे पाय अडखळला असतां त्या मनुष्यास सांवरणारी पुनः भूमीच; त्याचप्रमाणें आह्मा मनुष्यांच्या हातून अपराध झाले तरी तुझ्याकडेच पुनः आह्मांस येणें आहे; कारण तुजशिवाय दुसरें कोण त्राते आहे? "

दंता बलिर्विगलिता गलितं शरीरं ।
केशाश्च फेनधवला नहि मे विषादः ॥
एणीदृशो युवतयः पथि मां विलोक्य ।
तातेति भाषणपरा शतकुंतघातः १२३

कोणी विषयलंपट पुरुष वृद्धत्वावस्था आली असतां खेद प्रदर्शित करतो:— " माझे दांत पडले, शरीर थकलें, केस फेसाप्रमाणें पांढरे पक्क झाले; इत्यादि गोष्टींचा मला खेद वाटत नाहीं.— परंतु हरिणनयना ज्या तरुण स्त्रिया त्या मला वाटेंत आडू आल्या असतां ' बाबा ' शब्दानें मला दूर होण्यास बगे- र सांगतात, तो शब्द मला शंभर भाल्यांप्रमाणें टोंचतो ! "

ज्वलति चलितेंधनोऽग्निर्विप्रकृतः पन्नगः फणं कुरुते॥
प्रायः स्वं महिमानं क्षोभात्प्रतिपद्यते हि जनाः १२४

शाकुंतल.

" सर्पण चाळवलें असतां अग्नि पेट घेतो, साप डिवचल्याबरोबर फडा काढतो; सारांश, तेजस्वी जे असतात त्यांस राग आणला असतां ते आपला प्रभाव तत्क्षणीं प्रगट करतात. "

असह्नो नायं न च वरगुणैरेष रहितः । ।
प्रियो मुक्ताहारस्तव चरणमूले निपतितः॥
गृहाणेनं भद्रे व्रजतु तव कंठप्रणयिता— ।
मृषा यो नास्त्यन्यस्तव हृदयतापोपशमने १२५

कोणी नायिका नायकावर रुसून तिनें गळ्यांतील हारवीर पार तोडून फेंकू-

न दिले. तेव्हा तिची एक सखी तिच्या पायांशीं पडलेल्या हारास बाह्यात्कारी उद्देशून बोलून श्लेषोक्तीनें तिच्या वल्लभाविषयीं तीस सांगते :———

"अगे सखि! हा सहृत ( वाटोळा; पक्षीं, सुशील ) नाहींसा नाहीं; नसाच वरगुणांनीं ( चांगल्या दोऱ्यांनीं; पक्षीं, वरास जे गुण असावे त्यांनीं) ही हा कमी नाहीं; हा तुझा मुक्ताहार तुझ्या पायांशीं पडला आहे ( पक्षीं, तुझा प्रिय त्वत्कोपानल होत्साता तुझ्या पायां पडतो आहे ); तर हे गडे, याला जवळ घे; आणि हा तुझ्या गळां पडो: कारण तुझ्या हृदयाचा ताप शमण्यास दुसरा उपाय नाहीं!"

यास्यति जलधरसमयस्तव च समृद्धिर्लघीयसी भविता॥
तटिनि तटद्रुमपातनपातकमेकं चिरस्थायि॥१२६॥

कोणी कवि वर्षाकाळीं फुगलेल्या नदीस उद्देशून म्हणतो :—— "हे नदि! हा वर्षाकाळ निघून जाईल, व तसेंच तुझें हें वैभवही फार टिकलसें नाहीं: पण - तीरावरील झाडांस तूं उपटून टाकिलेंस हें पातक मात्र तुला चिरकाळ जडलें!" ही अर्थांतच अन्योक्ति आहे.

केशाः संयमिनः श्रुतेरपि परं पारं गते लोचने ।
अंतर्वक्त्रमपि स्वभावशुचिभिः कीर्णं द्विजानां गणैः॥
मुक्तानां सतताधिवासरुचिरं वक्षोजकुंभद्वय- ।
मित्थं तन्वि वपुः प्रशांतमपि ते क्षोभं करोत्येव नः १२७

भर्तृहरि.

"हे तन्वि! तुझे केस संयमी ( बांधलेले; पक्षीं जितेंद्रिय ) आहेत; तुझे डोळे श्रुतीच्या ( कर्णाच्या; वेदाच्या ) ही पार गेले आहेत; तुझ्या मुखाचे ठायीं स्वभावतःच स्वच्छ ( शुभ्र; निष्पाप ) अशी द्विजपंक्ति ( दोनी अर्थ प्रसिद्ध आहेत) आहे; आणि तुझे स्तनद्वय मुक्तांच्या ( मोत्यांच्या; पक्षीं, जीवन्मुक्त योग्यांच्या ) निरंतर सहवासानें पवित्र झालेलें आहे;—— मग येवढी शांतीची सामग्री जवळ असतांही तुझें शरीर आमच्या मनास क्षुब्ध- कां करतें?" *

---

* वरील श्लोकाचें भाषांतर आपांनर पंडितांनी असें केलें आहे:——— (पुढील पृष्ठ पहा.)

श्रीरामे मृगयां गतेऽपि धनुषा बाणे समारोपिते।
ऽप्याकर्णान्तगतेऽपि मुष्टिगलिते ऽप्येनां गतेऽपि च॥
न त्रस्तं न पलायितं न चकितं नोत्कंपितं नोद्धृतं ।
मृग्या मद्वशगं करोति दयितं कामोऽयमित्याशया १२८

“ राम मृगयेस गेला असतां त्यानें धनुष्यावर बाण ठेवला, कर्णप्रदेशापर्यंत ओढला, आणि एका मृगावर लक्ष्य धरून तो त्याच्या अंगावर सोडून दिला;—पण इतकें केलें तरीही त्याची स्त्री हरिणी भ्याली नाहीं, पळाली नाहीं, चकित झाली नाहीं, आणि कंपही पावली नाहीं: कारण तिला असी भ्रांति झाली कीं, हा मदन च आहे: व माझ्या स्वाधीन याला करण्याकरितां हा याच्यावर बाण टाकतो आहे! ”

चांचल्यमुच्चैःश्रवसस्तुरंगात् ।
कौटिल्यमिंदोर्विषतो विमोहः ॥
इति श्रियाः शिक्षि सहोदरेभ्यो ।
न वेद्मि कस्माद्गुणवद्विरोधः ॥१२८॥

कोणी कवि लक्ष्मी आणि सरस्वती यांच्या विरोधास अनुलक्षून म्हणतो:—

“ लक्ष्मीनें आपल्या भावंडांपासून एक एक गुण घेतला — उच्चैःश्रवा नामक अश्वापासून चापल्य, चंद्रापासून कुटिलपणा, आणि विषापासून उन्मादकपणा: पण गुणिजनांशीं विरोध करण्याचा गुण ती कोणापासून शिकली हें कळत नाहीं!”

विलासिनी कांचनपट्टिकायां। पाटीरपंकैर्विरही विलिख्य॥
तस्याः कपोले व्यलिखत् पवर्गं। ओष्ठे तवर्गं चरणे टवर्गं १२९

“ कोणा विरही पुरुषानें सोन्याच्या चित्रफलकावर चंदनाच्या रसानें आपल्या प्रियेची तसबीर काढून तिच्या गालांवर पवर्ग, अधरोष्ठावर तवर्ग, आणि पायांवर

---

पोरे मयमतीस केश नयन कमलेंही चावरें ।
अंतरंकल गुनिर्मल हिरणगणीं तें सर्वरा भविलें ॥
मुकाचा सतता पिवास दूरवी महूनतांही स्मरी ।
रमें शांत शरीर ताप कुरितें कीं सांग वा कामिनी ॥

तिमच्या वगणाच्या शेवटीं आपांतरकारानें तजाव स्पेत आपण जोडून चातुर्यानें पाळून दिला आहे हें मार्मिक वाचकांच्या लक्षांत येईलच!

टवर्ग याप्रमाणें वर्ण निघतील. ''

अभिप्राय असाच आहे कीं तिन्ही स्थानें अनुक्रमें करून ओष्ठ्य, दंत्य, आणि मूर्धन्य होत! ''

हारो नारोपितः कंठे मया विश्लेषभीरुणा ॥
इदानीमंतरे जाताः सरित्सागरदुर्गमाः १३०

हनुमन्नाटक.

राम विरहातुर होत्साता पूर्वस्थिति आठवून ह्मणतो:— '' त्या मला पूर्वी विरह इतका सहन होत नसे कीं गळ्यांतला हार देखील मला शत्रूसारखा वाटे, त्याच माझ्यामध्यें आणि सीतेमध्यें आतां नद्या, सागर, पर्वत इत्यादि झाले आहेत! ''

मनस्वी म्रियते कामं कार्पण्यं न तु गच्छति ॥
अपि निर्वाणमायाति नानलो याति शीततां १३१

'' मनस्वी ह्मणजे थोर मनाचे जे असतात ते मरून जातात, पण दैन्य कधींही पत्करीत नाहींत. पहा! अग्नि विझून जातो; पण कधीं थंड झाला आहे काय? ''

न संध्यां संधत्ते नियमितनिमाजां न कुरुते ।
न वा मौंजीबंधं कलयति न वा सौनतविधिम् ॥
न रोजां जानीते व्रतमपि हरेर्नैव कुरुते ।
न काशी मक्का वा शिवशिव न हिंदुर्न यवनः १३२

'' संध्या करीत नाहीं, व निमाजही पढत नाहीं; त्याला मुंजही नको, व सुंतेचीही गरज नाहीं; रोजा माहीत नाहीं, व एकादशीही करीत नाहीं; जो काशीलाही मानीत नाहीं, आणि मक्केलाही विचारीत नाहीं;— एकून हर हर! जो धड हिंदुही नाहीं आणि मुसलमानही नाहीं! '' *

* वरील पद्यावरून वहींप्रमाणेंच गेल्या शतकांत धर्मांच्या संबधानें वरील चलबिचल झाली असावी असें दिसतें. ह्मणजे आजीकडे तीस चाळीस वर्षे ख्रिस्तमसुचा प्रभाव जसा गाजत आहे, तसाच या पूर्वी महंमदाच्या पैगंबराचाही थोडेंकडे गाजत असावा असें अनुमान होतें. वरील श्लोकांतील वर्णन सध्यांच्या कांहीं शेंकडो मनुष्यांस थोडाफार फरक केला असतां पुरतेपणीं लागेल. कित्येकांची तर आपल्याच्या धारणाविषयीं अशी जबरदस्त आतुरता दृष्टीस पडते कीं, सकाळीं विरक्त होऊन मुल्लासाहेबांबरोबर

कन्याप्रसूतस्य धनुःप्रसंगात् । प्रभाविनोऽप्याहितवैभवस्य ॥
धनंजयाधीनपराभवस्य । दीनस्य कर्णस्य च को विशेषः १३३

दुर्योधनमित्र कर्ण आणि दीन यांवर श्लेषः— "कर्णांत आणि दीनांत काय भेद आहे? दोघांचाही जन्म कन्येपासून (कुंतीपासून--कन्याराशीपासून); दोघांसही धनुःप्रसंगानें (धनुष्याच्या योगानें--धनुराशीमुळें) बळ घेऊन त्यांचा अतिशयित प्रभाव प्रगट होतो; आणि दोघांचाही पराजय धनंजयाच्या [अर्जुनाच्या --अग्नीच्या] आधीन."

परवादे दशवदनः पररंध्रनिरीक्षणे सहस्राक्षः ॥
सद्वृत्तवृत्तिहरणे बाहुसहस्रार्जुनः पिशुनः १३४

"खल हा दुसऱ्याची निंदा करतांना दशमुखाचा रावण बनतो. दुसऱ्याचें उणें पाहण्यांत सहस्रनेत्र इंद्र होतो. आणि सज्जनांचें द्रव्यहरण करतांना कार्तवीर्याप्रमाणें हजार बाहू धारण करतो!"

सदा वक्रः सदा क्रूरः सदा पूजामपेक्षते ॥
कन्याराशिस्थितो नित्यं जामाता दशमो ग्रहः १३५

कोणी विनोदी कवि जांवयाचें आणि ग्रहाचें साम्य वर्णितो:— "जामात हा दहावा ग्रहच होय. कसा? तेहमीं वक्र म्हणजे आपल्याच कुऱ्यांत असणारा, तेहमीं रुसलेला, तेहमीं समजाविला पाहिजे! मात्र दोहोंत एक मात्र थोडा भेद आहे:— ग्रह तेहमीं राशीवरून चळतो. पण हे बोवा कन्याराशीस धरून जे एकदां बसतात ते मग हालत नाहींत!"

जले तैलं खले गुह्यं पात्रे दानं मनागपि ॥
प्राज्ञे शास्त्रं स्वयं याति विस्तारं वस्तुशक्तितः १३६

"पाण्याचे ठायीं तेल, खलाचे ठायीं एखादी गुप्तगोष्ट, सत्पात्राचे ठायीं केले-

ल्या दानाचें फळ, दुसरें पंढरीच्या पताकेसमोर तुकाराम महाराजांचा गाथा, तिसरें महर्षी योगाभ्यास, सायंकाळीं पाळण्याची सुगम पदें, आणि रात्रीं वेढेनसार ईश्वरपुत्र शरीर भोगतन! ते ठा एकंदर पतनव काय कीं, सरते शेवटीं ईश्वर त्या हातानें हाक मारील तिकडून आंत घुसायला तयार!

रें अन्यही दान, विचक्षण शिष्यास शिकविलेलें शास्त्र. हीं सर्व केवळ स्वभावत:-च वस्तुमाहात्म्यास्तव विस्तार पावतात ! ”

वरं दरिद्र: श्रुतिशास्त्रपारगो ।
न चापि मूर्खो बहुरत्नसंयुत: ॥
सुलोचना जीर्णपटाऽपि शोभते ।
न नेत्रहीना कनकैरलंकृता १३७

“वेदशास्त्रांत पारंगत झालेला असा दरिद्री असला तरी बरा, पण जडावाचे दागिने घातलेलाही मूर्ख नको; पहा कीं, जिचे डोळे फरेख आहेत अशी सुंदर स्त्री जीर्ण वस्त्र नेसली असतांही शोभते, पण जिला डोळे नाहींत ती सोन्यानें मढवून टाकली असतांही शोभत नाहीं. ”

आशा नाम मनुष्याणां काचिदाश्चर्यशृंखला ॥
यया बद्धा: प्रधावंति मुक्तास्तिष्ठंति पंगुवत् १३८

“आशा ही कोणी आश्चर्यकारक शृंखला होय! कशी? तर तिनें जे बद्ध होतात ते धावूं लागतात; आणि तिजपासून मुक्त जे झाले ते पांगळ्यासारखे जागच्या जागीं बसतात! ” म्हणजे जे द्रव्याच्या आशेला गुंतलेले असतात त्यांस नेहेमीं धावाधाव करावी लागते; आणि जे निरिच्छ असतात ते खुशाल स्वातंत्र्यानें वागतात.

आलस्यं स्थिरतामुपैति भजते चापल्यमुद्योगितां ।
मूकत्वं मितभाषितां वितनुते मौढ्यं भवेदार्जवम् ॥
पात्रापात्रविचारणाविरहिता यच्छत्युदारात्मतां ।
मातर्लक्ष्मि तव प्रसादवशतो दोषा अपि स्युर्गुणा: १३९

कवि लक्ष्मीचा प्रभाव वर्णन करतो :— “ श्रीमंताचे ठायीं आळस असला तर तो स्थैर्य व गंभीरपणा हे नांव पावतो; चापल्य म्हणजे रिकाम्या उलाढाली करण्याचा असला, तर त्यास उद्योग हें नांव प्राप्त होतें; मुखदुर्बळपणा मितभाषीपणा होतो; मूर्खत्व सरळवृत्ति म्हणून गणलें जातें: आणि पात्रापात्रविचारशून्यता या दोषास प्रजादें औदार्य असें रूप लोक देतात: सारांश, हे माते लक्ष्मि! तुझ्या प्र-

आहे कस्न दोष नव्हे गुण होताहेत!"

युक्तोऽसि भुवनभारे मा वक्रां वितनु कंधरां शेष ॥
त्वय्येकस्मिन् कष्टे सुखितानि भवंति भुवनानि १४०

"हे शेषा! तुझ्यावर अवघ्या भुवनाचा भार आहे; तरी तू आपली मान भारावल्यानें दुःख मानून ती वाकडी करूं नको. कारण, तुला एकट्याला कष्ट होऊन त्यावर सगळ्या जगतास सुख होत आहे!" ही अन्योक्ति होय.

रविरपि न दहति तादृक् यादृक् संतपति वालुकानिकरः ॥
अन्यस्माल्लब्धपदः प्रायो नीचोऽपि दुःसहो भवति ॥१४१॥

"पहा काय चमत्कार आहे! प्रत्यक्ष सूर्यापासूनही इतका ताप होत नाहीं; पण या वाळूंत पायाला काय चटके बसताहेत! तस्मात् नीच (क्षुद्र) जो आहे त्यास दुसऱ्यापासून अधिकार मिळाला असतां मूळच्या धन्याहूनही तो दुःसह होतो!"

वाग्वादश्चार्थसंबंधः परोक्षे दारभाषणम् ॥
यदिच्छेद्विपुलां मैत्रीं त्रीणि तत्र न कारयेत् १४२

"ज्यास कोणाशीं निरंतर स्नेह ठेवावयाचा असेल त्यानें त्याशीं पुढील तीन गोष्टी करूं नयेत—एक वाग्वाद म्हणजे वाद घेऊन भांडत बसणें; दुसरा, अर्थसंबंध म्हणजे पैशाचें देणें घेणें करणें; आणि तिसरा त्याच्या परोक्ष त्याच्या बायकोशीं बोलणें!"

त्वत्कीर्तिमौक्तिकफलानि गुणैस्त्वदीयैः ।
संदर्भितुं विबुधवामदृशः प्रवृत्ताः ॥
नांतो गुणेषु तव कीर्तिषु रंध्रलेशो ।
हारो न जात इति ताश्च मिथो हसंति १४३

कोणी भाट राजाचा स्तव करतो:— "हे राजा! तुझ्या कीर्ति हींच कोणी मुक्ताफळें तीं तुझ्या गुणांशीं (दोन्ही अर्थ प्रसिद्ध आहेत) ओंवण्यास देवांगना लागल्या. पण गुण हातीं घेऊन पहातात तों त्यास अंतच नाहीं, आणि की

नींस लहानही रंध्र नाहीं, हें पाहून हार करावा तरी कसा असें ह्मणून आपल्या आपल्यांतच त्या हसूं लागल्या !"

मंदरेण मथितोऽसि न पापिन् ग्रासितोऽसि तमसा न दुरात्मन् ॥
त्वां शरेण शतधा परिभिन्द्ये जानकीमुखसमो यदि न स्याः १४४

हनूमन्नाटक.

विरही राम चंद्राची निर्भर्त्सना करतो :— "हे दुष्टा! तुला मंदरपर्वतानें घुसळून कसा टाकला नाहीं; व राहूनें गिळला कसा नाहीं! अरे, जर तूं जानकीच्या मुखासारखा नसतास तर तुला या क्षणीं शरानें शतधा विदीर्ण करून टाकला असता!"

कांतं वक्ति कपोतिकाऽकुलतया नाथांतकालोऽधुना।
व्याधोऽधो धृतचापसज्जितशरः श्येनः परिभ्राम्यति॥
इत्थं सत्यहिना स दष्ट इषुणा श्येनोऽपि तेनाहतः ।
तूर्णं तौ तु यमालयं प्रति गतौ दैवी विचित्रा गतिः १४५

"कपोतिका आपल्या नवऱ्यास ह्मणते, 'हे प्रिया! आतां या संकटांतून आपण वांचत नाहीं. पहा, तो पारधी धनुष्यास बाण लावून खालीं उभा आहे; आणि उडून जावें तर ससाणा भोंवताली भराऱ्या मारतो आहे!' असें ती बोलते आहे तों व्याधास सर्पदंश झाला, आणि त्यामुळें त्याचा नेम चुकून ससाण्यासच बाण लागला. याप्रमाणें ते दोघे तत्क्षणीं यमसदनास जाऊन तो पक्ष्यांचा बिचारा जोडा भयमुक्त होत्साता आनंदानें उडून गेला! तस्मात् दैवगति विचित्र!"

हृदयानि सतामेव कठिनानीति मे मतिः ॥
खलवाग्विशिखैस्तीक्ष्णैर्भिद्यंते न मनाग्यतः १४६

"सज्जनांचीच अंतःकरणें अत्यंत कठोर असें मला वाटतें; कां तर दुष्टांच्या तीक्ष्ण वाग्बाणांनीं ही जीं यत्किंचित्‌ही भंग पावत नाहींत!"

गंगा पापं शशी तापं दैन्यं कल्पतरुस्तथा ॥
पापं तापं च दैन्यं च सद्यः साधुसमागमात् १४७

सज्जनांच्या समागमाचें माहात्म्यः— "गंगा पातकाचें हरण करते, चंद्र ताप घालवितो, आणि कल्पवृक्ष दारिद्र्य नाहींसें करतो. पण साधूचा समागम होतांच पाप, ताप, आणि दैन्य हीं तिन्हीं दूर होतात!"

कांतोऽसि नित्यमधुरोऽसि रसाकुलोऽसि ।
किंचासि पंचशरकार्मुकमद्वितीयम् ॥
इक्षो तवास्ति सकलं परमेकमूनं ।
यत्सेवितो भजसि नीरसतां क्रमेण ॥ १४८ ॥

कोणी कवि वाट्याकाशीं ऊसास बोलून अन्योक्तीनें राजास म्हणतो:—
"हे ऊसा! तूं देखणा आहेस. तसेंच मधुर व रसानें परिपूर्ण असा असतोस; फार काय सांगावें. तूंच कामदेवाचें एक धनुष्य होस. पण तुझ्याठायीं एकमात्र उणें आहे कीं, उत्तरोत्तर नीरस (रसहीन— आदरशून्य) होत जातोस!"

अनधिगतमनोरथस्य पूर्वं । शतगुणितेव गता मम त्रियामा ॥
यदि तु तव समागमे तथैव । प्रसरति सुभ्रु ततः कृती भवेयं १४९

विक्रमोर्वशी.

नायक नायिकेस म्हणतो:— "हे सुभ्रु! असाध्य मनोरथ असतां माझी रात्र जशी शतगुणित झाल्याप्रमाणें जात असे, त्याचप्रमाणें तुझ्या समागमांत ही ती जाईल, तर मग माझ्यासारखा धन्य कोण?"

रे रे घरट्ट मा रोदीः कं कं न भ्रामयत्यमूः ॥
कटाक्षवीक्षणादेव कराकृष्टस्य का कथा १५०

"हे रहाटा! या स्त्रिया केवळ कटाक्षनिक्षेपानेंही कोणास भ्रमण करावयास लावीत नाहींत? मग तुला तर हा करांनीं ओढते आहे; तेव्हां तुझी दुर्दशा तर काय पुसावी! तूं उगीच कशाला दीनवाणा आक्रोश करतोस?"

मूर्खस्य पंच चिन्हानि गर्वी दुर्वचनी तथा ॥
हठी चाप्रियवादी च परोक्तं नैव मन्यते १५१

"मूर्खाचीं हीं पांच चिन्हें होत:— गर्वानें फुगून जाणें, दुसऱ्यास टाकून बो-

लणें, आपलाच हेका धरून बसणें, अप्रिय भाषण करणें, आणि दुसऱ्याचें बोलणें न ऐकणें!"

इंदीवराक्ष्याः स्फुटविद्रुमोष्ठ्याः। संकेतमुद्दिश्य वने चरंत्याः॥
चौरैः समस्ताभरणानि हृत्वा। नासामणिं नापहरंति चित्रं १५२

"कोणी स्त्री वनांत भेटण्याविषयीं आपल्या वल्लभाशीं संकेत करून तिकडे जात होती. या स्त्रीचे डोळे नीलकमलासारखे काळे भोर होते. व तिच्या ओठांवर पोंवळ्याची लाली होती. फिरतां फिरतां एकदम तिला चोरांनीं गांठलें. आणि तिचे सर्व दागिने बुचाडून नेले; पण एक नथ मात्र नेली नाहीं! काय चमत्कार आहे!" - वरील दागिनाच तेवढा चोरांनीं कां ठेवला याचा हेतु कवीनें पहिल्या चरणांत गर्भित केला आहे. तो हा कीं, नथेच्या मोत्यावर वरून डोळ्यांची नीलवर्ण प्रभा व खालून ओठांचा रक्तवर्ण पडून ते त्यांच्यांत प्रतिबिंबित झाल्यामुळें गुंजाफळांचा भ्रम होऊन चोरांनीं त्यास हात घातला नाहीं! कल्पना मोठ्या मौजेची आहे खरी; पण वरील श्लोकावर असंभव अतिशयोक्तीचा दोष राहतो.

वाणी ममैव सरसा यदि रंजयित्री। न प्रार्थये रसविदामवधानदानं ॥
सायंतनीषु मकरंदवतीषु भृंगाः। किं मल्लिकासु परयंत्रणमारभंते १५३

"माझी वाणीच जर सरस व रंजन करणारी आहे, तर रसिकांस अवधान देण्याविषयीं मला प्रार्थना करणें नलगे; पहा कीं, सायंकाळीं प्रफुल्लित झालेल्या ज्या मकरंदयुक्त अशा मल्लिका त्यांस भ्रमरगण आपल्या ठायीं सक्त करण्यास दुसरी तजवीज कांहीं करावी लागते काय?"

प्रहारितोऽपि मार्जारस्तमाखुं नैव मुंचति ॥
बहुधा बोधितो मूर्खस्तमाखुं नैव मुंचति १५४

"मांजर उंदरावर टपून बसलें असतां त्यास मारलें तरी तें त्यास सोडीत नाहीं; तसाच मूर्खास कितीही पढविला तरी तो तमाखु सोडीत नाहीं!"

गुरुमेकं पुरस्कृत्य शून्यात्मानोऽपि साधकाः ॥
भवंति तं विना नैव यथा संख्यांकबिंदवः॥ १५५॥

कोणी चांगला मनुष्य पुढारी झाला असतां बाकीचे लोक तुसते त्योणीर नर-तीला असले तरी ते कार्य-साधक होतात; तो नसेल तर त्यांच्या हातून कांहीं व्हावयाचें नाहीं. जसें अंकगणितांतील आंकडे आणि शून्यें; शून्यास जी किंमत येते ती मागील आंकड्यांनीं; ते नसतील तर तीं शून्येंच !"

आघ्रातं कमलं प्रियेण सुदृशा स्मित्वाऽपनीतं मुखं।
दत्तं विभ्रमकंदुके नखपदं सीत्कृत्य गूढौ स्तनौ ॥
दत्ता चंपकमालिकोरसि तया मोद्भिन्नरोमांचया ।
भालल्लोचनया स्थितं प्रणयिनो दूरेऽपि पूर्णं रहः १५६

"प्रियानें कमलाचा वास घेतला असतां, त्यानें त्याचा भाव समजून हंसून एकीकडे तोंड केलें; त्यानें तीला कंदुकावर नखपदाचें चिन्ह केलें असतां तिनें दंतसीत्कार करून पदर नीट सरसावून घेतला; आणि जेव्हां जेव्हां चंपकपुष्पाची माळा त्यानें आपल्या उरावर धरली, तेव्हां रोमांचित होऊन व ओठ मिटून ती प्रियापासून दूर असतां तशीच जागच्या जागीं स्तब्ध होऊन राहिली !"

गुणदोषौ बुधो गृह्णन्निंदुक्ष्वेडाविवेश्वरः॥
शिरसा श्लाघते पूर्वं परं कंठे नियच्छति १५७

"जो सुज्ञ आहे तो दुसऱ्याच्या कृतींतील गुण व दोष दोन्हीही घेतो, कीं त्याप्रमाणें शंकरानें चंद्र व विष हीं दोन्हींही ग्रहण केलीं: पण त्याप्रमाणें शिवानें एकाला मस्तकीं धारण केला व दुसऱ्यास आपल्या कंठाचे ठायीं ठाव दिला, त्याप्रमाणें वरील सुज्ञजन गुणाची श्लाघा करून दोष मनांत ठेवतो."

अयं मे वाग्गुंफो विशदपदवैदग्ध्यमधुरः ।
स्फुरद्बंधो बंध्यः पशुहृदि कृतार्थः कविहृदि ॥
कटाक्षो वामाक्ष्या दरदलितनेत्रांतकलितः।
कुमारे निःसारः स तु किमपि यूनः सुखयति १५८

"समस्तार्थ पदांच्या रचनाचातुर्येंकरून युक्त व मनास चमत्कार देणारा असा माझा काव्यप्रबंध पशु म्हणजे जो अरसिक आहे त्याच्या हृदयांत निष्फळ होईल; पण तोच कवीच्या म्हणजे रसिकाच्या हृदयांत सफळता पावेल. कसा? कीं असा :-

सुंदरीच्या नेत्रांनीं किंचित आकुंचित करून फेंकलेला कटाक्ष भर्मकाचे हातीं निःसार होऊन तरुणास अतिशयेंकरून स्मरमद होतो!"

स्त्रीनांमुर्मुखमुत्पले तव दृशौ पद्मानुकारौ करौ ।
रंभागर्भनिभं तथोरुयुगुलं बाहू मृणालोपमौ ॥
इत्याल्हादकराखिलांगि रभसान्निःशंकमालिंगमा-
मंगानि त्वमनंगतापविधुराण्येह्येहि निर्वापय १५९

रत्नावली.

नायकाची नायिकेशीं गांठ पडली असतां तो तीस उद्देशून ह्मणतो :—

"हे वल्लभे! तुझें मुख चंद्र होय, डोळे कमळें होत, तुझे हात रक्तकमळांसारखे आहेत, तुझें ऊरुयुगुल केळीच्या गाभ्यासारखें आहे, आणि बाहु कमळाच्या देंठाप्रमाणें आहेत. तर याप्रमाणें सर्वांगांनीं आल्हाद करणारी अशी जी तूं ती-मला निःशंकपणें सत्वर आलिंगन दे; आणि मदनतापानें पीडिलेल्या माझ्या गात्रांस शीतळ कर. चल ये लौकर!"

घृष्टं घृष्टं पुनरपि पुनश्चंदनं चारुगंधं ।
छिन्नं छिन्नं पुनरपि पुनः स्वादु चैवेक्षुदंडं ॥
दग्धं दग्धं पुनरपि पुनः कांचनं कांतवर्णं ।
न प्राणांते प्रकृति विकृतिर्जायते चोत्तमानां १६०

"चंदन पुनः पुनः घांसलें तरी त्याचा मनोहर गंध येतो; ऊंस पुनःपुनः तोडला तरी त्याचीं कांडीं गोडच लागतात; तसेंच सोनेंही वारंवार तापविलें तरी त्याचा सुंदर वर्ण जात नाहीं: तेव्हां तात्पर्य काय कीं, जे उत्तम पुरुष असतात त्यांच्या प्रकृतीस प्राणांतींही विकार होत नसतो!"

वदनं दशनविहीनं वाचो न परिस्फुटा गता शक्तिः ॥
अव्यक्तेंद्रियशक्तिः पुनरपि बाल्यं कृतं जरया १६१

"जरेनें पुनः बाल्यावस्था प्राप्त केली. कशी? तर मुख दंतविरहित झालें; वाणी अस्पष्ट झाली; शक्ति गेली; आणि सगळ्या इंद्रियांचें सामर्थ्य अव्यक्त झालें!"

यथा चित्तं तथा वाचो यथा वाचस्तथा क्रियाः ॥

चित्ते वाचि क्रियायां च साधूनामेकरूपता १६२

“जसें [illegible] तशी वाणी, आणि जशी वाणी तशीच कृति; याप्रमाणें जे सज्जन [illegible], त्यांचें चित्त, वाणी, आणि क्रिया हीं तिन्ही एकरूप असतात।”

दंपत्योर्निशि जल्पतोर्गृहशुकेनाकर्णितं यद्वचः ।
तत्प्रातर्गुरुसन्निधौ निगदतस्तस्योपहारं वधूः ॥
कर्णालंबितपद्मरागशकलं विन्यस्य चंचूपुटे ।
व्रीडार्ता प्रकरोति दाडिमफलव्याजेन वाग्बंधनं १६३

अमरुशतक.

“स्त्रीपुरुषांचें रात्रीचें बोलणें चाललें असतां तें घरांतील राघूनें ऐकून तें दुसऱ्या दिवशीं सकाळीं वडील माणसां देखत तो बोलूं लागला. तेव्हां स्त्रीस लज्जा प्राप्त होऊन तिनें आपल्या कानांतील माणकाचा दागिना काढून डाळिंबाच्या मिषानें पोपटाच्या तोंडांत दिला. आणि त्याचें तोंड बंद करून टाकलें।”

एको देवः केशवो वा शिवो वा । एकं मित्रं भूपतिर्वा यतिर्वा ॥
एको वासः पत्तने वा वने वा । एका भार्या सुंदरी वा दरी वा १६४

“कोणता तरी एक देव असावा, केशव कीं शिव; एक मित्र असावा राजा किंवा यति; रहावें, तर एक शहरांत किंवा वनांत; आणि स्त्री म्हटली तर एक सुंदरी तरी असावी, किंवा आपली दरी [illegible]करावी (म्हणजे अरण्यवास करावा)।”

पवनचपलवेगः स्थूलधाराशरौघः। स्तनितपटहनादः स्पष्टविद्युत्पताकः॥
हरति करसमूहं खे शशांकस्य मेघो। नृप इव पुरमध्ये मंदवीर्यस्य शत्रोः १६५

मृच्छकटिक.

मेघावर परचक्राचें रूपकः— “वाऱ्यानें ज्याचा वेग तीव्र झाला आहे, मोठ्या धारा हेंच ज्याची शरपंक्ति आहे, गर्जना हाच ज्याचा पटहनाद होय, विजेचें स्फुरण हेंच ज्याची पताका फडफडते आहे, असा मेघ आकाशाचे ठायीं चंद्राच्या करसमूहाचें (किरण समुदायाचें, पक्षीं करभाराचें) हरण करीत आहे; कीं ज्याप्रमाणें दुर्बळ झालेल्या शत्रूस त्याच्या नगरींत गांठून एखादा राजा त्याची दुर्दशा

माघश्चोरो मयूरो मुररिपुरपरो भारविः सारविद्यः ।
श्रीहर्षः कालिदासः कविरथ भवभूत्याह्वयो भोजराजः ॥
श्रीदंडी डिंडिमाख्यः श्रुतिमुकुटगुरुर्भल्लटो भट्टबाणः ।
ख्यातश्चान्ये सुबंध्वादय इह कृतिभिर्विश्वमाल्हादयंति १६६

विश्वगुणादर्श.

संस्कृत कवींची माला :— " माघ, चोरकवि, मयूर, मुरारी, उत्तम विद्या पढलेला असा भारवी, श्रीहर्ष, कालिदास, भवभूति, भोजराजा, दंडी, डिंडिम, वेदविद्यागुरु असा भल्लट, बाणभट्ट, आणि सुबंधु आदिकरून इतर दुसरे कविही आपल्या कृतींनीं विश्वास आल्हाद देतात. "

यस्याश्चोरश्चिकुरनिकरः कर्णपूरो मयूरो ।
भासो हासः कविकुलगुरुः कालिदासो विलासः ॥
हर्षो हर्षो हृदयवसतिः पंचबाणस्तु बाणः ।
केषां नैषा कथय कविताकामिनी कौतुकाय १६७

जयदेव.

" ज्या कविता वधूचा चोर हा चिकुर निकर ( केशपाश ), मयूर हा कर्णपूर ( कर्णभूषण ), भास हा हास ( हास्य ), कविकुलाचा केवल गुरुच ह्मणजे कविश्रेष्ठ जो कालिदास तो जिचा विलास, हर्ष हा हर्ष ( चित्ताचा उल्हास ) आणि बाण हा जिच्या हृदयांत संचार करणारा साक्षात् पंचबाण ( मदन ) होय. ती कोणाच्या चित्तास मोहून टाकीत नाहीं ! "

साक्षी पाणिनिपीडनस्य कुचयोराजन्मबंधुश्च मे ।
मुद्रांकोऽप्यमनंगलेखविधिषु द्यूतग्रहे बंधकः ॥
अंतःशून्यमिव प्रियेण हृदयं पूर्णं मया प्रेषितं ।
चक्षुर्मंगलमंगुलीयकमणिः सोऽयं चिराद्दीक्ष्यते १६८

कोणी विरही पुरुषानें आपल्या स्त्रीचें कांहीं सांत्वन करण्याकरतां तिजकडे आपली आंगठी पाठविली. तिजकडे पाहत असतां तिच्या सखीनें विचार-

त्यावरून तो सांगतो :—

" हा अंगुलीयमणि उरोजनिपीडनाचा साक्षी होय. याची आणि माझी विवाहापासून आजपर्यंत सारखी मीन जडली आहे, मदनलेखांचे प्रसंगीं मुद्रण करण्यास हाच उपयोगी पडे. आणि द्यूताचे प्रसंगीं हा पणाचे जागीं होई; तर माझ्या प्रियानें विरहोत्कीर्ण आपलें हृदयच जणों काय असा जो हा मणि पाठविला आहे त्याकडे केव्हांपासून मी मोठ्या प्रेमानें बघतें आहें ! "

विकृतिं नैव गच्छंति दुष्टसंगेन साधवः ॥
आवेष्टितो महासर्पैश्चंदनः किं विषायते १६९

" दुष्टांची निरंतर संगति असतांही साधु विकृतीतें पावत नसतात. पहा मोठ्या मोठ्या सर्पांनीं सदा वेष्टिलेला असतांही चंदन विषारी होतो काय? "

यत्रस्तत्रैव वक्तव्यं यत्रोक्तं सफलं भवेत् ॥
स्थायीभवति चात्यंतं रंगः शुक्लपटे यथा १७०

" त्याच ठिकाणीं भाषण करावें की जेथें त्याची सफलता होईल, आणि तें पूर्णपणें ठसून राहील; की जसा पांढऱ्या कापडावर रंग चांगला उमटतो ! "

क्षणं सरलवीक्षणं क्षणमपांगसंवीक्षणं ।
क्षणं रजसि खेलनं क्षणमतीव भूषादरः ॥
क्षणं द्रुततरा गतिः क्षणमतीव मंदा गतिः ।
क्षणक्षण विलक्षणं जयति चेष्टितं सुभ्रुवः १७१

कवि मुग्धावस्थेचे विलास वर्णितो :— " क्षणभर सरळ पाहणें, क्षणभर वांकून पाहणें. क्षणभर धुळींत खेळणें, क्षणभर दागदागिन्यांची हौस करणें; क्षणभर सत्वर चालणें. क्षणभर मंदगति दाखविणें; याप्रमाणें यौवनांत पेऊं लागणाऱ्या स्त्रीचे विलास क्षणोक्षणीं विलक्षण दिसून येतात ! "

**मार्तंडमंडलनिभं भवतः प्रतापं। ये वर्णयंति नहि ते कवयः प्रवीणाः॥**
**अंभोनिधौ विलयमेति परं पतंगः। पारं प्रयाति जलधेश्च भवत्प्रतापः १७२**

**" हे राजा ! तुझा प्रताप सूर्यमंडळासारखा आहे असें जे कवि वर्णन करितात**

ते मूढ होत; कां कीं, सूर्याचें तेज तो समुद्रांत बुडाला ह्मणजे विलयास पावतें; आणि तुझा मनाप तर समुद्राच्याही पलीकडे जातो !"

गुणवानपि नोपयाति पूजां। पुरुषः सत्पुरुषैरकथ्यमानः।
न हि सौरमणिः स्वभाव कांतिं। रविपादैरनिधिष्ठितः करोति १७३

"पुरुष स्वतः जरी मोठा गुणवान् असला, तरी थोरांनीं जोंवर त्याची प्रशंसा केली नाहीं तोंपर्यंत तो लोकमान्यतेस पात्र होत नाहीं. पहा कीं, सूर्यकांत स्वभावतः तेजस्वी असतांही सूर्यकिरणांच्या अधिष्ठानाशिवाय त्याचें तेज बाहेर पडत नाहीं!"

पात्रापात्र विवेकोऽस्ति धेनुपन्नगयोरिव ॥
तृणात्संजायते क्षीरं क्षीरात्संजायते विषं १७४

"दान करते समयीं पात्रापात्र विचार जो करावा लागतो त्याचा प्रकार असा आहे:— पहा, गायीला गवत घातलें तर त्यापासून दूध उत्पन्न होतें; आणि सर्पाला दूध घातलें तर त्याचें विष होतें!"

आशा ये दासास्ते दासाः सर्वलोकस्य ॥
आशा येषां दासी तेषां दासायते लोकः १७५

"जे धनतृष्णेचे दास ते साऱ्या लोकांचे दास होतात; आणि आशा ज्यांची दासी ह्मणजे धनप्राप्तीविषयीं जे केवळ उदासीन असतात त्यांचें दास्य सर्वलोक करतात."

दोषाकरः शिरसि तेऽस्ति गले द्विजिह्वो। पाषाणजा सहचरी पशुरांतरंगः॥
दुःखं निवेदयति को मम दीनबंधो। त्वं चेत्त्रिलोचन निमीलितलोचनोऽसि १७६

कोणी भक्त शिवास ह्मणतो —— "हे त्रिलोचना! दोषाकर (चंद्र—पक्षीं, दोषमय) तर तुझ्या शिरीं आहे, कंठभागीं द्विजिह्व (सर्प; चहाड) आहे, तुझी सखी पाषाणजा (पर्वतकन्या; व पाल्लव अर्थांतच कठोरहृदयाची) होय, आणि तुझा मोठा विश्वासुक सेवक तो पशु (नंदी) आहे; मग इतकें असून तूंही जर डोळे मिटून राहशील (ध्यानस्थ असशील), तर हे दीनबंधो! माझें दुःख तुला कोण घेऊन सांगेल?"

असद्भिः शपथेनोक्तं जले लिखितमक्षरं ॥
सद्भिस्तु लीलया प्रोक्तं शिलालिखितमक्षरं १७७

" दुष्ट मनुष्यांनीं शपथपूर्वक सांगितलेलें अक्षरही पाण्यावरच्या रेघेसारखें होय; पण सज्जनांनीं सहज बोललेलें वचन शिळेवर लिहिल्याप्रमाणें !"

उद्योगः कलहः कण्डूर्द्यूतं मद्यं परस्त्रियः ॥
आहारो मैथुनं निद्रा सेव्यमानं तु वर्धते १७८

" उद्योग, कलह, खरूज, जुवा, मद्य, परस्त्री, भोजन, सुरत, निद्रा,—हीं सर्व जितकीं सेवावीं तितकीं वाढतात."

नक्षत्राणि बहूनि सन्ति परितः पूर्णोदयान्यम्बरे ।
तैः किं शान्तिमुपैति दीर्घतिमिरं किं वार्धिरुज्जृम्भते ॥
किं स्यादार्तचकोरगारणविधिस्त्वं तैः सुधादीधिते ।
तन्नूनं भुवनैकतापशमनः श्लाघ्यस्त्वमेवोदयः ॥१७९॥

" आकाशांत चोहोंकडे पुष्कळ नक्षत्रें पूर्ण उदयास पावून लकाकताहेत पण त्यांच्या योगानें गर्द्यांचा निबिड अंधकार लयास जाईल काय? समुद्र वर उचंबळेल काय? व तृषित जे चकोर त्यांचें समाधान होईल काय? — यास्तव हे मित्रा चंद्रा! केवळ तुझाच उदय भुवनाच्या तापशमनार्थ अपेक्षित आहे, व तोच श्लाघ्य होय!"

निद्रामीलितलोचनो मृगपतिर्यावद्गुहां सेवते ।
तावत्स्वैरममी चरन्तु हरिणाः स्वच्छन्दसंचारिणः ॥
उन्निद्रस्य विधूतकेसरसटाभारस्य निर्गच्छतो ।
नादे श्रोत्रपथं गते गतधियः सन्त्वेव दीर्घायुषः ॥१८०॥

" जोंपर्यंत सिंह हा निद्रिस्त होत्साता गुहेचा आश्रय करून आहे, तोंवर हे स्वच्छंद संचार करणारे हरिण चोहोंकडे फिरोत; पण तो जागा होऊन व आपलें आयाळ झाडून बाहेर निघाला असतां व त्याची गर्जना कानीं पडली असतां हे मूढ मृग दीर्घायु असोत म्हणजे झालें !"

हस्तन्यस्ते वदनमलकानायतान् बाहुमूले ।
द्वारे स्वैरं नयनमधरे तर्जनीं सन्निधाय ॥
दीर्घोच्छ्वासं विरतविषयास्वादमुत्कंठितोष्णं ।
मुग्धाक्षी त्वां हृदि विदधती बाष्पमाविष्करोति १८१

विरहिणीचें वर्णनः——— " हातावर तोंड टेकून, केश खांद्यावरून मोकळे सोडून, अधरोष्ठावर तर्जनी ठेवून, उत्कंठितत्वामुळें दीर्घ व उष्ण निःश्वास टाकणारी, व विरक्त झालेली, अशी ती सुंदरी केवळ तुझा निदिध्यास घेऊन अश्रुयुक्त होत्साती वारंवार दाराकडे पहात आहे ! "

ब्रह्मन्नध्ययनस्य नैष समयस्तूष्णीं बहिस्स्थीयतां ।
स्वल्पं जल्प बृहस्पते जडमते नैषा सभा वज्रिणः ॥
वीणां संहर नारद स्तुतिकथालापैरलं तुंबुरो ।
सीतारल्लकभल्लभग्नहृदयः स्वस्थो न लंकेश्वरः ॥१८२॥

सीतेनें तिरस्कार केला असतां अस्वस्थहृदय झालेला असा रावण विरहज्वरानें मदनपीडित होत्साता तळमळत होता. तेव्हां त्याचे द्वारपाळ बाहेर जाऊन देवांस धमकावितातः—— " ब्रह्मदेवा ! ही अध्ययनाची वेळ नव्हे, बाहेर मुकाट्यानें बसावें; बृहस्पते ! मूर्खासारखी बडबड किती करतोस, ही कांहीं इंद्राची सभा नव्हे, आपलें पांडित्य अंमळ पुरें कर; नारदा ! तूं आपली वीणा आटोप :- हे तुंबुरो ! स्तुतिपाठ सध्यां बस कर. कां तर, महाराजांची स्वारी सीतेच्या पल्लवरूप भाल्यानें विद्धहृदय झाली असून त्यांस आज चैन नाहीं ! "

आवृणोति यदि सा मृगीदृशी । स्वांचलेन कुचकांचनाचलं ॥
भूय एव बहिरेति गौरवा-दुन्नतो न सहते तिरस्क्रियां १८३

" ही मृगनयना आपल्या कुचरूप कांचनपर्वतास जरी पदरानें झांकित आहे तरी तो गौरवामुळें पुनः प्रकट होऊं पहातोच; सारांश, स्वभावेंकरूनच जो उन्नत असतो त्यास अपमान कधीं सहन होत नसतो ! "

पत्नाराः शिरसा न केन विधृताः पृथ्वीभृतां मध्यतः ।
तस्मिन् भास्वति राहुणा कवलिते लोकत्रयीचक्षुषि ॥

**खद्योतैः स्फुरितं तमोभिरुदितं ताराभिरुज्जृंभितं ।**
**घूकैरुत्थितमाः किमत्र करवै किं केन नो चेष्टितं १८४**

" जगत्रयाचा चक्षु जो तेजस्वी सूर्य, कीं ज्याचे पाद (पाय–किरण) पर्वतश्रेष्ठांनींही शिरसावंद्य केले, त्याचा राहूनें क्षणमात्र ग्रास केला असतां काय काय चमत्कार झाले पहा! — काजवे चमकूं लागले, गिरिकंदरांत दडलेला अंधकार पुनः पुढें सरसावला, तारे उदय पावले; फार काय सांगावें, क्षुद्रवैरी जे घूक ते सुद्धां उठले!" हा अर्थानच अन्योक्ति होय.

दातुरुन्नतचित्तस्य गुणयुक्तस्य चार्थिनः ॥
दुर्लभः खलु संयोगः सद्बीजक्षेत्रयोरिव १८५

" मोठा श्रीमंत दाता आणि सत्पात्र अर्थी यांचा संयोग उत्तम बीज आणि उत्तम क्षेत्र यांच्याप्रमाणें मोठा दुर्लभ होय."

दिगंते खेलंती सरसहृदयानंदजननी ।
मया नीता भोजक्षितिपनगरीमंब कविते ॥
अकस्माद्दुर्मीलत्खलवदनवल्मीकरसना– ।
भुजंगी दष्टांगी शिवशिव समाप्तिं गतवती १८६

" हे माते कविते! तूं जी दिगंतीं भ्रमण करणारी व रसिकांच्या हृदयास आनंद देणारी त्या तुला मी भोजराजाच्या नगरास नेली; पण तेथें अकस्मात् खलवदनरूप वारुळांतून जिव्हारूप नागीण निघून तिनें तुला दंश केला, आणि तुझा अंत झाला! हरहर! "

पिंडे पिंडे मतिर्भिन्ना कुंडे कुंडे नवं पयः ॥
जातौ जातौ नवाचारा नवा वाणी मुखे मुखे १८७

" मनुष्या मनुष्याची बुद्धि निराळी असते; कुंडा कुंडांत निरनिराळ्या प्रकारचें पाणी असतें; दरएक जातीचे निराळे आचार असतात; आणि निरनिराळ्या लोकांची निरनिराळी भाषा असते. "

**नहि ज्येष्ठस्य ज्येष्ठत्वं गुणे ज्येष्ठत्वमुच्यते ॥**

केतकीवरपत्रेषु लघुपत्रस्य गौरवं॥ १८७॥

" श्रेष्ठत्व जें गणिलें जातें तें वयावरून नव्हे, तर गुणावरून गणतात. पहा! केवड्याच्या पानांत जें अत्यंत लहान असतें त्याची योग्यता विशेष ! "

यदि स्मरामि तन्वंगीं जीविताशा कुतो मम॥
अथ विस्मृत्य जीवामि जीवितव्यसनेनकिं १८८

कोणी विरही पुरुष ह्मणतो —— " प्रियतमेचें स्मरण जर माझ्या हातीं राहील, तर मग वांचण्याची आशा नकोच; आणि तिचें विस्मरण पडून जर मी जीवंत राहीन, तर मग तें जिणें केवळ भारवद्ध होय! "

ऋषीणांच नदीनांच कुलानांच महात्मनां॥
प्रभवो नाधिगंतव्यः स्त्रीणां दुश्चरितस्यच १८९

" ऋषि, नद्या, आणि थोर पुरुषांचें कुळ यांचें मूळ शोधीत बसूं नये; त्याप्रमाणें स्त्रियांच्या दुराचरणाचेंही. " *

नैव व्याकरणज्ञमेव पितरं न भ्रातरं तार्किकं ।
मीमांसानिपुणं नपुंसकमिति ज्ञात्वा निरस्तादरा॥
दूरात्संकुचितेव गच्छति पुनश्चांडालवच्छांदसं ।
काव्यालंकरणज्ञमेव कविताकांता वृणीते स्वयं॥१९०॥

" कविताकांता ही वैयाकरणास पित्यासमान व तर्कशास्त्र भ्रात्यासमान मानून त्यांचा अंगीकार करीत नाहीं. मीमांसकास तर षंढ समजून त्याचा तिरस्कार करते, आणि वैदिकाचा तर चांडालाप्रमाणें विटाळ मानून त्यापासून संकोच पावून दूर निघून जाते; परंतु काव्यालंकार जाणणारास मात्र आपण होऊन वरते ! "

उद्दंडे भुजदंडे तव कोदंडे परिस्फुरति ।
अरिमंडलरविमंडलरंभाकुचमंडलानि वेपंते १९१

" हे राजा! तुझ्या सबळ भुजदंडावर धनुष्य चढलें असतां शत्रूंचें मंडळ, सु-

---

* कोठें कांत ह्मण आहे, " नदीचें मूळ आणि ऋषीचें कूळ हीं पाहूं नयेत. "

र्यमंडळ, आणि रंभेचें कुचमंडळ, हीं तिन्ही कंपायमान होतात." म्हणजे शत्रूंचा थरकांप होतो, सूर्यास रजःपटलाचा धाक पडतो, आणि रंभादि अप्सरा भावी वीरालिंगनाची उत्प्रेक्षा करून हर्षकंपित होतात.

किं जन्मना महति किं पितृपौरुषेण ।
शक्त्यैव याति विजयी पुरुषः प्रतिष्ठां ॥
कुंभो हि कूपमपि शोषयितुं न शक्तः ।
कुंभोद्भवेन मुनिनांबुधिरेव पीतः ॥१९२॥

"मोठ्या कुळांत जन्म पावून काय उपयोग आहे? व बापाचा पराक्रम मुलाच्या काय कामाचा? पुरुष जो प्रतिष्ठा पावतो तो स्वतःच्यान सामर्थ्यावरच पावतो. पहा कीं, मातीच्या घड्यास विहीर सुद्धां शोषून टाकण्याची शक्ति नसते, पण त्यापासून जन्म पावलेला जो मुनि अगस्त्य, त्यानें समुद्रा येवढा प्राशन करून टाकला!"

वेश्यानामिव विद्यानां मुखं कैः कैर्न चुंबितं ॥
हृदयग्राहिणस्तासां द्वित्राः संति न संति वा १९३

"वेश्यांप्रमाणें विद्यांचें मुखचुंबन नुसतें कोण करीत नाहीं? परंतु त्यांचें हृदय त्यांच्या हातीं लागलें आहे असे दोन तीनच असतात किंवा नसतात!"

स्वस्त्यस्तु विद्रुमवनाय नमो मणिभ्यः ।
कल्याणिनी भवतु मौक्तिकशुक्तिमाला ॥
प्राप्तं मया सकलमेव फलं पयोधे ।
यद्दारुणैर्जलचरैर्न विदारितोऽस्मि ॥१९४॥

"हे समुद्रा! तुझीं पोंवळ्यांचीं वनें स्वस्थ असोत; तुझ्या रत्नांस माझा नमस्कार असो; व मोतीं शिंपांचेंही निरंतर कल्याण असो; मला सगळें येवढ्यानें-च पावलें कीं, तुझ्या पोटांतल्या क्रूर जलचरांच्या तडाख्यांतून मी धडपणीं बर-निघून आलों!" ही अर्थात् अन्योक्ति होय.

नाते स्तनानां स्फुरतेऽङ्गनानां । स्तुतौ कवीनां समरे भटानां ॥
त्वंकारयुक्ता हि गिरः प्रयुक्ता । रसाधिकाश्चारुतरा भवंति १९५

" बापाशी मुलगा लडिवाळपणानें बोलत असतां, स्त्रियांच्या रतिप्रसंगीं, कवि राजाचें स्तोत्र गात असतां तसेंच योद्ध्यांच्या समरप्रसंगीं, 'तूं' या शब्दानें बोललेलीं भाषणें स्वाधिक होऊन अधिक रम्य होतात!"

ते वंद्यास्ते महात्मानस्तेषां लोके स्थिरं यशः ॥
यैर्निबद्धानि काव्यानि ये वा काव्ये प्रतिष्ठिताः १९६

" तेच वंद्य, तेच महात्मे, आणि त्यांचेंच यश लोकांचे ठायीं चिरकाल राहणारें आहे, कीं ज्यांनीं काव्यें रचलीं, किंवा जे त्यांत प्रतिष्ठित झाले आहेत, म्हणजे त्यांचें त्यांत यशोवर्णन केलेलें आहे."

रूपं स्फदर्शनं ते वदनं पद्मं च नंदको हासः ॥
वससि न हरेः करे किं त्वं किल कौमोदकी गोपि १९७

" हे गोपि! तुझें रूप स्फदर्शन ( दिसण्यास स्फरेस्य; पक्षीं, कृष्णाचें चक्र ) आहे; तोंड पद्म आहे, हास्य नंदक ( आनंदविणारें; पक्षीं, विष्णूचा खड्ग ) आहे, आणि तूं स्वतः कौमोदकी ( पद्मिनी; पक्षीं, विष्णूची गदा ) आहेस; मग हरीच्या करीं का रहात नाहींस?"

अविवेकान्पीडयतां स्थितमन्योन्यमंडलम् ॥
कुनृपाणां कुचानांच पतनाय समुच्छ्रयः ॥ १९८ ॥

" विवेकशून्यत्वास्तव एकमेकाच्या मंडलास पीडा करणारे ( पक्षांतरीं, निरंतरत्वास्तव परस्परसलग्न असणारे ) असे दुष्ट राजे व कुच यांची उन्नति झाली असतां त्यास पतन घडणारच!"

अकर्णमकरोच्छेषं विधिर्ब्रह्मांडभंगधीः ॥
श्रुत्वा रामकथां रम्यां शिरः कस्य न कंपते १९९

" ब्रह्मदेवानें शेषास कर्णहीन उत्पन्न केलें, कीं ब्रह्मांडाचा भंग होऊंनये; कारण रम्य जी रामकथा ती कानीं पडली असतां कोणाचें शिर आनंदानें कंपायमान होत नाहीं?"

आरोग्यं विद्वत्ता सज्जनमैत्री महाकुले जन्म ॥

स्वाधीनता च पुंसां महदैश्वर्यं विनाऽप्यर्थैः ॥२००॥

“ आरोग्य, विद्वत्त्व, सज्जनपुरुषांचा समागम, मोठ्या कुळांत जन्म आणि स्वतंत्रता, हीं पांच संपत्ती शिवाय पुरुषास मोठीं ऐश्वर्यें होत. ”

शूली जातः कदशनवशाद्भैक्ष्ययोगात्कपाली ।
वस्त्राभावाद्गगनवसनः स्नेहशून्याज्जटावान् ॥
इत्थं राजन् तव परिचयादीश्वरत्वं ममासं ।
तस्मान्मह्यं किमिति कृपया नार्द्धचंद्रं ददासि ॥२०१॥

कोणी एका कवीनें राजापुढें आपलें दैन्य प्रकट केलें असतांही त्यानें द्वारपालाकडून त्यास घालवून दिलें. तेव्हां तो उलटून राजास म्हणतो :——

“ हे राजा! मी कदन्नाच्या भक्षणें करून शूली ( शूलधारी- शूलव्यथित ) झालों; भिक्षा मागण्यानें कपाली ( कपालधारी शिव ) झालों; वस्त्रें नेसण्यास व पांघरण्यास नसल्यानें दिगंबर ( दोन्ही अर्थ प्रसिद्धच आहेत ) झालों; स्नेहाच्या ( तेलाच्या, प्रेमाच्या ) अभावामुळें जटाधर झालों; —— मग याप्रमाणें तुझ्या परिचयामुळेंच मला ईश्वरत्व ( राजत्व-शिवत्व ) प्राप्त झालें असतां तू कृपायुक्त होऊन मला अर्द्धचंद्र ( अर्धा, गचांडी ) देतोस यांत नवल कसचें! ”

न जाने संमुखायाते प्रियाणि वदति प्रिये ।
सर्वाण्यंगानि मे यांति नेत्रतां किमु कर्णतां २०२

कोणी स्त्री आपल्या सखीस सांगते —— “ प्रिय जवळ येऊन गोड गोड गोष्टी सांगूं लागला असतां माझे सर्व शरीरावयव नेत्र होतात कीं कर्ण होतात, हें मला कळत नाहीं. ” म्हणजे दोन्ही इंद्रियांच्या शक्ति सारख्याच वेधून जातात.

मारात्परः शूरतरो न कश्चित् । परापकारः स्त्रीहरणान्न चान्यः ॥
तथापि नाब्धिं प्रविवेश रामो । बबंध सेतुं विजयी सहिष्णुः २०३

“ मदनाहून दुसरा कोणी अधिक वीर नाहीं, व स्त्रीहरणाहून दुसरी अपमानकारक गोष्ट नाहीं; तरी रामानें उतावळेपणानें समुद्रांत उडी घातली नाहीं, तर धीर धरून सेतूचें बंधन केलें. ”

अदृष्टमुखभंगस्य युक्तमंधस्य याचितुम् ॥
अहो बत महत्कष्टं चक्षुष्मानपि याचते २०४

"आंधळेपणामुळें ज्यास मनुष्याची क्रोधचर्या दिसत नाहीं अशानें याचना केली असतां एक वेळ चालेल; पण ज्याला डोळे आहेत अशानें दैन्य भाकणें हें केवढें दुःखास्पद आहे!"

पयोधेः सर्वस्वं शिरसि धृतवान् यं नृपगणः ।
पणो यस्य क्षोणी चतुरुदधिसीमावधिरभूत् ॥
स एवायं दैवाच्छबरवनिताः पाणिपतितो ।
मणिर्मेषग्रीवा द्विगुणगुणबद्धो विहरति २०५

"जें रत्न समुद्राचें सर्वस्वभूत असून ज्यास मोठमोठे राजे मस्तकाचे ठायीं धारण करते झाले; आणि ज्याचें मोल समुद्रवलयांकित सकल पृथ्वी होती; तो दुर्दैवानें भिल्लिणीच्या हातीं लागला असतां मेंढ्याच्या गळ्यांत दोहेरी दोऱ्यानें बांधला जाऊन आतां विहार करीत आहे!"

आपातालगभीरे मज्जति नीरे निदाघ संतप्तः ॥
न स्पृशति पल्वलांभः पंजरशेषोऽपि कुंजरः क्वापि २०६

"हत्ती रोड होऊन अस्थिपंजररूप जरी झाला, तरी पातालापर्यंत खोल अशा डोहांतच ग्रीष्मकाळच्या शरीरदाहास शमविण्याकरितां बुडी मारतो; डबक्याच्या पाण्यास शिवतही नाहीं!"

क्षपाः क्षामीकृत्य प्रसभमपहृत्यांबु सरितां ।
प्रताप्योर्वी सर्वां तरुगहनमुच्छोष्य सकलं ॥
क्व संप्रत्युष्णांशुर्गत इति तदालोकनपरा- ।
स्तडिद्दीपालोके दिशि दिशि चरंतीव जलदाः २०७

**वर्षाकालांतील रात्रीचें वर्णनः—** "रात्रीस कृश करून टाकून, नद्यांचें पाणी बळेंच हरण करून, साऱ्या पृथ्वीस अत्यंत तप्त करून, झाडांचे कुंज सारे वाळवून टाकून, सूर्य कोणीकडे नाहींसा झाला म्हणून विद्युल्लतारूप दीपिका घेऊन

माझ्या दिशा भेय जणों काय शोधीत आहेत!"

स्वेदस्ते कथमीदृशः प्रियतमे त्वन्नेत्रवन्हेर्विभो ।
कस्माद्वेपितमंतरिंदुवदने भोगींद्रभीतेर्भवम् ॥
रोमांचः कथमेष देवि भगवन् गंगांभसः शीकरै- ।
रित्थं भर्तरि भावगोपनपरा गौरी चिरं पातु वः २०८

गौरीहरसंवादः— "हे प्रियतमे! तुझ्या अंगावर हे स्वेदबिंदु कशामुळे दि-सतात? हे विभो! तुझ्या नेत्राग्नीच्या योगानें: हे इंदुवदने! हा कंप कशामुळे उत्पन्न झाला आहे? महासर्पाच्या भीतीनें: हे देवि! या रोमांचांचें कारण काय? हे भगव-न् गंगेचे तुषार;— या प्रमाणें प्रणयानें उत्पन्न झालेल्या वृत्ति जिणें शिवापाशीं लपविल्या ती पार्वती तुमचें रक्षण करो!" हा छेकापन्हुति अलंकार होय.

तमस्तोम भृशं सोमसंडलोपरि राजसे ॥
धूमपानेन किं नाम धाम गम्यमतः परं २०९

"हे अंधकारसमूहा! तूं चंद्रमंडळाच्या वर फार शोभा पावत आहेस. धूम-पानरूप तपश्चरणानें याहून उत्तम स्थान तुला कोणतें प्राप्त व्हावें?" या श्लोकां-त अंधकारसमूह हा केशकलाप होय. चंद्रमंडल मुख होय व धूमपान सुगंधी द्रव्यांचा धुरी होय."

करे वेणीमेणीसदृशनयना स्नानविरतौ ।
दधाना हर्म्याग्रे हरनयनतेजोहतमपि ॥
इयं मुग्धा दुग्धांबुधिबहलकल्लोलसदृशा ।
दृशा वारंवारं मनसिजतरुं पल्लवयति २१०

"नाहणें होऊन गच्चीवर हातांत केस धरून उभी राहिलेली ही मृगनयना-क्षीरसागराच्या कल्लोलाप्रमाणें धवल अशा दृष्टीनें शिवाच्या नेत्राग्नीनें दग्ध झाले-ल्या मदन वृक्षास वारंवार पालवीत आहे!"

किं छत्रं किंनु रत्नं तिलकमथ तथा कुंडलं कौस्तुभं वा ।
चक्रं वा वारिजं वेत्यमरयुवतिभिर्यद्बलिद्वेषिदेहे ॥
ऊर्ध्वे मौलौ ललाटे श्रवसि हृदि करे नाभिदेशे च दृष्टं ।

**पायात्तद्वोऽर्कबिंबं स च दनुजरिपुर्वर्द्धमानः क्रमेण ॥ २११ ॥**

" वामनावतारीं विष्णूनें आपलें प्रचंड रूप एकदम प्रगट केलें असतां देवांगनांस सूर्य हा प्रथम त्याच्या डोक्यावरील छत्र, नंतर शिरोभागींचें रत्न, नंतर कपाळावरचा टिळा, नंतर कानांतील कुंडल, नंतर हृदयावरील कौस्तुभ, नंतर हातांतील चक्र, आणि शेवटीं नाभिस्थानचें कमल, असें क्रमाक्रमानें वाटलें; — असा तो दैत्यरिपु व तें सूर्यबिंब तुमचें रक्षण करो ! "

दामोदरस्य मुरली कथं न भवति प्रिया ॥
वियोगे गतप्राणा सप्राणाऽधरयोगतः २१२

" मुरली ही कृष्णास अत्यंत प्रियकर कां वाटणार नाहीं ?— जी त्याच्या वियोगीं गतप्राण होते; व अधराचा संयोग झाला असतां प्राणवती होते ! "

यो न संचरते देशान् यो न सेवेत पंडितान् ॥
तस्य संकुचिता बुद्धिर्घृतबिंदुरिवांभसि २१३

" जो देशाटन करीत नाहीं, व पंडितांचा समागम करीत नाहीं, त्याची बुद्धि पाण्यांत जसा तुपाचा थेंब त्याप्रमाणें संकुचितच राहते. "

यस्तु संचरते देशान् यस्तु सेवेत पंडितान् ॥
तस्य विस्तारिता बुद्धिस्तैलबिंदुरिवांभसि २१४

" जो निरनिराळ्या देशांत फिरतो व पंडितांच्या समागमें राहतो, त्याची बुद्धि पाण्यांत जसा तेलाचा बिंदु त्याप्रमाणें विस्तार पावत जाते ! "

**परीयंत्रायते हारो नाभिकूपे मृगीदृशः ॥**
**संसेक्तुमिव लावण्यपयसा यौवनद्रुमं २१५**

**" मृगनयनेच्या यौवनरूप वृक्षास लावण्यरूप उदकानें सिंचन करण्यास्तव जणों काय हा मौक्तिकहार नाभिकूपावर परीयंत्राप्रमाणें ( रहाटगाड्याप्रमाणें ) लोंबत आहे ! " हें सावयव रूपक होय.**

**कृशोदरि त्विया कृशा तदपि ते न मानः कृशः ।**

पुरो दिगनुरागिणी तदपि नानुरागोदयः ॥
प्रसन्नमिदमंबरं तदपि न प्रसन्नं मनो ।
नदंति चरणायुधास्तदपि मौनमालंबसे २१६

कोणी पुरुषानें आपल्या प्रियतमेचा कोप दूर करण्याकरितां तीस उद्देशून परोपरीचीं अनुनयपूर्वक भाषणें केलीं, तरी तिची समजावणी होईना. शेवटीं रात्र सरत आली तेव्हां तो तीस ह्मणतो :—

"हे मानिनि! रात्र कृश झाली तरी तुझा मान कृश होत नाहीं; प्राची दिशा अनुरागयुक्त ( किंचित् आरक्त ) झाली तरी तुझ्या अनुरागाचा ( प्रेमाचा ) अद्याप उदय होत नाहीं; हें आकाश प्रसन्न ( स्वच्छ ) झालें तरी तुझें मन प्रसन्न ( प्रसादयुक्त ) होत नाहीं; पहा! चरणायुध ( कुक्कुट ) शब्द करूं लागले तरी तूं अद्याप दृढ मौन धारण करून बसली आहेस!"

द्वारं खड्गिभिरावृतं बहिरपि प्रस्विन्नगंडैर्गजै- ।
रंतः कंचुकिभिः स्फुरन्मणिधरैरध्यासिता भूमयः ॥
आक्रांतं महिषीभिरेव शयनं त्वद्विद्विषां मंदिरे ।
राजन् सैव चिरंतनप्रणयिनी शून्येऽपि राज्यस्थितिः २१७

कोणी कवि राजाच्या प्रतापाचें वर्णन करतो :— "हे राजा! तुझ्या शत्रूंच्या मंदिरांच्या द्वारभागीं अद्याप खड्गी ( गेंडे; पक्षीं, द्वाररक्षक ) आहेत; बाहेर मदोदकानें स्रवणारे हत्ती आहेत ( ह्मणजे आतां चोहोंकडे अरण्य झाल्यामुळें वनचर हत्ती तेथें दृष्टीस पडतात; ) आंत तेजस्वी रत्नें धारण करणारे कंचुकी ( सर्प; पक्षीं, अंतःपुररक्षक ) इकडून तिकडे वावरत आहेत; त्याप्रमाणेंच त्यांचें शय्यास्थानही महिषींनीं; ( म्हशींनीं; पक्षीं, राजस्त्रियांनीं ) अधिष्ठित आहे. सारांश, फार दिवस राहिल्यानें तेथें रमलेली राज्यस्थिति अद्याप त्या शून्यस्थलीं नांदत आहे!"

कविता वनिता चैव स्वयमेवागता वरा ॥
बलादाकृष्यमाणा सा सरसा विरसा भवेत् २१८

"कविता व तरुण स्त्री ही स्वतः होऊन आली असतां सांत मना आहे;

पण जर दोहोंनें बलानें आकर्षण केलें, तर दोघी मूळच्या सरस असल्या तरी वरील पर्णाच्या योगानें अत्यंत विरस होतात!"

मुक्तं मौक्तिकदाम हेमवलयश्रेणी समुत्सारिता ।
वासो नीलमुरीकृतं नियमितो मंजीरकोलाहलः ॥
गच्छंत्यास्तव साहसं न सहते तन्वंगि संगोपनं ।
धम्मीलच्युतमल्लिकापरिमलमोदी निशीथानिलः २१९

अभिसारिकेचें वर्णनः—"हे तन्वंगि! तूं कोणाच्या दर्शनास पडूं नये म्हणून मोत्यांचा हार टाकून दिलास, सुवर्णकंकणें काढून टाकिलीस, नील वस्त्र पांघरली आहेस, पैंजणाचा नाद बंद केला आहेस; याप्रमाणें तूं आपणाकडून सारा बंदोबस्त केला आहेस, पण तुझ्या शिरींच्या नवमल्लिकेच्या सुगंधानें भरलेल्या मध्यरात्रसमयींच्या वायूस तुझें साहस सहन न होऊन तो तुला प्रगट करूं पाहत आहे!" *

नोष्णश्वासं कलयति न वा गंडयोः पांडिमानं ।
दृष्टे वस्तुन्यपि च भजसि भ्रत्यभिज्ञामभिज्ञा ॥
कौलं धर्मं वहसि बहलं तन्न्रुवं नंदसूनो- ।
र्वंशीनादस्तव न सरले श्रोत्रदेशं विवेश ॥२२०॥

"तूं उष्ण श्वास टाकीत नाहींस, तुझ्या गालांवर पांढुरकी आली नाहीं, पुढें असलेल्या पदार्थाविषयीं तुला भ्रांति न पडून तूं तो ओळखतेस, आणि कुलागमांची रीत तूं अजून अस्खलित चालविली आहेस; या सर्व चिन्हांवरून मला वाटतें कीं, हे सरले! नंदपुत्राचा वेणुनाद तुझ्या कर्णपथावर अद्याप आला नाहीं!"

मुहुः स्खलति नीविका पुलकिता च गंडस्थली ।
दृशोरपि कृशोदरि स्फुरति रीतिरन्या दृशी ॥

* 'मृच्छकटिक' नाटकांत प्रथम प्रवेशांत विटाचें वसंतसेनेस अशाच प्रकारचें भाषण आहे:—

कामं प्रदोषतिमिरेण न दृश्यसे त्वं ।
सौदामिनीव जलदोदरसंधिलीना ॥
त्वां सूचयिष्यति तु माल्यसमुद्भवोऽयं ।
गंधश्च भीरु मुखराणि च नूपुराणि ॥

वचोऽपि तव गद्गदं स्फुरदमंदचंद्रानने ।
मुरारिमुरलीरवः कथय किं समाकर्णितः २२१

“ तुझी शिरगांत वारंवार सरकते. तुझ्या गालांवर रोमांच उठले आहेत, नेत्रांची स्थितिही कांहीं चमत्कारिक झाली आहे आणि तुझा कंठ दाटून येऊन शब्द उमटेनासा झाला आहे, तर हे मंदोदरि! हे पूर्णचंद्रानने! मुरारीच्या मुरलीचा नाद तूं ऐकिलास की काय? ”

भ्रांत्वा दिग्वलयं दशास्यदमन त्वत्कीर्तिहंसी दिवं ।
याता ब्रह्ममरालसंगमवशात्तत्रैव गर्भिण्यभूत् ॥
पश्य स्वर्गतरंगिणीपरिसरे कुंदावदातं तया ।
मुक्तं भाति विशालमंडकमिदं शीतत्विषो मंडलं ॥२२२॥

चंद्रमंडलावर उत्प्रेक्षा :— “ हे दशाननांतका! तुझी कीर्तिहंसी सगळ्या दिशा फिरतां फिरतां स्वर्गास गेली. तेथें ब्रह्मदेवाच्या हंसाशीं तिचा संगम होऊन तेथेंच तिनें कुंदपुष्पाप्रमाणें धवल असें मोठें अंडें टाकून दिलें, तें हें चंद्रमंडल दिसत आहे! ”

साक्षीकृत्य महेश्वरं सगिरिजं स्वर्गापगायास्तटे ।
प्राणानां शरणं कलेवरधनं न्यासीकृतं सज्जनैः ॥
भूयो भूरितरैरुपायनिकरैः संप्रार्थ्यमाना तु या ।
दातुं नेच्छति सा नु किं मुनिवरैर्धन्येति काशीर्यते २२३

“ शिव व पार्वती यांस साक्षी ठेवून गंगेच्या कांठीं प्राणांचें वसतिस्थान तें शरीर तेंच धन सज्जनांनीं ठेव म्हणून काशीपाशीं ठेवलें असतां व नंतर अनेक उपायांनीं तें पुनः मागितलें असतां तें ती पुनः परत देऊं इच्छीत नाहीं; तर अशीस मोठमोठे मुनी धन्य म्हणून वर्णितात ते काय? ” या श्लोकांत व्याजनिंदा अलंकार आहे.

कस्तूरीयंति भाले तदनु नयनयोः कज्जलीयंति कर्ण - ।
प्रांते नीलोत्पलीयंत्युरसि मरकतालंकृतीयंति देव्याः ॥
रोमालीयंति नाभेरुपरि हरिमणीमेखलीयंति मध्ये ।
कल्याणं कुर्युरेते त्रिजगति पुरजित्कंठभासां विलासाः २२४

"त्रिपुरारि जो शिव त्याच्या कंठाच्या कांतीचे विलास त्रिजगताचें कल्याण करोत; ते विलास कसे? तर पार्वतीच्या कपाळावर वरील प्रभा कस्तुरीसारखी शोभते, व डोळ्यास कज्जलाप्रमाणें होते, कर्णाचे ठायीं नीलोत्पलाप्रमाणें भासते, वक्षस्थलावर पाचेच्या अलंकाराप्रमाणें दिसते, नाभिप्रदेशीं रोमावलीसारखी शोभते आणि कटीचे ठायीं पाचेची मेखलाच कीं काय असा भास होतो!"

स्फटिकमरकतश्रीहारिणोः प्रीतियोगात्।
तदवतु वपुरेकं कामकंसद्विषोर्वः ॥
भवति गिरिसुतायाः सार्द्धमंभोधिपुत्र्या।
सहृदयमहसि कंठे यत्र सीमाविवादः २२५

"काम आणि कंस यांच्या शत्रूंचें स्फटिक व पाच यांची प्रभा हरणारें असें एकत्र झालेलें शरीर तुमचें रक्षण करो; कीं, ज्याच्या कंठाचे ठायीं पार्वतीचा व लक्ष्मीचा प्रीतिपूर्वक सीमाविवाद होतो. म्हणजे दोघांच्याही कंठप्रदेशाचा नीलवर्ण असल्यामुळें शरीर दोघींस आपआपली हद्द कोठवर हा बरोबर समजत नाहीं!"

गतास्ते राजानः परतरगणि भोजप्रभृतयो।
गुणो दानं त्यागस्त्रयमपि च येषां स्थिरमभूत्॥
गुणः कोदंडेऽद्य द्विरदवदने दानमधुना।
सतां देशत्यागे निवसति वचस्त्याग इति च २२६

"ते भोजप्रभृति राजे गेले. कीं ज्यांच्या ठायीं गुण, दान आणि त्याग (उदारता) हीं तिन्ही स्थिर असत; आतां पाहिलें तर गुण (दोरी) हा धनुष्याचे ठायीं, दान (मदोदक) हत्तींच्या गंडस्थळीं. आणि विद्वज्जनांनीं देशत्याग केला असतां त्यास काय तो त्याग हा संज्ञा यावयाची!"

सस्यानि स्वयमत्ति चेद्वसुमती माता सुतं हंति चेत्।
वेलामंबुनिधिर्विलंघयति चेद्भूमिं दहेत्पावकः ॥
आकाशं जनमस्तके पतति चेदन्नं विषं चेद्भवेत्।
अन्यायं कुरुते यदा क्षितिपतिः कस्तं निरोद्धुं क्षमः २२७

" पृथ्वीच गोतें जर खाईल, आई मुलाला मारील, समुद्र वेलेचें अतिक्रमण करील, अग्नि भूमीचें दहन करील. आकाश कोसळून लोकांच्या डोक्यावर पडेल, अमृत विष होईल. आणि राजा स्वतःच अन्यायानें आचरण करील, तर त्याला प्रतिबंध कोणीं करावा ? "

स्थिरत्वमचिरद्युतौ तमसि कोऽपि बंधग्रहो ।
विधौ किमपि सौरभं मधुनि कापि वर्णात्मता ॥
शिरीषनवदामनि स्फुरति कोऽपि शैलोद्भवो ।
वयोऽभिनवबंधनस्तदिह मन्महे कौशलं ॥२२८॥

" विद्युल्लतेचे ठायीं स्थिरत्व, अंधकारास बंधन, चंद्राचेठायीं सुगंध, मधाचे ठायीं मनोहर रंग, शिरीषपुष्पांच्या नव्या मालेचे ठायीं विचित्र प्रस्तरोद्भव,— हें सर्व यौवनरूप अपूर्व ब्रह्मदेवाचें कुशलत्व होय असें आह्मी मानतों ! " यांत विद्युल्लतादि कशा कशाचें सूचक होय हें रसिकास सहज समजणार आहे.

दिक्चक्रं मृगतृष्णया कवलितं व्योमापि भास्वत्कर-।
च्छायाभिः स्फुरितं तृणानलकणमायाश्च भूरेणवः ॥
पांथाः पल्लवसंकुलद्रुमलताकुंजे मुहुः शेरते ।
मज्जत्कुंजरतालमोलितजलाः क्षुभ्यंति नीपाशयाः ॥२२९॥

ग्रीष्मकालाचें वर्णन :— " सार्‍या दिशा मृगजळानीं व्याप्त झाल्या आहेत; आकाशही सूर्याच्या प्रखर किरणानीं जणों काय कांपतें आहे; पृथ्वीवरील धूळ आगीच्या ठिणग्यांप्रमाणें तप्त झाली आहे; पांथस्थ लोक दाट पालवीच्या लताकुंजांत विसांवा घेत आहेत, आणि पाण्याचे डोह आंत पोहणाऱ्या हत्तींच्या कांडानें क्षुब्ध होत आहेत. "

विशाखांतं गता मेघाः प्रसवांतं हि यौवनं ॥
प्रणामांतः सतां कोपो याचनांतं हि गौरवं २३०

" विशाखा लागल्या कीं मेघांची समाप्ति झाली, स्त्री प्रसूत झाली कीं तिचें तारुण्य संपलें, नमस्कार करण्यापर्यंतच सज्जनांचा कोप राहतो आणि गौरवही कोणा-
[illegible] "

किमिति सखे परदेशे गमयसि दिवसान् धनाशयं लब्धुं
वर्षति मौक्तिकनिकरं तव भवनद्वारि कांचनी वल्ली २३१

" हे मित्रा! धनराशीच्या लोभास्तव परदेशांत कालक्रमण कां करतोस? अरे, तुझ्या दारीं सोन्याची वेल मोत्यांचा सडा टाकीत आहे!" व्यंग्यार्थ उघडच आहे कीं, तुझी सुंदर स्त्री तुझ्या वियोगाच्या दुःखानें घरीं विलाप करते आहे. तर येवढें कठीण मन करून दूरदेशीं कशाला हिंडतोस?

यदि वा याति गोविंदो मथुरातः पुनः सखि ॥
राधाया नयनद्वंद्वे राधानामविपर्ययः ॥२३२॥

" हे सखि! मथुरेहून पुनः जर कृष्ण जाईल; तर राधेच्या नेत्रद्वयाचे ठायीं 'राधा' या नांवाचा विपर्यय दृष्टीस पडेल." म्हणजे तिच्या नेत्रांवाटे अश्रु 'धारा' चालेल!

बुभुक्षितैर्व्याकरणं न भुज्यते। पिपासितैः काव्यरसो न पीयते॥
न च्छंदसा केनचिदुद्धृतं कुलं। हिरण्यमेवार्जय निष्फला गुणाः २३३

" जे क्षुधित झाले त्यांस खावयाला व्याकरण उपयोगीं पडत नाहीं; तृषा लागली असतां काव्यांचा रस प्राशन करतां येत नाहीं; न छंदःशास्त्राच्या योगानें कोणीं कुटुंबभरण केलें आहे असेंही नाहीं; तस्मात् सर्व गुण निष्फळ समजून सुवर्णाच्या प्राप्तीचा नेटका उद्योग करीत जा!"

पीतः क्रुद्धेन तातश्चरणतलहतो वल्लभोऽन्येन रोषात्।
आबाल्यात् द्विजवर्यैः स्ववदनविवरे धार्यते वैरिणी मे ॥
गेहं मे छेदयंति प्रतिदिवसमुमाकांतपूजानिमित्तं ।
तस्मात् खिन्ना सदाहं द्विजकुलनिलयं नाथ नित्यं त्यजामि २३४

" एकानें माझ्या बापास पिऊन टाकला, दुसऱ्यानें नवऱ्यास लाथ मारिली, माझी वैरिणी जी सरस्वती तिला विप्रवर्य नेहेमीं आपल्या मुखांत बाल्यावस्थेपासून वागवितात, तसेंच उमेच्या नवऱ्याची पूजा करण्याकरतां माझ्या घराचा (कमलाचा) हररोज छेद करतात. म्हणून सदां खिन्न होत्साती मी ब्राह्मणाचें घर नेहेमीं वर्ज क

मनसः परमाणुतां वदंतः। कथमद्यापि न तार्किकास्त्रपंते॥
कनकाचलशिखरस्तनीनां। युवतीनामपि यत्र सन्निवेशः२२५

“ मन हें परमाणुमात्र आहे असें ह्मणणारे जे तार्किक ( तर्कशास्त्रवेत्ते ) त्यांस अद्याप लाज कशी वाटत नाहीं? पहा कीं, त्याच परमसूक्ष्म मनाचे ठायीं कनकपर्वतास तुच्छ करणारे स्तन ज्यांचे अशा युवतींचाही रिघाव होतो! ” यांतील तात्पर्य श्लेषरूपानें असें आहे कीं, कनकाचलास ह्मणजे मेरूसही जिंकणारे ( अर्थात् त्याहूनही विशाल ) असे ज्यांचे शरीरावयव त्याही त्या ठिकाणीं मावतात त्याचें परिमाण इतकें अल्पाल्प कसें असेल?

आपदो महतामेव महतामेव संपदः ॥
क्षीयते वर्धते चंद्रः कदाचिन्नैव तारकाः २२६

“संपत्ति व विपत्ति या दोन्ही दशा मोठ्यांसच लागू आहेत; पहा, चंद्रालाच क्षयवृद्धि आहेत. तारकांस नाहींत!”

उष्ट्राणां च गृहे लग्नं गर्दभाः शांतिपाठकाः ॥
परस्परं प्रशंसंति अहोरूपमहो ध्वनिः ॥ २२७ ॥

“ उंटांच्या घरीं लग्न उभें राहिलें असतां मंगलाष्टक ह्मणायास गर्दभाचार्यांची योजना झाली; मग जांवईबोवा व उपाध्येबोवा एकमेकांची प्रशंसा करतात— 'काय हो मनोहर रूप!' 'कंठ तरी केवढा गोड हो!' ”

मूर्खस्य पंच चिन्हानि गर्वी दुर्वचनी तथा ॥
हठी चाप्रियवादी च परोक्तं नैव मन्यते ॥ २२८ ॥

“ मूर्खाचीं हीं पांच चिन्हें आहेत,— गर्व, दुर्भाषण, हठवाद, कटुभाषण, आणि कोणाचें ऐकायाचें ह्मणून नाहीं।”

खलः सत्क्रियमाणोऽपि ददाति कलहं सतां ॥
दुग्धधौतोऽपि किं याति वायसः कलहंसतां २२९

“ खलाचा सत्कार केला तरी तो सज्जनांशीं कलह केल्याशिवाय राहात नाहीं;

कसें? तर कावळ्यास दुधानें जरी पोसला तरी तो कधींही कलहंस होईल काय? "

धम्मिल्लं न परिष्करोति कुसुमैर्नालंकरोत्याननं ।
नीलार्कीरकिशोरमादृतवया नालापयत्याकुला ॥
नोल्लासं मनिपद्यते न तनुते संलापमालीजने । 
म्लाना चंपकमालिकेव विपिने मेनात्मजा वर्तते २४०

पार्वतीच्या विरहावस्थेचें वर्णनः— " ही आपला भांग फुलांनीं भरीत नाहीं, मुखास सुशोभित करीत नाहीं, दुःखित होत्साती साक्षेपानें क्रीडाशुकाशीं बोलत नाहीं, उल्लासवृत्ति धारण करीत नाहीं, सखीजनांशीं ही भाषण करीत नाहीं, तर रानांत जशी चंपकमाला सुकून जाते त्याप्रमाणें ही मेनेची कन्या खेदयुक्त झालेली आहे! "

मणिहारलता विभाति तन्व्याः। कुचसिंहासनसीम्नि तस्थिवांसं ॥
अभिषेक्तुमनंगदेवराजं। गलशंखाद्गलितेव दुग्धधारा ॥२४१॥

" तन्वीनें मणिहाररूप लता जी कंठाचे ठायीं धारण केली आहे ती कुचसिंहासनावर अधिरूढ झालेल्या कामदेवास अभिषेक करण्याकरितां शंखाकृति जो कंठ त्यापासून गळणारी दुग्धधाराच काय यापरि भासते! "

दातुः परोपकृतिनिर्भरचित्तवृत्ते-रासन्नदूरगणना नहि संश्रितेषु ॥
भानुर्विकासयति हन्त सरोजपुंजं। पाणिस्थपंकजसमं भुवनान्तरेषु २४२

" परोपकाराविषयीं ज्याची चित्तवृत्ति सदां उल्हासयुक्त असा दात्याचा आश्रितजनाविषयीं दूरसमीपभाव कधींही असत नाहीं; पहा कीं, सूर्य हा आपल्या हातांतील कमलाप्रमाणेंच भुवनांतरीं असणाऱ्या कमलसमुदायासही विकासवितो! "

अक्षराणि समश्रेणी वर्तुलानि घनानि च ॥
परस्परविलग्नानि तरुणीकुचकुंभवत् २४५.

" अक्षरें हीं तरुणीकुचांप्रमाणें सारख्या उंचीचीं, वर्तुळ, घन आणि परस्पर विलग्न अशीं असावीं! "

वाच्यं तस्यै सहचरि भवद्धरिविश्लेषवार्ता ।

स्नेहैरिद्धे मम वपुरिदं कामहोता जुहोति ॥
प्राणानस्मै तदिह समुचितां दक्षिणां दातुमीहे ।
तत्रादेशो भवतु भवतां यत्त्वमेषामधीशः २५६,

कोणी विरहिणी आपल्या सखीबरोबर प्रियकरास निरोप पाठवते:—

"हे सखि! त्याला असें जाऊन सांग कीं, स्नेह योगानें ('स्नेह' शब्द श्लिष्ट आहे) वृद्धीस पावलेला जो विरहाग्नि त्यांत कामरूप यष्टा माझ्या शरीराची आहुती देत आहे व अशा प्रसंगास उचित अशी प्राणरूप दक्षिणा समर्पण करण्याचें माझें मनोगत आहे; पण त्याचें स्वामित्व आपल्याकडे असल्यामुळें आपणास विचारावयास धाडलें आहे. तर याविषयीं आज्ञा व्हावी।"

कीलालैः कुंकुमानां नवकमपि जगज्जालमेतन्निषक्तं ।
मुक्ताश्चोन्मत्तभृंगा विघटितकमलक्रोडकारागृहेभ्यः ॥
उत्सृष्टं गोसहस्रं बहलकलकलः श्रूयते च द्विजानां ।
भाग्यैर्वृंदारकाणां हरिहृदयदयिता सूयते पुत्ररत्नं ॥२५७॥

सूर्यावर उत्प्रेक्षा — "इंद्राची पत्नी (भार्या) देवांच्या भाग्येंकरून पुत्र-रत्नास प्रसवली, म्हणून त्याच्या जगद्रूप कुंकुमाचे सडे पडले आहेत, उन्मत्त जे भृंग त्यास कमलबंधनरूप कारागृहांतून मुक्त केले आहेत. हजारों गायी सोडून दिल्या आहेत आणि द्विज समुदायाचा मोठा घोष होत आहे।" — 'द्विज' शब्दावरील श्लेष व एकंदर वर्णनाचा दुसरा अभिप्राय मार्मिकास सहज कळणार आहे.

उपमैका शैलूषी संप्राप्ता चित्रभूमिकाभेदान् ॥
रंजयति काव्यरंगे नृत्यन्ती तद्विदां चेतः २५८

"उपमा ही नटी निरनिराळे वेष घेऊन काव्यरूप रंगभूमीवर येते व नाचते ते सहृदय रसिक त्यांच्या चित्ताचें रंजन करून त्यास आनंदानें नाचवायाला लावते." हा वेषां-तर रूपक, उत्प्रेक्षा, अपन्हुति, विरोधाभास, श्लेष इत्यादि होत.

रात्रिर्गजनिकरा राजनिकरपरिष्कृता सरसी ॥
अपि भजते न वरसभा नवरसभावज्ञवर्जिता शोभां २५९

"चंद्रहीन रात्र, कमळसमुदायानें नशोभणारें सरोवर आणि नवरस व अनुभाव जाणणारे पंडित ज्यांत नाहींत अशी मोठी सभा हीं तिन्हीं शोभा पावत नाहींत."

खलानां धनुषां चापि सद्वंशजनुषामपि ॥
गुणलाभो भवेदाशु परहृद्भेदकारकः २५०

"सद्वंशापासून (सत्कुलापासून — चांगल्या वेळूपासून) झाले असले तरी खल व धनुष्य यांस गुणलाभ (उत्कर्षलाभ — रज्जुलाभ) झाला न झाला कीं त्याचा परिणाम दुसऱ्याच्या हृदयाचा भेद (दोन्ही अर्थ स्पष्टच आहेत) हा व्हावयाचाच!"

यातस्यास्तमनंतरं दिनकृतो वेषेण रागान्वितः ।
स्वैरं शीतकरः करैः कमलिनीमालिंगितुं योजितः ॥
शीतस्पर्शमुपेत्य संमति तया रुद्धं मुखांभोरुहं ।
हासेनैव कुमुद्वतीवनितया वैलक्ष्यपांडूकृतः २५१

"सूर्य अस्तास गेलासा पाहून चंद्र हा रागें करून (अनुरागानें — संध्यारागानें) युक्त होत्साता सूर्याच्या वेषानें कमलिनीस बळेंच करानें (हातानें — किरणानें) आलिंगायास जों सरून झाला, तों त्याच्या शीतल स्पर्शावरून त्यास अन्य समजून तिनें आपलें मुख झांकलें; हें सर्व पाहून चंद्राची स्त्री जी कुमुद्वती तिनें मत्सरभावानें हास्य वदन केलें; त्याच्या योगानें चंद्र खजील होऊन तो फिक्का झाला!"

जयश्रियः कृपाणीयं वेणी नानाख्यभूपतेः ॥
अस्यां करगृहीतायामसावभिमुखी नव २५२

"'नाना' नामक भूपाची तरवार ही जयश्रीची वेणीच होय. ती हातांत आली असतां जयश्री अर्थात् अनुकूल झालीच!" *

---

* वरील श्लोक तिसरा पेशवा जो नानासाहेब त्याविषयीं लिहिला असावा. असाच दुसरा एक श्लोक 'बल्लाळ' या नांवानें लिहिलेला आढळण्यांत आला आहे:—

"बल्लाळ क्षोणिपाल त्वदहितनगरे सचरंती किराती ।
कीर्णान्यादाय रत्नान्युरुतरखदिरांगारशंकाकुलांगी ॥
क्षिप्त्वा श्रीखंडखंडं तदुपरि मुकुलीभूतनेत्रा धमंती ।
श्वासामोदानुयातैर्मधुकरनिकरैर्धूमशंकां करोति ॥"

वरील पेशव्यांच्या वेळच्या निजाम अलीवरही एक पद आढळतें:—

"लोपीकारव निजाम कायक तुझे ठव्या भुजंगीश्वरे। (पुढें चालू)

सूचीमात्रविभेदसंभ्रमगुणः क्षोणीशवामभ्रुवा- ।
मुत्तुंगस्तनमंडलेषु लभते लीलारतिं कंचुकः ॥
नाराचैर्निबिडैर्विभिन्नवपुषां पुंसां महायोधने ।
स्वर्गश्रीकुचकुंभसंभ्रमपरीरंभः कथं दुर्लभः २५३

"केवळ सुईनें शरीर टोंचून घेतल्याच्या गुणानें कंचुकास (चोळीस) राजस्त्रियांच्या उन्नत कुचमंडळावर निरंतर लीला करावयास सांपडते; मग निबिड शरपंक्तीनें त्यांचीं शरीरें तुमुल युद्धांत छिन्नभिन्न होऊन गेलीं आहेत अशा योद्ध्यांस स्वर्गस्त्रीच्या कुचकुंभालिंगनाचा लाभ घडतो यांत नवल तें कोणतें?"

अयी तिलास्तैलिक नूनमय । स्नेहादवस्थां भवतोपनीताः ॥
द्वेषोऽभविष्यद्यदमीषु नित्यं । तदा त्ववस्थां किमवाकरिष्यः २५४

"हे तेल्या! या तिळांची केवळ स्नेहास्तव (घाणीं, तेला करितां) तूं अशी अवस्था करून टाकलीस; मग याचा तुझ्याशीं नित्य द्वेष असता, तर यांची अवस्था यापेक्षा आणखी काय झाली असती कोण जाणे!"

शान्ते मन्मथसंगरे रणभुवां सत्कारमातन्वती ।
वासोऽदाज्जघनस्य पीनकुचयोर्हारं श्रुतेः कुंडले ॥
बिंबोष्ठस्य च वीटिकां स्मितमुखी पाणिद्वयोः कंकणे ।
पश्चाद्वर्तिनि केशपाशनिचये युक्तो हि बंधक्रमः २५५

"रतिसंगर आटपला असतां रणांगणीं ज्यांनीं चांगली चाकरी बजावली त्यांचा सत्कार करण्याकरितां स्त्रीनें जघनास वस्त्रदान केलें, पीनकुचांस हार व कर्णांस कुंडलें अर्पिलीं, बिंबाधरावर मर्जी सुप्रसन्न होऊन त्यास विडा दिला व हस्तांस रणत्कार करणारीं कंकणें बहाल केलीं; पण युद्धांत मागच्यामागेंच राहिलेला जो केशपाश त्याचें मात्र राजद्रोह केल्याबद्दल बंधन केलें!" हें असंबंधातिशयोक्तीचें उदाहरण होय.

---

(मागील पृष्ठावरून)

त्रासेनः करवालवल्लिरधुना किं नाम गर्भिण्यभूत् ॥
मन्ये भेदभियाच कुंभविदलन्मुक्ताफलव्याजतो-।
दृष्टापत्यपरंपरामपि रणे मूर्ते स्फुरंती मुहुः ॥"

वैयाकरणकिरातादपशब्दमृगाः क यांतु संत्रस्ताः ॥
यदि नटगणकचिकित्सकवैतालिकवदनकंदरा न स्युः २५६

"वैयाकरणरूप किरातापासून भय पावलेले जे अपशब्दरूप मृग त्यांनी ए-
रवीं कोठें जावें?— जर नट, ज्योतिषी, वैद्य, स्तुतिपाठक यांचीं मुखें याच को-
णी गुहा ह्या जर नसत्या तर."

अव्याकरणमधीतं भिन्नद्रोण्या तरंगिणीतरणं ॥
भेषजमपथ्यसहितं त्रयमिदमकृतं वरं न कृतं २५७

"व्याकरणावांचून केलेलें अध्ययन, फुटक्या नावेनें नदी तरून गेलेली व प-
थ्याशिवाय औषधाचें सेवन,— या तीन गोष्टी न केलेल्या बऱ्या."

घटं भिंद्यात्पटं छिंद्यात्कुर्याद्वा गर्दभस्वरं ॥
येन केन प्रकारेण प्रसिद्धः पुरुषो भवेत् २५८

"वाड्यावर जाऊन घागर फोडून टाकावी, वस्त्रें फाडीत बसावें, किंबहुना
गर्दभासारखा स्वरही काढावा; पण कोणत्या तरी रीतीनें पुरुषानें लोकप्रसिद्ध
व्हावें।"

चित्रं तपति राजेंद्र प्रतापतपनस्तव ॥
अनातपत्रमुत्सृज्य सातपत्रं द्विषद्गणं २५९

"हे राजा! तुझ्या प्रतापसूर्याचा हा काय चमत्कार आहे पहा, कीं ज्याच्या
डोक्यावर छत्र नाहीं त्यास सोडून छत्र धारण करणाऱ्या शत्रूसच तो ताप देतो."
हा विभावनालंकार होय.

मृत्युः शरीरगोप्तारं वसुमाजं वसुंधरा ॥
दुश्चारिणीव हसति स्वपतिं पुत्रलालनात् २६०

"ज्याप्रमाणें जारिणी स्त्री आपल्या पतीस पुत्रलालन करतांना पाहून हं-
सते, त्याप्रमाणें मृत्यु हा शरीराची जोगवण करणाऱ्या मनुष्यास व भूमि धनर-
क्षण करणारास हंसते।"

साल्हादं वचनं प्रयच्छसि न मे नो वांछितं पृच्छसि।
प्रायः सोच्छ्वसिषि द्रुतं हुतवहज्वालासमं रात्रिषु॥
कंठाश्लेषपरिग्रहे शिथिलता यन्नादराच्चुंबसे।
तत्ते धूर्त हृदि स्थिता प्रियतमा काचिन्ममेवापरा २६१

कोणी मानिनी गणिका आपल्या वल्लभास म्हणते :—— "तूं माझ्याशीं आल्हा-दपूर्वक भाषण करीत नाहींस, मला इष्ट विचारीत नाहींस, रात्रीं तुझे निरंतर उष्ण निश्वास चा-ललेले असतात, कंठालिंगनाचे ठायीं शिथिलता दृष्टीस पडते व अधरपानाविषयीं ही तुझी आसक्तता दिसत नाहीं; तेव्हां हे धूर्ता! या सर्व चिन्हांवरून मी असें सम-जते कीं, कोणी माझ्याहून निराळी प्रियतमा तुझ्या हृदयाचे ठायीं वास करीत असावी!"

स्मर्तव्योऽहं त्वया कांते न स्मरिष्याम्यहं तव ॥
स्मरणं चेतसो धर्मस्तच्चेतो भवता हृतं ॥ २६२ ॥

"हे कांते! तूंच माझें स्मरण करावें, मला तुझें स्मरण होणार नाहीं; कां तर; स्मरण हा चित्ताचा धर्म होय आणि चित्तच मुळीं तूं हरण करून टाकलें आहेस!"

सर्वस्वापहरो न तस्करगणो रक्षो न रक्ताशनः।
सर्पो नैव बिलेशयोऽनिलनिशाचारी न भूतोऽपि च॥
अंतर्धानपटुर्न सिद्धपुरुषो नाप्याशुगो मारुत-।
स्तीक्ष्णास्यो ननु सायकस्तमिह ये जानंति ते पंडिताः२६३

"सर्वस्वाचें हरण करणारा (पक्षीं, सर्व निद्रा घालवणारा) असून तस्कर नव्हे, र-क्ताचें प्राशन करीत असून राक्षस नव्हे, बिळांत दडून असणारा असून सर्प नव्हे, निशाचर खरा पण भूत नव्हे, अंतर्धान करण्याविषयीं कुशल असून सिद्धपुरुष नव्हे, गतीनें चपळ असून वायु नव्हे. तीक्ष्णमुख असून बाण नव्हे,—— असा कोण हें तो जाणतो तो पंडित होय!" या कोड्याचें उत्तर 'ढेकूण' होय. पहिल्या विशे-षणाचा श्लेषार्थ वर दिलाच आहे; बाकीचीं उघडच आहेत."

सदूषणापि निर्दोषा सखरापि सुकोमला ॥
नमस्तस्मै कृता येन रम्या नारायणी कथा २६४

" सदूषण ( दूषणयुक्त; दूषण नामक राक्षसाचा जींत संदर्भ आहे ) असून निर्दो-ष आणि सखर ( कठोर; खरनामक राक्षसाचें जींत कथानक आहे ) असून अत्यंत कोमल, अशी जी ईश्वरविषयक कथा ती ज्यानें केली त्यास वंदन असो ! "

आच्छादयसि का मुग्धे वस्त्रेणाधरपल्लवम् ॥
खंडिता एव शोभंते वीराधरपयोधरा: ॥२६५॥

" हे मुग्धे ! आपल्या अधरपल्लवाचें वस्त्रानें कां आच्छादन करतेस? अगे, वीर, अधर आणि पयोधर हे क्षतांकित होत्मातेच विशेष शोभतात ! "

मंदमंदगमना करिणी किं। वा विशालनयना हरिणी किं॥
पूर्णचंद्रवदना रजनी किं। पश्य गच्छति सखे तरुणी किं २६६

" हे मित्रा ! ती पहा पहा राजमार्गानें कोण जाते आहे? ती मंदमंद गमन करणारी हत्तिनी आहे काय? अथवा विशालनेत्रा हरिणी आहे काय? किंवा पूर्णचंद्र हेंच जिचें वदन अशी पौर्णमासी रात्रि आहे काय? "

पंडिते चैव मूर्खे च बलवत्यपि दुर्बले ॥
ईश्वरे च दरिद्रे च मृत्यो: सर्वत्र तुल्यता २६७

" पंडित, मूर्ख; बलवान्, दुर्बल; धनाढ्य, दरिद्र; या सर्वांस मृत्यूनें ग्रासलें आहे; कोणी सुटला आहे असें नाहीं ! "

वंगा: कथमंगा: कथमित्यनुयुंक्ते तथा देशान् ॥
कीदृक्कृतांतपुरमिति कोऽपि न जिज्ञासते मूढ: २६८

" वंगदेश कसा आहे, अंग* कसा आहे, इत्यादि प्रकारें इहलोकींच्या अ-ल्पायास वस्तीच्या देशांविषयीं मूढ जे प्रापंचिकजन त्यांची चौकशी चालत असते; पण कृतांतपुर म्हणजे यमनगरी कशी आहे हिजविषयीं कोणाचीही जिज्ञासा असत नाहीं ! "

दारा: पुत्रेषु रता: पुत्रा: पितृधनपरिग्रहव्यग्रा: ॥

* अंग म्हणजे वंगाल आहे व अंगास बहार म्हणतात. भारती पुराणांतला प्रसिद्ध सेनापति जो कर्ण त्यास अंगदेशाचें आधिपत्य दिलें होतें हें वाचकांस माहीत असेलच.

जननी रोदनशरणा परलोकगतस्य को बंधुः २६९

" स्त्रिया पुत्रांकडे पाहून शोक आवरतात. पुत्र पितृधनाच्या विभागाविषयीं त-त्पर होऊन त्या व्यवस्थेला लागतात. आई दुःख करीत बसते; पण जो बिचारा प्राणी प-रलोकाची वाट धरीत असतो त्याचा सांगाती कोण होतो !"

हृदि लज्जोदरे वह्निः स्वभावादपि कृच्छ्रगः ॥
तेन मे दग्धलज्जस्य पुनरागमनं नृप ॥ २७० ॥

" हे राजा ! माझ्या हृदयाचे ठायीं लज्जा आहे व उदराचे ठायीं वह्नि आहे; तेव्हां भर्गाच्या क्षुधाग्निज्वलनरूप धर्मामुळें माझी लज्जा जळून मी तुजकडे याचना करण्यास-आलों आहें." तात्पर्य हें कीं, मध्यान्हींच्या समयापुढें लज्जेच्यानें टिकाव धरवत नाहीं.

यातः स्नानकरक्षणाय यमुनाकूलं न गच्छाम्यहं ।
कस्मादुत्स पिनष्टि पीवरकुचद्वंद्वेन गोपीजनः ॥
भ्रूसंज्ञाविनिवारितोपि बहुशो जल्पन् यशोदाग्रतो ।
गोपीपाणिसरोजमुद्रितमुखो गोपीपतिः पातु वः २७१

" आई ! गोपींच्या वस्त्रांचें रक्षण करण्यास मी यमुनातीरीं जाणार नाहीं. यशो-दा विचारते, 'कां पुत्रा !' कृष्ण उत्तर करतो, 'अगे या गोपी पीनस्तनद्वयेंकरून म-ला चेंगरू पाहतात,'— याप्रमाणें तो बोलत असतां गोपी भ्रूसंज्ञांच्या योगानें त्यास दाबीत होत्या, तरीही तो जेव्हां ऐकेना तेव्हां त्याचें मुख गोपींच्या पाणिसरोजांनीं मुद्रित झालें आहे असा तो गोपीपति तुमचें रक्षण करो ! "

किमकारि न कार्पण्यं कस्यालंघि न देहली ॥
अस्य पापोदरस्यार्थे किमनाटि न नाटकं २७२

" या दुष्ट उदराच्या भरणार्थ काय काय दैन्य आम्हीं दाखविलें नाहीं ! कोणा कोणाचा उंबरठा उलंडला नाहीं ! व कोण कोणतें नाटक केलें नाहीं ! "

संपोष्यं सदपत्यवत् परकराद्रक्ष्यं च सुखेमवत् ।
संगोप्यं वणिजोऽगवत् प्रतिदिनं ईक्ष्यंच सन्मित्रवत् ॥
वध्यं वंधवदक्षयं न हि न विस्मर्यं हरेर्नामव— ।

नैवं सीदति पुस्तकं किल कदाप्येतद्गुरूणां वचः २७३

"पुस्तकाचें उत्तम अपत्याप्रमाणें संपोषण करावें, उत्तम स्त्रेयाप्रमाणें दुसऱ्याच्या नें कधीं हातीं लागूं देऊं नये, जखमी मनुष्याच्या शरीराप्रमाणें वरचेवर त्याचें शोधन करावें. नितलग मित्राप्रमाणें दररोज त्याचें अवलोकन करावें, बंधनांत ठेवल्याप्रमाणें त्यास बळकट बांधावें, हरीच्या नामाप्रमाणें त्याचें कधीं विस्मरण होऊं देऊं नये;— अशा तऱ्हेनें पुस्तक ठेवलें असतां तें वाईट होत नाहीं असें गुरूचें सांगणें आहे!"

मौने मौनी गुणिनि गुणवान् पण्डिते पण्डितोऽसौ ।
दीने दीनः सुखिनि सुखवान् भोगिनि प्राप्तभोगः ॥
मूर्खे मूर्खो युवतिषु युवा वाग्मिषु प्रौढवाग्मी ।
धन्यः कोऽपि त्रिभुवनजयी योऽवधूतेऽवधूतः ॥ २७४॥

"मुनिसमुदायांत मौन धारण करणारा, गुणिजनांशीं समागम झाला असतां गुण प्रगट करणारा, पंडित मंडळींत पंडित, दीनाचे ठायीं दीन, सुखी असणाऱ्यांशीं सुखी, विलासीजनांशीं विलासी, मूर्खाशीं मूर्ख, तरुण स्त्रियांशीं तरुण, वावदूकांशीं वक्ता व वैराग्याशीं वैरागी,— याप्रमाणें जो सर्वांशीं रंग पाहून वर्तणारा तो त्रिभुवनजयी चतुर पुरुष धन्य होय!"

उच्छिष्टं शिवनिर्माल्यं वमनं शवकर्पटः ॥
काकविष्ठासमुत्पन्नाः पंचैतेऽतिपवित्रकः २७५

"उच्छिष्ट, शिवाचें निर्माल्य, वमन, मेतचीवर आणि काकविष्ठेपासून उत्पन्न झालेला,— हीं पांच अतिपवित्र होत!" हीं पांच अनुक्रमें करून दूध, गंगा, मध, रेशीम व पिंपळ होत.

सौधं धाम मुखांबुजं भगवतो वक्त्रासवप्राशनं ।
शय्या चाधरपल्लवोऽप मृदुलांगुष्ठस्तदुच्छीर्षकम् ॥
अंगुल्यस्तव सेवने विरलसा ब्रूमः किमन्यत्सुखं ।
हा हा वैरिणि हे तथापि मुरलि त्वां नैति निद्राऽपि किं २७६

गोपी सापत्नभावानें मुरलीस म्हणतात:—" हे मुरलि! अमृताचें केवळ गृह असें जें भगवंताचें मुखांबुज त्यांतील आसवाचें (मद्याचें) तुला प्राशन घडतें, त्या-

चा अधरपल्लव हाच तुझी कोमल शय्या होय, मृदुल जो अंगुष्ठ तो तुझें उपधान (उशी) होय; इतर अंगुली या तुझ्या सेवनाविषयीं (चरणसंवाहनाविषयीं) निरंतर तत्पर आहेत; आणखी यापेक्षां स्वर्ग तें कोणतें असावें? — पण इतकें असून हे वैरिणि! तुला निद्रा ती कशी येत नाहीं!" बोलणारणीचा भाव अर्थात् हा होय कीं आपल्या वैरिणीस झोंप लागून ती शब्द करीनाशी झाली कीं तिचें सर्व भाग्य आपल्या वांट्याला येईल।

अहं तेनाहूता किमपि कथयामीति विजने ।
समीपे चासीना सरलहृदयत्वादबलया ॥
ततः कर्णोपान्ते किमपि वदताऽऽघाय वदनं ।
गृहीता धम्मिल्ले मम सखि नितान्तोऽधररसः १७७

"मला कांहीं सांगावयाचें आहे असें म्हणून त्यानें मला एकांतीं बोलाविलें, तेव्हां मी भोळ्या भावानें त्याच्याजवळ गेलें; तों त्या धूर्तानें कानाशीं लागण्याचें मिष करून माझ्या मुखाचें आघ्राण केलें आणि केशपाश धरून अधररसाचें पान केलें!"

संग्रामे स्फारदंष्ट्राणां करीणां रुधिरंदले ॥
दोर्भिर्वा दोभिहानिर्वा मुहूर्तादेव जायते १७८

"संग्रामाचे ठायीं मोठ्या मोठ्या योद्ध्यांचें व करिपरस्त्रांत करीवें तेज पडणें किंवा तेजोहानि होणें, हीं दोन्हीं एका घटकेंत होऊन जातात!"

शंभुः श्वेतार्कपुष्पेण चंद्रमा वस्त्रतंतुना ॥
अच्युतः स्मृतिमात्रेण साधवः करसंपुटैः १७९

"शिव हा पांढऱ्या रुईच्या फुलानें, चंद्र वस्त्राच्या दशीनें, विष्णु केवळ स्मरणानें व साधु हस्तांजलीनें म्हणजे केवळ नमस्कारानें प्रसन्न होतात!"

कुचौ नु परिचर्चितुं परिचितं चिरं चंदनं ।
कृताः परमुरोजयोः परिसरेऽरविंदस्रजः ॥
स्तुतिर्नतिरपि स्मृतिर्वरतनोः कृतैवादरा- ।
दिदं नु निखिलं पुनर्विरचितं मया नेश्वरे १८०

कोणी विषयी विरक्तता पावून कृतकर्माबद्दल अनुताप पावतो :— "मी चंदना-चा जो प्रयोग केला तो निरंतर स्तनलेपनार्थच केला; कमलांच्या माळा ज्या घातल्या त्या स्तनांच्या आसमंतांतच घातल्या; स्तवन व वंदन हीं ही आदरें करून सुंदरस्त्रि-यांचीच केलीं;— पण हें सर्व परमेश्वराचे ठिकाणीं माझ्याकडून कधींही झालें नाहीं."

धर्माख्याने श्मशाने च रोगिणां या मतिर्भवेत् ॥
सा सर्वदैव तिष्ठेच्चेत् को न मुच्येत बंधनात् ॥ २८१ ॥

"धर्मविषयक आख्यानाचें श्रवण झालें असतां, श्मशानांत व रुग्णावस्थेंत जी मनाची स्थिति होते तीच जर सदोदित राहील तर कोण संसारतापापासून मुक्त होणार नाहीं?"

सुभाषितज्ञेन जनेन साकं। संभाषणं सुमधुसेवनं च ।
आलिंगनं तुंगपयोधराणां। मन्यस्तसौख्यं त्रयमेव लोके २८२

"सुभाषिताच्या ज्ञानानें ज्यास वाक्चातुर्य प्राप्त झालें आहे अशा मनुष्याशीं संभाषण, चांगल्या मधूची सेवा व पूर्णयौवना ज्या स्त्रिया त्यांचें आलिंगन, हीं ती-न या लोकचीं मोठीं सुखें होत."

अहो बत विचित्राणि चरितानि महात्मनां ॥
लक्ष्मीं तृणाय मन्यंते तद्भारेण नमंति च ॥ २८३ ॥

"महात्मे जे पुरुष त्यांचें चरित्रवैचित्र्य काय सांगावें! पहा कीं, ते लक्ष्मीला तृणासमान मानतात आणि तिच्याच भारानें नम्रही होतात!" तात्पर्य हें कीं, ल-क्ष्मीच्या प्राप्तीनें सज्जन उद्दाम न होतां उलटे लीनच होतात.

शिशिरे मौनमातिष्ठ वाणि माणसमे जने ॥
अंतर्गतरसाल्हादं न जानासि कदाचन २८४

"हे वाणि! पाणिप्रिय जनाची गांठ पडली असतां तूं आपली मौन धारण करून असत जा; कां तर, हृदयगत जो आल्हाद त्याचा तुला मुळींच अनुभव पडत नाहीं!"

अजीर्णे तु पय वैद्यमन्यदानविरहिते निर्धने भोमियाणां।

हिरण्यकशिपूची उक्तिः—"ज्या माझ्या उरस्थळावर हत्तींचीं आकुंठित दंत मुसळें हीं चूर्ण झालीं व शिवाच्या परशूची धारही ज्यावर बोथटली, तें आज नृसिंहाच्या नखांनीं विदीर्ण होत आहे; तेव्हां दैव दुष्ट झालें असतां तृणही वज्रमाय होतें असें म्हटलें पाहिजे!"

अन्योन्यस्य निरीक्षणादपगता नेत्रान्मुखे ह्रीः स्थिता।
संलापाद्वदनं विहाय कुचयोः सीमामुपेत्य स्थिता ॥
गाढालिंगनतस्ततः कुचतटी संत्यज्य नीविं गता ।
भर्तुस्तत्र करे गते किमभवत्सा तन्न जानीमहे २८९

नववधूच्या लज्जात्यागाचें कोणी मार्मिक कवि वर्णन करतो:—"परस्परांची दृष्टादृष्ट झाली असतां लज्जा ही नेत्रापासून निघून मुखाचे ठायीं जाऊन बसली, पुढें संभाषणाच्या वेळीं मुखापासून निघून कुचसीमेवर जाऊन पडली, नंतर गाढालिंगनप्रसंगीं कुचतटापासून नाभिप्रदेशीं पोंचली; पण पुढें भर्त्याच्या करेंकरून नीवीचाही मोक्ष झाल्यावर ती कोणीकडे नाहींशी झाली तें आम्हास कळत नाहीं!"

अकृत्वा पौरुषं या श्रीर्विकासिन्यपि किं तया ॥
जरद्गवोऽपि चाश्नाति दैवादुपगतं तृणं ॥२९०॥

"पौरुष केल्यावांचून जी आयतीच प्राप्त झालेली संपत्ति तीनें काय तात्पर्य आहे? म्हातारा झालेला बैलही पदच्छेनें उगवलेलें गवत खातो!"

लोभाविष्टो नरो वित्तं वीक्षते न च चापदम् ॥
दुग्धं पश्यति मार्जारो यथा न लगुडाहतिम् २९१

"लोभाविष्ट पुरुषाची दृष्टि द्रव्यावर असते पण तें प्राप्त होतांना जी विपत्ति येणार ती त्याला दिसत नाहीं; जसें मांजराची नजर दुधावर असते पण दंडुक्याकडे त्याचें लक्ष असत नाहीं!"

चातकस्य मुखचंचुसंपुटे। नो पतंति यदि वारिबिंदवः॥
सागरीकृतमहीतलस्य किं। दोष एव जलदस्य दीयते २९२

"चातकाच्या चंचुपुटांत जर पाण्याचे बिंदु पडले नाहींत, तर सारी पृथ्वी जल-

चुंबत्यंबरमवनिं विपरीतं किं न विपरीतम् ॥२९६॥

“ मुक्त जे स्वर्गस्थ असाध्यांचे ते भूमीवर पडले आहेत, बाल म्हणजे अज्ञजन ते अत्यंत मुक्ततेप्रत पावले आहेत आणि आकाश पृथ्वीला येऊन भेटलें आहे; तेव्हां एक विपरीत झालें असतां काय काय विपरीत होणार नाहीं ? ” ‘मुक्ताः’ ‘बालाः’ व ‘अंबरम्’ यांचे दुसरे अर्थ प्रसिद्धच आहेत; व एकंदर श्लोकाचें तात्पर्यही तज्ज्ञांच्या लक्षांत येणारच आहे.

सुभासं दिनमद्य नः परिणतं साफल्यमद्यायुषः ।
कर्माण्यद्य शिवंकराणि सुमहान्यद्योत्सवो नेत्रयोः ॥
कार्पण्येन चिराय संप्रति कृतं प्रास्थानिकं मंगलं ।
यज्जागर्ति भवन्मुखेंदुरधुना दिष्ट्या दृशोरग्रतः २९७

“ आज सुदिन उगवला, आयुष्याचें साफल्य पूर्ण झालें, शुभ कर्मांचें सार्थक्य झालें, नेत्रांचें पारणें फिटलें आणि दैन्यानें आपलें बिऱ्हाड उचललें, कीं आज आपला मुखचंद्र डोळ्यांसमोर प्राप्त होण्याचा योग आला ! ”

यदीयबलमालोक्य गतः प्रेयान् वियुज्यते ॥
आलोकये कथं सख्यस्तस्य चंद्रमसो मुखं २९८

“ हे सखीनो! ज्याचें बळ (चंद्रबळ) पाहून प्रिय मार्गस्थ होतो, त्या विरहताप देणाऱ्या दुष्टाचें मुख मी कशी पाहूं ! ”

उपाध्यायश्च वैद्यश्च ऋतुकाले वरांगना ॥
सूतिका दूतिका चैव कार्यांते तृणवत्समाः २९९

“ उपाध्याय, वैद्य, ऋतुकालीं स्त्री, सुईण आणि दूती——इतकीं सर्वजण कार्य उरकलें असतां तृणवत् होतात ! ”

संप्राप्तोऽपि महोदधिं न वितृषो जातो जलैर्वाडवो ।
मेघं प्राप्य च चातकोऽपि चरणौ भानुं न लेभेऽरुणः ॥
चंद्रः शंकरशेखरेऽपि सततं सोऽपि क्षयी दृश्यते ।
प्रायः सद्गुरुणाश्रितोऽपि लभते दैवानुरूपं फलं ॥३००॥

वरील साहित्य वाडग्यांत असतात!" वशीकरणांत तिलक, अंजन, मणि वगैरे सामग्री अवश्य असून तिजवर लोकांत गढिलें पाहिजे हें लोकप्रसिद्धच आहे.

स्नेहोपपन्न इति पूर्णदशाविशेष-
शाली स्वमात्मनि वसुप्रकरं निधाय ॥
लब्धोदये तमथ गृण्हति पद्मबंधौ ।
दीपा भवंति कलुषा बलवान् हि लोभः ३०५.

"सूर्याने अस्तंगमनाच्या समयीं दीपाचे ठायीं आपला वसु-(तेज; द्रव्य)-समूह जो ठेवला, कीं हे स्नेहयुक्त (पक्षीं, तैलयुक्त) आहेत व पूर्णदशेनें (संपन्नतेनें— वातीच्या अग्रानें) विराजमान आहेत असें समजून,— तेच दीप त्यानें आपल्या उदयकालीं आपला वसुप्रकर माघारीं घेतला असतां त्यापक्षीं मलिनमुख होतात त्यापक्षीं लोभ हा परम दुर्धर आहे असें म्हटलें पाहिजे!"

मौनं कालविलंबश्च प्रयाणं भूमिदर्शनम् ॥
भृकुट्यन्यमुखी वार्ता नकारः षड्विधः स्मृतः ३०६.

" आपलें कोणापाशीं कांहीं काम असतें आणि त्यानें बळकट मौन धरलें, किंवा कामास उशीर लावला, अगर न भेटतां चालता झाला, किंवा गांठ पडली असतां भुईकडे पाहूं लागला, अथवा त्याच्या कपाळावर आठी दिसली, किंवा मुद्दाम दुसऱ्याकडे पाहून बोलूं लागला, म्हणजे नन्नाचा पाढा समजावा. नकाराचे वरील सहा प्रकार आहेत."

लज्जे त्वं मज्ज सिंधौ गिरिवरशिखरे त्वंच तिष्ठ मतिष्ठे।
शांते भ्रांते दिशांते कुरु वसतिमहो गर्व खर्वो भवाशु॥
तेजः पातालमूलं भज भुवि भगवन् मान मा नाम तेऽस्तु।
मैत्र्यैः कामाभ्यपंतीं सततमहिहिमां तूर्णमाशां श्रयिष्ये ३०७

"हे लज्जे! तूं समुद्रांत बुडी मार; हे मतिष्ठे! तूं एकाद्या मोठ्या पर्वताच्या शिखरावर जाऊन बैस; हे शांते! दिशांच्या प्रांतभागीं तूं वस्ती कर; हे गर्वा! तूं ठेंगणा होऊन रहा; हे तेजा! तूं पाताळाच्या तळवटीं जाऊन बैस; हे भगवंता माना! तुझें कांहीं येथें राहूं देऊं नको;— कां तर मला मैत्रीनें धरून राहणारी जी द्रव्यतृष्णा ति-

याच मी इतःपर अंगीकार करणार!" तात्पर्य, धनलोभ सुटला म्हणजे वरील सात्या मंडळीस पूर्ण रजाच मिळाली म्हणून समजावें.

यः पठति लिखति पश्यति परिपृच्छति पंडितानुपासयति॥
तस्य दिवाकरकिरणैर्नलिनी दलमिव विकास्यते बुद्धिः ३०८

"जो अध्ययन करतो, लिहितो, जगाच्या व्यवहाराचें किंवा पुस्तकांचें वरचेवर अवलोकन करतो, नेहमीं संशयनिवृत्ति करून घेतो, पंडितांच्या समागमें असतो, त्याची बुद्धि सूर्यकिरणांनीं जशी कमलिनी तशी विकास पावत जाते!" *

पक्ष्माग्रग्रथिताश्रुबिंदुनिकरैर्मुक्ताफलस्पर्धिभिः ।
कुर्वंत्या हरहासहारि हृदये हारावलीभूषणम् ॥
बाले बालमृणालनालवलयालंकार कांते करे ।
विन्यस्याननमायताक्षि सुकृतिः कोऽयं त्वया स्मर्यते ३०९

"हे बाले! मुक्ताफलांची स्पर्धा करणारे जे पक्ष्माग्रापासून गळणारे अश्रुबिंदु त्यांनीं शिवहास्यतुल्य शुभ्र वक्षःस्थलावर मोत्यांचा जणूं काय हारच धारण करणारी जी तूं, ती कोंवळ्या कमलतंतूंच्या वलयांनीं सुशोभित केलेल्या हातावर आपलें मुख टेकून कोणत्या धन्य पुरुषाचें एकाग्रतेनें ध्यान करीत आहेस?"

साहजिकरूपवत्या भवति भवत्या विभूषणं भारः॥
सर्वांगसौरभिण्या दमनकवल्ल्याः किमालि कुसुमेन ३१०

"साहजिक सौंदर्यानें मंडित जी तूं त्या तुला अलंकार हे केवळ भाररूप होत! पहा कीं, सर्वांगाहीं सुगंध परिपूर्ण जी दमनवल्ली (दवणा) तिला हे सखि! पुष्पाचें काय प्रयोजन होय?"

कर्णलंघिगुणोत्कर्षास्त्यागिनो धन्विनस्तथा ॥
निष्फलान्न विमुंचंति मार्गणान् संमुखे स्थितान् ३११

---

* बेकनचें वाक्य यावरून आठवतें:—— "वाचनानें मनुष्य बहुश्रुत होतो; लिहिण्यानें [illegible] येते आणि संभाषणाच्या योगानें समयसूचकता येते."
("Reading makes a man full, writing exact, and conversation ready")

"( दातृपक्षीं ) दाते जे आहेत ते मार्गणांस ( याचकांस ) त्यांचा गुणोत्कर्ष त्यांच्या कानावरून गेला असतां व ते संमुख आले असतां त्यांस निष्फल दवडीत नाहींत; ह्मणजे अर्थात् त्यांची योग्य संभावना करून त्यांस बोळवितात!

"( धन्विपक्षीं ) धनुर्धर जे आहेत ते संमुख ह्मणजे हातास आलेल्या मार्गणांस ( बाणांस ), कीं ज्यांचा गुण ( दोरी ) आकर्षून कर्णप्रदेशापर्यंत आणला आहे, त्यांस निष्फल सोडीत नाहींत; ह्मणजे नीट लक्ष्यावर योजून त्यांचें संधान करतात!"

चिरश्रांतो दूरादहमुपगतो हंत मलया— ।
तदेकं त्वद्गेहे तरुणि परिणेष्यामि दिवसम् ॥
समीरेणोक्तैवं नवकुसुमिता चूतलतिका ।
धुनाना मूर्धानं नहि नहि नहीत्येव वदति ३१२

वसंतांतील वाऱ्यानें डोलणाऱ्या आम्रमंजरीवर उत्प्रेक्षा:— "हे प्रमदे! हा मी येवढ्या दूरच्या मलयाचलापासून चालत आल्यामुळें अगदीं दमून गेलों आहें, तर एक दिवसभर तुझ्या घरीं मला राहूं दे,— याप्रमाणें वसंत वायूनें प्रार्थना केली असतां नवपुष्पित ( श्लेषार्थ स्पष्ट आहे! ) जी आम्रलता ती शिरःकंपानें छे! छे! छे! ह्मणून जणों काय त्याचा निषेध करते!"

यद्यपि धनेन धनिनः क्षितितलनिहितेन भोगरहितेन ॥
तस्माद्रूपमपि धनिनस्तिष्ठति नः कांचनो मेरुः ३१३ ॥

"पृथ्वीच्या पोटांत पुरून ठेवलेलें जें अनुपभुक्त धन त्याच्या योगानें जर धनी आपणास धनवान् ह्मणवीत असतील, तर मग आह्मीही श्रीमंतच आहों,— अरवा सुवर्णमेरु आमचाच आहे!"

काचिन्मृगाक्षी प्रियविप्रयोगे। गंतुं निशापारमपारयंती ॥
उद्गातुमादाय करेण वीणा-। मेणांकमालोक्य शनैरहासीत् ३१४

"कोणी विरहिणी रात्र जाईना ह्मणून सतार जवळ घेऊन आतां तिजवर गाणार तों मृगांकाकडे पाहून मंदस्मित करती झाली!" अभिप्राय उघडच आहे, कीं, रात्र जाण्याचा जो उपाय आपण करणार तोच ती लांबण्यास मात्र कारण होईल असें तिच्या लक्ष्यांत तेव्हांच आलें. लांबण्याचें कारण 'मृगांक' शब्दांत

सूचित होतें. भृंग हे कमलास अत्यंत तुच्छ असल्यामुळें तो यांवरून असतां येथची गति सहजच सुटली!

उद्योगादनिवृत्तस्य ससहायस्य धीमतः ॥
छायेवानुगता तस्य नित्यं श्रीः सहचारिणी २१५

" निरंतर नेटानें उद्योग करणारा, बुद्धिमान आणि ज्यास मित्रांचा अत्यंत अनुकूलता आहे, अशा पुरुषाच्या मागोमाग संपत्तिही छायेप्रमाणें सहोदित चालत असते!"

विरला जानन्ति गुणान् विरलाः कुर्वन्ति निर्धनस्नेहान् ॥
विरलाः परकार्यरताः परदुःखेनापि दुःखिता विरलाः २१६

" गुणज्ञ लोक विरळ सांपडतात, निर्धन पुरुषावरी स्नेह ठेवणारे विरळा, दुसऱ्याच्या कार्यांना अनुसरणारे थोडेच आणि परदुःख पाहून कळवळणारे थोडेच!"

का विद्या कवितां विनार्थिनि जने त्यागं विना श्रीश्च का।
कः सूनुर्विनयं विना कुलवधूः का स्वामिभक्तिं विना ॥
को धर्मः स दयां विना नरपतिः को नाम नीतिं विना ।
भोगाः के रमणीं विना क्षितितले किं जन्म कीर्तिं विना २१७

" कवितेशिवाय विद्येचा काय उपयोग? पात्रांस दान न केल्यास ती संपत्ति काय उपयोगाची? विनयहीन पुत्र काय कामाचा? नवऱ्यावर जिची भक्ति नाहीं अशा कुलवधूस काय करावें? दया नाहीं तर धार्मिकता ती कसली? नीति ज्यास अवगत नाहीं त्यास राजा काय म्हणावें? रमणीय स्त्रीच्या व्यतिरिक्त भोगांत काय मजा? कीर्तियुक्त नाहीं तर तें जिणें कसलें?"

निष्पद्मं शिशिरेण धीवरगणैर्निर्मत्स्य निःकूर्मकं ।
व्याधैर्निर्विहगं निरम्बु रविणा निर्नालकं दन्तिभिः ॥
निःशालूकमकारि सूकरगणैर्नामैकमात्रं सरो ।
हे जीमूत परोपकारक पयोदानेन मां पूरय ॥ २१८ ॥

" हें सरोवर शिशिर ऋतूनें निष्पद्म करून टाकलें आहे, धीवरानें त्यांतील मकर पार केले आहेत, व्याधांनी त्याच्या तीरीं विहार करणाऱ्या पक्ष्यांचा संहार केला

आहे, रवीनें जल शोषून टाकलें आहे, हत्तींनीं त्यांतील कमलिनी उपटून विध्वंस केला आहे, डुकरांनीं चिखलांतील गवत खाऊन पार केलें आहे,— तेव्हां या सर्वस्व नाशामुळें हें केवळ नामशेष होऊन बसलें आहे; तर हे परोपकारक मेघा! मजवर दया करून मला भरून टाक!"

बधिरयति कर्णकुहरं वदनं मूकयति नयनमंधयति ॥
कुटिलयति गात्रयष्टिं संपद्रोगोऽयमद्भुतो लोके ॥ ३१९ ॥

"संपत्तीचा विकार सार्‍या रोगांहूनही प्रबळ आहे. पहा कीं, याच्या योगानें कान बहिरे होतात, वाचा बसते, डोळ्यांनीं दिसेनासें होतें आणि शरीर वांकडें होतें!" हे लाक्षणिक वर्णन सर्वांस समजण्यासारखेंच आहे.

यावच्चलकलितो वायुरेकीभवितुमर्हति ॥
तावदेव तुरंगोऽयमाजगाम जगाम च ३२०

कोणी घोड्याच्या वेगाचें वर्णन करतो:— "वायु दुभंग झाला असतां तो पुनः मिळून एक जों होतो न होतो, तोंच हा घोडा गेला आणि आला सुद्धां!"

चिकीर्षिते कर्मणि चक्रपाणे- र्नापेक्ष्यते तत्र सहायसंपत् ॥
पांचालजायाः पटसंविधाने । मध्येसभं यत्र तुरी न वेमा ३२१

"भगवंताच्या मनांत कोणतीही गोष्ट कर्तव्य असली ह्मणजे तेथें सहाय्याची अपेक्षा असते असें नाहीं. पहा कीं, जेव्हां द्रौपदीच्या लज्जारक्षणार्थ तो धांवला तेव्हां सभेच्या मध्यें धोट्या किंवा चात्या चालवाव्या लागल्या नाहींत!"

अंब श्राम्यसि तिष्ठ गोरसमहं मथ्नामि मंथानकं ।
मालंब्य स्थितमीश्वरं रसभसं दीनाननो वासुकिः॥
सासूयं कमला त्रपा सुरगणः सानंदमुद्यद्रूपं ।
राहुः भैक्षत यं स वोऽस्तु शिवदो गोपालबालो हरिः ३२२

"आई! तूं दधिमंथन करतांना दमली आहेस तर थांब, मी अमळ मंथन करतों—असें ह्मणून मंथनकाठें ज्यानें ग्रहण केलें असतां ज्याच्याकडे वासुकि दीनमुख होत्साता पाहूं लागला, लक्ष्मी सवतमत्सरानें पाहूं लागली, देवगण आनंदित हो-

कीं प्राण जाऊं लागल्यास त्यांस त्यांनीं अटकाव करावा !”

प्रियायाः साकूतं गलितकबरीबंधनविधा- ।
वुदंचद्दोर्वल्लीदरदलितचेलांचलमुरः ॥
घनाकूतं पश्यत्यथ मयि समंदाक्षिवलितं ।
नमन्त्या यद्रूपं न हि लिखितुमर्हो मनसिजः ३२६

“प्रिया समानसमर्था गलितकचभारांचें बंधन करूं लागली असतां तिच्या उचलित भुजांनीं किंचित् अस्ताव्यस्त झालेल्या अंचलाकडे व वक्षःप्रदेशाकडे मी सस्पृह पाहूं लागलों असतां तिनें मान वळवून लज्जामंद कटाक्षांनीं जें मजकडे अवलोकन केलें तें रेखाटण्यास प्रत्यक्ष मदनही समर्थ होणार नाहीं।”

सहस्रकरपूरणात्स्थगितजन्तुवक्त्राम्बुज- ।
प्रकाशकरणादथ प्रबलवैरितेजोवधात् ॥
दरिद्रतिमिरोद्धृतेरखिलभूपचूडामणि— ।
र्जगन्मणिरहर्मणिर्जगति द्विधा नः नृप ॥ ३२७॥

कोणी कवि राजाचा स्तव करतो :— “सर्व भूपांत श्रेष्ठ व पृथ्वीचें रत्न असा हा राजा आणि सूर्य हे दोघे मिळून जगाचें पालन करीत आहेत; कसें? तर सूर्य सहस्रकिरण प्रगट करतो व हा राजा हजारों याचकांचे हस्त दानपूरित करतो; सूर्य सर्व प्राण्यांच्या मुखकमलांस प्रकाशित करतो व राजाही सर्वांचीं तोंडें प्रफुल्लित करतो; सूर्य इतर ग्रह जे त्याचे प्रतिस्पर्धी त्याचा तेजोवध करतो आणि राजा आपल्या शत्रूंस स्वप्रतापानें दिपवून टाकतो; आणि सूर्य जसा अंधकाराचा ध्वंस करतो त्याप्रमाणें राजा हा राष्ट्रांत दारिद्र्य म्हणून राहूं देत नाहीं!”

सेयं सीधुमयी वा सुधामयी वा हलाहलमयी वा ॥
दृग्भ्यां निपीतमात्रा मदयति मोदयति मूर्च्छयति च ३२८

“ही मद्यमय आहे! अमृतमय आहे! किंवा विषमय आहे हें मला कळत नाहीं; पहा कीं डोळ्यांनींच हिचें प्राशन करतांच उन्माद येतो, हर्ष होतो व मूर्च्छाही प्राप्त होते!”

दोषमपि गुणवति जने दृष्ट्वा गुणरागिणो न खिद्यन्ते ॥
प्रीत्यैव शशिनि पतितं पश्यति लोकः कलंकमपि ॥ ३२९॥

ज्या भिंगानें ते क्षणभर प्रगट व क्षणभर अप्रगट करीत आहेत; कीं ज्याप्रमाणें निर्धन पुरुष कोणाचा अपहार करून मिळविलेलें सोनें केव्हां लपवितात केव्हां बाहेर काढतात!"

चेत्कांचनशैलावस्या वक्षोरुहौ तन्व्याः ॥
नो चेत्तावधिरूढा कथमनिमिषतां भजेत मे दृष्टिः ३३४

" या तन्वीचे वक्षोज हे कांचनशैल (सुमेरु) होत यांत संशय नाहीं; कां कीं, तसें नसतें तर त्यांवर आरूढ होतांच माझी दृष्टि अनिमिष झाली हें कसें ? " *

बलिः पातालनिलयोऽधः कृतश्चित्रमत्र किं ॥
अधःकृतो दिवस्थोऽपि चित्रं कल्पद्रुमस्त्वया ३३५

" हे राजा ! पातालांत असणाऱ्या बलीस तूं दानशूरत्वांत खालीं केलास यांत नवल तें काय? पहा, स्वर्गस्थ कल्पतरूस तूं खालीं करून टाकला आहेस ! "

यदेतच्चन्द्रान्तर्जलदलवलीलां वितनुते ।
तदाचष्टे लोकः शशक इति नो मां प्रति तथा ॥
अहं त्विन्दुं मन्ये त्वदरिविरहाक्रान्ततरुणी— ।
कटाक्षोल्कापातव्रणकिणकलंकांकिततनुं ३३६

चंद्रगत कलंकावर उत्प्रेक्षा :— " हे राजा ! चंद्राच्याठायीं लहानशा ढगासारखें जें दिसतें त्याविषयीं लोक असा कल्पना करतात कीं, तो ससा आहे, पण मला तसें भासत नाहीं; माझी कल्पना अशी होते कीं, तुझ्या शत्रूंच्या स्त्रिया या पतिविरहें असह्य होऊन चंद्राकडे जे निर्भर्त्सनपर तीव्र कटाक्ष फेंकतात त्याच्या योगानें त्यास व्रण पडले असावे ! "

रे रे रासभ वस्त्रभारवहनात्कुग्रासमश्नासि किं ।
राजाश्वावसथं प्रयाहि चणकाभ्यूषान् सुखं भक्षय ॥
सर्वान्पुच्छवतो हया इति वदन्त्यत्राधिकारे स्थिताः ।
राजा तैरुपदिष्टमेव मनुते सत्यं तटस्थाः परे ॥ ३३७ ॥

---

* अनिमिष म्हणजे जिचीं पातीं लवत नाहींत अशी. सुमेरूवर वास करणारे जे देव त्यांच्या लक्षणांपैकीं एक लक्षण हें आहे कीं, मनुष्यांप्रमाणें त्यांच्या डोळ्यांच्या पापण्या लवत नाहींत. तर यावरून कवि कल्पना करतो कीं ज्या अर्थीं आरोहण पावेंकरून हें दैविक लक्षण दृष्टीस प्राप्त झालें,— म्हणजे ती तेथें निश्चल झाली;— त्या अर्थीं स्तन हे खरोखर सुवर्णाचल होत !

त्यानें रचून आपल्या चुलत्याच्या हवालीं करण्यास सांगितलें :——

"हे राजा! कृतयुगास अलंकारभूत जो मांधाता राजा तो गेला; ज्यानें महोदधीवर सेतु रचना केली तो दशाननांतक राम तरी कोठें आहे? दुसरे जे युधिष्ठिरादि राजे मोठे मोठे होऊन गेले तेही सर्व स्वर्गाचा मार्ग धरते झाले;—— पण इतक्यांपैकीं एका बरोबरही ही पृथ्वी गेली नाहीं. ही बहुधा तुजबरोबर मात्र येईल असें वाटतें!"

मुरली महदीयवंशजा। परपुंसा परिचुंबिता सती ॥
विजने विपिने भयातुरा। परमेशं स्मरती रराससा ३४०

"महावंशापासून (पक्षीं, वेळूपासून) उत्पन्न झालेली मुरली ही परपुरुषानें (पक्षीं, कृष्णानें) चुंबिली गेली असतां, आपण एकीकडे रानीं आहों असें जाणून भयभीत होत्साती परमेशाचें स्मरण करूनच जणों काय आक्रोश करती झाली!"

विद्वद्राजशिखामणे तुलयितुं धाता त्वदीयं यशः।
कैलासं च निरीक्ष्य तत्र लघुतां निक्षिप्तवान् पूर्तये॥
उक्षाणं तदुपर्युमासहचरं तन्मूर्ध्नि गंगाजलं ।
तस्याग्रे फणिपुंगवं तदुपरि स्फारं सुधादीधितिं३४१

"हे रुद्रशिरोमणि राजा! तुझ्या यशाचें परिमाण करण्याचें मनांत आणून ब्रह्मदेवानें पहिल्यानें सगळा कैलासच्या कैलास पारड्यांत घातला; पण तेवढ्यानें होत नाहींसें पाहून नंतर त्यावर नंदी उभा केला; त्यापुढें शिव व पार्वती हीं नंदीवर बसविलीं; पुढें शिवाच्या जटेवर गंगेस ठेविलें. नंतर सर्प व त्यावर शोभणारा देदीप्यमान चंद्र यांचें आरोपण केलें!"

दारिद्र्यानलसंतापः शांतः संतोषवारिणा ॥
याचकाशाविघातांतर्दाहः केनोपशाम्यतु ३४२

"दारिद्र्यरूप अग्नीचा संताप संतोषरूप उदकानें शमन पावला; पण दारीं आलेल्या याचकाच्या आशाभंगानें जो अंतर्दाह होतो तो कशानें शांत व्हावा?" तात्पर्य हें कीं, स्वतःचें दैन्य सज्जन हे धैर्यैकरून सोसतील; पण दुसऱ्याच्या दैन्याचें निवारण करण्याचें जें असामर्थ्य दारिद्र्याच्या पोटीं येतें त्याचे दुःखावेग कसे सहन करावे?

धन्या सा गृहदेहली स्पृशति या तत्पादपद्मभ्रमं।

जाता सा सरसी रसाद्विशति सा यस्यां विहारेच्छया॥
वंद्यः कोऽपि स एव यः खलु तया नेत्रेण संभाव्यते ।
धिग्धिग्वेधसमेषु मां पदनयन्नेकं कथंचित्कथं ॥ ३४३॥

कोणी उत्कंठित म्हणतो:—— "तिच्या चरणाची मर्मा ज्याच्यावर पडते तो उंबरठा धन्य होय; ज्या पुष्करिणींत ती विहार करण्यास हौसेनें उतरते ती स्पृहणीय होय; व जो कोणी तिच्या प्रेक्षणानें धन्यत्व पावतो तो वंद्य होय; पण ब्रह्मदेवास धिक्कार असो की, त्यानें या तिहींपैकीं एके ठिकाणीही माझा योग होऊं दिला नाहीं!"

स्फुरसि बाहुलते किमनर्थकं ।
त्वमपि लोचन दाम भवस्थिरम् ॥
तमहमागतमप्यपराधिनं ।
न परिरब्धुमलं नच वीक्षितुं ॥ ३४४॥

"हे भुजलते! तूं उगीच कशाला स्फुरण पावतेस? हे वामनेत्रा! तूंही स्थिर हो कसा! कां कीं तो अपराधी मजकडे आला तरीही मी त्यास आलिंगन करणार नाहीं किंवा त्याच्याकडे नुसती पाहणार देखील नाहीं!" ही अर्थातच खंडित झालेल्या मानिनीची उक्ति होय.

याःपश्यंति प्रियं स्वप्ने धन्यास्ताः सखि योषितः॥
अस्माकं तु गते कांते गता निद्राऽपि वैरिणी ३४५

"ज्या स्त्रियांस आपल्या वल्लभाचा समागम स्वप्नांत घडतो त्या धन्य होत; पण आमची तर विरहसमयीं अशी स्थिति होते कीं, वैरीण निद्राही आम्हांस पारखी!"

राजन् दौवारिकादेव प्राप्तवानस्मि वारणं ॥
मदवारिणमिच्छामि त्वत्तोऽहं जगतीपते ३४६

"हे राजा! तुझ्या द्वारपालापासूनच मी वारण (गमनप्रतिबंध—पक्षीं, हत्ती) पावलों; तेव्हां आतां तुजपासून मदवारणाची (माझ्या अप्रतिबंधाची;—पक्षीं, मदोन्मत्त हत्तीची) मी अपेक्षा करतों!"

अर्था न संति नच मुंचति मां दुराशा ।

त्यागे रतिं वहति दुर्ललिते मनो मे ॥
यांचा च लाघवकरी स्ववधे च पापं ।
प्राणाः स्वयं व्रजत किं परिदेवितेन ३४७

कोणी दरिद्री आपली स्थिति वर्णितो:—" मजपाशीं पैसा नाहीं; इकडे पहावें तर धनतृष्णा मला सोडीत नाहीं. माझें लाडकें मन दुसऱ्याची धनाशा पूर्ण करण्याविषयीं उत्सुक होतें; पण इकडे यांचा तर लघुत्व आणणारी आहे. बरें. या दोहेंपासून आपणास मुक्त करून टाकीन म्हटलें तर आत्महत्येचें महापातक धरलें आहे. तेव्हां हे प्राणांनो! तुम्ही आपोआपच मला सोडून जा कसे! व्यर्थ शोक करून फळ काय? "

कूपे पानमधोमुखं भवति मे नद्यो वराक्यः स्त्रियः।
सारंगैर्बकटिट्टिभैः सह सरस्येवं समालोकयन्॥
नादत्ते तृषितोऽपि हीनसलिलं क्रूरैर्वृतं जंतुभि-।
र्मानादुन्नतकंधरः सुरपतिं तच्चातको याचते ३४८

चातकाच्या दिव्यजलपानावर उत्प्रेक्षा:—" विहिरींतें पाणी पिण्यास अधोमुख व्हावें लागतें, नद्या तर बिचाऱ्या स्त्रियाच आहेत, सरोवर हे हंस बक आणि टिट्टिभ यांनीं परिपूर्ण असतें; तेव्हां क्रूर प्राण्यांनीं व्याप्त अशा कुजलसंचयापासून जें उदक घ्यावयाचें तें तृषासमयींही घेण्याचें न पतकरून मानी जो चातक तो गर्वानें ऊर्ध्वकंठ होत्साता देवाधिदेव जो इंद्र त्यापाशीं काय ती याचना करतो."

भवारण्यं भीमं तनुगृहमिदं छिद्रबहुलं ।
बली कालश्चोरो नियतमसिता मोहरजनी ॥
गृहीत्वा ज्ञानासिं विरतिफलकं शीलकवचं ।
समाधानं कृत्वा स्थिरतरदृशो जागृत जनाः ३४९

"हे जनहो! हें संसारारण्य भयंकर आहे, शरीररूप गृह सुरक्षित असेल म्हणावें तर हें मुळींच बहुच्छिद्र आहे, मृत्युरूप चोर हा बलिष्ठ आहे, मूढत्वरूप रात्रीही केवळ अंधकार व्याप्त आहे; तर ज्ञान हाच खड्ग, शांति हीच ढाल, शील हेंच कवच अशीं तीन घेऊन मोठ्या खबरदारीनें जागत बसा!"

दैवें समर्प्य चिरसंचितकर्म जालं।

सुस्थाः सुखं वसत किं परयाचनाभिः ॥
मेरुं प्रदक्षिणयतोऽपि दिवाकरस्य ।
ते तस्य सप्त तुरगा न कदाचिदष्टौ ॥२५०॥

"निरसंचित जें कर्मजात त्याचा दैवावर हवाला ठेवून स्वस्थपणें कालानें रहा; परयाचना करून काय प्राप्त होणार आहे? पहा कीं, येवढा सूर्य सुवर्णमेरूस प्रदक्षिणा घालीत असतां त्याचे जे सात घोडे आहेत ते आहेत; सातांचे आठ कधीं तरी झाले आहेत काय?"

परस्परं संवदतां जडानां । मौनं विधेयं सततं सुधीभिः ॥
कोलाहले काकजनस्य जाते । विराजते कोकिलकूजितं किं २५१

"मूर्खांचें परस्पर भांडण लागलें असतां बुद्धिमान् पुरुषांनीं नेहमीं मौन धारण करावें हें बरें; कावळ्यांचा कलकलाट चालला असतां कोकिलाचें कूजित शोभतें काय?"

उपभुक्तखदिरवीटीजनिताधररागभंगभयात् ॥
पितरि मृतेऽपि हि वेश्या रोदिति हा तात तातेति २५२

"विडा खाऊन कातानें तोंड रंगलें असतां अधरोष्ठांची लाली मोडेल या भयानें वेश्या ही आपल्या बापाच्या मरणाची बातमी ऐकून निरोष्ठ शोक करते, "हा तात! हा तात!" ('हा पितः' म्हणेल तर ओंठाला ओंठ लागून अधररागाचा भंग होईल!)"

किमंगारवद्गां खुरैः स्पर्शयंतः। कुरंगा इवांगानि संकोचयंतः ॥
अटंतो नटंतो भटं तोषयंत-स्तुरंगाः सुरंगाः पुरं गाहयंति २५३

"पृथ्वीवर जणों काय निखारेच पसरले आहेत अशा भावनेनें तिला खुरांनीं स्पर्श करणारे न करणारे, हरणांप्रमाणें अंगसंकोच करणारे, फिरणारे, नाचणारे आणि राउताच्या मनांत भरणारे, असे चांगल्या चांगल्या रंगाचे घोडे नगरींत प्रवेश करिताहेत!"

यदि प्रभुरुदारधीः सुरसकाव्यकौतूहल- ।
स्तथैव च सभासदः सदसि तद्गुणग्राहिणः ॥
सुवर्णसदलंकृतिर्भवति तत्र नृत्योद्यता ।
मदीयरसनानटी रसघटीयमानंद्रुमुः ॥२५४॥

"जर प्रभु उदार असेल आणि सुरसकाव्याच्या श्रवणाविषयीं त्यास हौस असेल, त्याप्रमाणेंच सभासद हे काव्यगुणग्राहक असतील, तर रसाची केवळ पात्रीच आणि आनंददायक अशी जी माझी जिव्हारूप नटी ती सुवर्ण-(सोनें: उत्तम वर्ण)-घटित अलंकारांनीं (श्लेष स्पष्टच आहे) युक्त होत्साती सभेंत नृत्य करण्यास तयार आहे!"

यन्नाम्नः प्रथमाक्षरं विजयते भानौ द्वितीयाक्षरं ।
नृत्यं नृत्यति सत्कवीन्द्रवदने भूत्वान्त्यवर्णद्वयम् ॥
रामो रावणमाजघान समरे शंभोः शिरः शालिनी ।
सा सर्वाक्षरमालिनी भवतु मे भाग्याय भागीरथी ३५५

"जिच्या नांवाचें पहिलें अक्षर (भा-'तेज'), सूर्याचे ठायीं विराजमान होतें, दुसरें (गी-'वाणी'), सत्कवींच्या वदनाचे ठायीं नृत्य करते आणि शेवटलीं दोन अक्षरें (रथी) होऊन रामानें रावणास रणांगणीं मारिलें ती शंभु शिरीं शोभणारी सर्वाक्षरयुक्त भागीरथी माझा भाग्योदय करो!"

स्वयं स्थाणुरपर्णा स्त्री विशाखस्तनयः स्मृतः ॥
तथापि कुरुते छायां भवतापापहारिणीं ॥३५६॥

"शिव हा स्वतः स्थाणु (शंकर: झाडाचा बुंधा) आहे, स्त्री अपर्णा (पार्वती: पर्णरहिता) आणि पुत्र विशाख (कार्तिकेय; शाखारहित) होय, तरी शिवाची छाया संसारतापास दूर करते!"

बिडौजाः पुरा पृष्टवानब्जयोनिं। धरामंडले सारभूतं किमस्ति ॥
चतुर्भिर्मुखैरुत्तरं तेन दत्तं। तमाखुस्तमाखुस्तमाखुस्तमाखुः ३५७

"पूर्वी एके समयीं असें झालें कीं, इंद्रानें ब्रह्मदेवास प्रश्न केला, कीं पृथ्वीतलावर सर्वोत्कृष्ट वस्तु आपण कोणती निर्माण केली आहे? ब्रह्मदेवानें चारी मुखानीं एकदम उत्तर केलें, "तमाखु, तमाखु, तमाखु, तमाखु!"

कीटोऽयं भ्रमरी भवेदविरतध्यानात्तथा चेदहं ।
रामः स्यां त्रिजटे तथात्वनुचितं दांपत्यसौख्यच्युता ॥
एवं चेत्कृतकृत्यतैव भविता रामस्तव ध्यानतः ।
सीता त्वं च निहत्य राक्षसपतिं सीतांतिके यास्यति ३५८

सीता अशोकवनिकेंत असतां तिनें व त्रिजटेनें एका भ्रमरानें एक किडा धरले-ला पाहिला. त्यावरून सीता त्या राक्षसीस ह्मणते:—

"हे त्रिजटे! या किड्यास भ्रमराचें ध्यान लागलें असल्यामुळें हा भ्रमर होईल; तद्वतच माझा जर राम बनलें तर मातें अनुचित होऊन मी दंपत्य सौख्यापासून भ्रष्ट हो-ईन." त्रिजटा ह्मणते. "असें जर घडेल तर कृतकृत्यता होईल; कां तर राम तुझ्या ध्या-नें करून सीता होईल आणि तूं राम होत्साती रावणास मारून सीतेच्या भेटीस जा-शील!"

जन्मप्रभृति वक्रस्य हलस्य च खलस्य च ॥
सोढुं तयोर्मुखाक्षेपं भवत्येकैव सा क्षमा ३५९

"जन्मापासून वक्र जो हल (नांगर) आणि खल यांच्या तोंडाचा तडाखा सो-सण्यास एक क्षमाच (पृथ्वी, शांति) समर्थ!"

धत्तूरधूर्त तरुणेंदुनिवासयोग्ये ।
स्थाने पिशाचपतिना विनिवेशितोऽपि॥
किं कैरवाणि विकसंति तमः प्रयाति ।
चंद्रोपलो द्रवति वार्धिरुपैति वृद्धिं॥ ३६०॥

"हे धोतऱ्याच्या धूर्ता! जें स्थान बालचंद्राच्या वसतीस योग्य तेथें शंकरानें तु-ला ठेविला असतांही तुझ्या योगानें कैरवें विकास पावतात काय? अंधकाराचा नाश होतो काय? चंद्रकांत द्रवतो काय? आणि समुद्र वाढतो काय?"

तथ्यं पथ्यं सहेतु प्रिय मित मृदुलं सारवद्दैन्यहीनं ।
साभिप्रायं दुरापं सविनयमशठं चित्रमल्पाक्षरं च ॥
तद्धर्थं कोपशून्यं स्मितयुतघनदाक्षिण्यसंदेहहीनं ।
वाक्यं ब्रूयाद्रसज्ञः परिषदि समयं सम्यमेयामसत्तं ३६१

"रसज्ञानें सभेंत समय पाहून जें वाक्य बोलायाचें तें अशा प्रकारचें असावें-:— खरें, हितकर, सप्रमाण, प्रिय, मित, मृदु, अर्थयुक्त, धीटपणाचें, साभिप्राय, दुर्लभ, विनययुक्त, प्रांजल, मनोहर, स्वल्प, प्रौढ, शांत, सस्मित, दाक्षिण्ययुक्त, निःसंदेह, मर्मस-हित आणि असारहित."

पदशब्दलीनहृदयो रूपालंकारभावनाचतुरः ॥

कविरिव विनिहितनिद्रस्तरुणि तवार्थे स्थितस्तरुणः ३६२

दूती नायिकेस सांगते:— "हे तरुणि, जसा कवि पदांच्या व शब्दांच्या चिंतनेंत गढून गेला असतो व रूपकालंकार साधण्याविषयीं चतुर असतो त्याप्रमाणें नायक हा निद्रेचें मिष करून तुझ्याकरतां संकेतस्थानीं येऊन बसला आहे; कसा तर तुझ्या पावलाचा शब्द ऐकण्याविषयीं परमोत्सुक आणि तुझें रूप व अलंकार यांची मनोमय भावना करण्यांत चूर होऊन गेलेला असा!"

उद्भिन्नं किमिदं मनोभवनृपक्रीडारविंदद्वयं ।
सूते तत्कथमेकतः किल लसद्रोमावलीनालतः ॥
चक्रद्वंद्वमिदं क्षमं तदपि न स्थातुं मुखेंदोः पुरो ।
लावण्यांबुनिमग्नयौवनगजस्यावैमि कुंभद्वयं ३६३

कोणी कवि स्तनद्वयावर उत्प्रेक्षा करतो:— " मदन नृपाचें हें क्रीडाकमलद्वय उत्पन्न झालें काय! पण असें ह्मणावें तर उदरस्थलावर शोभणारी जी रोमावलीरूप वेली ती एक असतां या पुष्पद्वयास कशी प्रसवेल? तेव्हां ही कल्पना जमत नाहीं. बरें, हें चक्रवाक पक्ष्यांचे जोडपें आहे ह्मणावें तर मुखचंद्राच्या समोर हें वियुक्त झाल्या खेरीज कसें राहील? तेव्हां माझा असा तर्क होतो कीं लावण्यरूप जलाशयांत बुडी मारून राहिलेला जो यौवनरूप गज त्याचें हें गंडस्थल होय!"

दंता विश्लथदंताः केशाः काशप्रसूनसंकाशाः ॥
नयनं तमसामयनं तथापि चित्तं धनांगनायत्तं॥ ३६४॥

"दांत हालूं लागले, केश हे काशपुष्पांप्रमाणें पांढरे झाले, डोळे हे अंधकाराचें स्थान झालें, तथापि चित्ताची आसक्ति धन आणि स्त्री यांवरील कमी होत नाहीं!"

तप्ता मही विरहिणामिव चित्तवृत्ति-स्तृष्णाऽध्वगेषु कृपणेष्विव वृद्धिमेति॥
सूर्यः करैर्दहति दुर्वचनैः खलो नु। छाया सतीव न विमुंचति पादमूलं ३६५

"उष्णकालांतील मध्यान्हाचें वर्णनः—" विरही पुरुषांच्या चित्तवृत्तीप्रमाणें पृथ्वीही अत्यंत तप्त झाली आहे, कृपणाचे ठायीं जशी (धन-) तृष्णा वाढत असते त्याप्रमाणें पांथांची पाण्याची वाढत आहे, जसा दुर्जन हा दुर्वचनांनीं दुसऱ्यास जा-

लीन असतो त्याप्रमाणें सूर्य हा आपल्या किरणांनीं संताप करीत आहे आणि छाया ही साध्वीप्रमाणें चरणांची मिठी सोडीत नाहीं !"

जीवंतु मे शत्रुगणाः सदैव। तेषां प्रसादात्सुविचक्षणोऽहं॥
ये ये यथा मां प्रति बाधयंति। ते ते तथा मां प्रति बोधयंति ३६६

"माझे शत्रुगण चिरकाळ जीवंत असोत; त्यांच्या प्रसादानें मला बुद्धि प्राप्त झाली आहे. जे जे मला बाधा करितात ते ते मला त्याच मानानें बोधही करितात."

रोलंबो मधुपः पिकस्तु परभृद्रंध्रानुसारी मरुद्- ।
हंसाः केवलपक्षपातनिरताश्चंद्रोऽपि दोषाकरः ॥
चेतो नेति शुकस्त्विहैकपठिता ख्याती पयोदो जडः।
कं वाहं प्रहिणोमि हंत कठिनस्वांताय कांताय मे ३६७

कोण्या विरहिणीची उक्ति :— "कठिणहृदय जो वल्लभ त्याच्याकडे दूत तरी कोण पाठवावा ! भ्रमर तर मधुप ( मद्यप ), कोकिल दुसऱ्याचे घरीं वाढलेला, वायु हा रंध्रान्वेषी, हंस हे केवळ पक्षपात करणारे ( नेहमीं पंख हलविणारे ), चंद्र हा दोषाकर ( दोषांची खाण; निशाकर ). पनाच्यानें तर जाववतच नाहीं. शुक पढविलेलें तेवढें बोलणारा आणि मेघ हा जड ( मंदबुद्धि ) होय !"

बहुनिष्कपटद्रोही बहुधान्योपघातकः ॥
रंध्रान्वेषी च सर्वत्र दूषको मूषको यथा ३६८

खल आणि मूषक यांचें साम्य :— "( खलपक्षीं )- जे अत्यंत निष्कपट त्यांचा द्रोह करणारा, प्रायः दुसऱ्याच्या नाशाविषयीं उद्युक्त आणि सर्वत्र छिद्रान्वेषणाविषयीं तत्पर, असा खल असतो."

"( मूषकपक्षीं )- अत्यंत मूल्यवान वस्त्रांचा नाश करणारा, धान्याचा विध्वंस करणारा आणि जिकडे तिकडे भोंकें पाडणारा."

आजन्मानुगतेऽप्यस्मिन्नाले विमुखमंबुजं॥
प्रायेण गुणपूर्णेषु रीतिर्लक्ष्मीवतामियं॥३६९॥

"जन्मापासून अनुगत म्हणजे मागें असणारें जें नाळ त्याहीं ही कमळ हें

विकसित होऊं लागलें असतां विमुख होतें; तेव्हां लक्ष्मी ज्यांस प्राप्त होते, त्यांची गुणवंताविषयीं ('गुण' शब्द श्लिष्ट होय) अनास्था व्हावयाचीच!"

तवैव मावीण्यं जलद जगदानंदकरणं ।
यदंभः पालीग हरसि खलसत्त्वाज्जलनिधेः ॥
निसर्गात्सारास्ता नयसि च कथंचिन्मधुरता- ।
मथा सारैस्तासां युगपदुपकर्तासि जगतः ३७०

"हे मेघा! तुझेंच कौशल्य या जगास आनंद करणारें आहे. तें असें कीं, दुष्ट-सत्त्व (दुष्टस्वभाव. पक्षीं दुष्ट आहेत जलचर ज्यांत) जो समुद्र त्यापासून उदक-समूहाचें तूं हरण करतोस आणि तीं उदकें स्वभावतः क्षारयुक्त असतां त्यांचे ठा-यीं तूं चमत्कारिक रीतीनें माधुर्य उत्पन्न करून त्यांच्या वृष्टींनीं जगाचें हित करतो-स!"

अक्षराणि परीक्ष्यंतामंबराडंबरेण किम् ॥
शंभुरंबरहीनोऽपि सर्वज्ञः किं न जायते ३७१

"कोणाच्या विद्वत्तेची परीक्षा कर्तव्य असतां त्याची विद्या पहावी; पोषाखा-चा थाटमाट काय करावयाचा आहे? पहा कीं, शंभु हा वस्त्रहीन असल्यानें त्या-ची सर्वज्ञता नाहींशी होते काय?"

इह रूपमात्रसारे चित्रगते कनककल्हारे ॥
न रसो नापि च गंधो मधुकरबंधो वृथा परिभ्रमसि ३७२

"हे मूढ मधुकरा! हें चित्रांतील सुवर्णकमल केवळ रूपानें मात्र खऱ्या कमला-सारखें आहे! यांत मकरंद नाहीं व सुगंधही नाहीं; मग उगीच कशाला भोंवतालीं हिंडत आहेस?"

कवयति पंडितराजे कवयंत्यन्येऽपि विद्वांसः ॥
नृत्यति पिनाकपाणौ नृत्यंत्यन्येऽपि भूतवेतालाः ३७३

पंडितराय आपली व स्वकालीन कवींची तुलना करतातः——
"पंडितराज कविता करीत असतां दुसरे विद्वानही कवित्व करीत आहेत; ज्या-प्रमाणें शिव तांडव करूं लागला असतां भूतवेतालादि मंडळी ही नाचूं बागडूं लागते!"

च्युता दंताः सिताः केशा वाङ्निरोधः पदे पदे ॥
पातसज्ज मिमं देहं तृष्णा साध्वी न मुंचति ३७४

" दांत पडले, केस पांढरे झाले आणि प्रत्येक शब्दाला जीभ अडखळते; पण याप्रमाणें हा देह पतनोन्मुख झाला असतां आशा ही साध्वी स्त्रीप्रमाणें सोडीत नाहीं!"

अलमतिचपलत्वात्स्वप्नमायोपमत्वात्।
परिणतिविरसत्वात्संगमेनांगनायाः ॥
इति यदि शतकृत्वस्तत्त्वमालोकयाम-।
स्तदपि न हरिणाक्षीं विस्मरत्यंतरात्मा ३७५

" क्षणभर टिकणारा, स्वप्नदर्शनाप्रमाणें आभासरूप आणि परिणामीं विरस, असा जो स्त्रीसंगम तो पुरे झाला, असें शंभर वेळां जरी आपणास तत्त्व कळलें, तथापि जीव हा हरिणाक्षीपुढें पुनः लुटपुटतोच !"

औत्सुक्यात्परिमिलतां त्रपया संकोचमंचतां च मुहुः॥
नवसंगमयोर्यूनो नयनानामुत्सवो जयति॥३७६॥

" उत्कंठेनें एके ठिकाणीं मिळणारे आणि लज्जेनें पुनः संकोच पावणारे असे जे नूतन विवाहित स्त्रीपुरुषांचे नेत्र त्यांचा विलास हा अत्यंत शोभा पावतो!"

वयोवृद्धास्तपोवृद्धा ये च वृद्धा बहुश्रुताः॥
ते सर्वे धनवृद्धस्य द्वारि तिष्ठंति किंकराः ३७७

" वयोवृद्ध, तपोवृद्ध आणि विद्यावृद्ध हे सर्व धनवृद्धाच्या द्वारीं दास होऊन राहता-

तल्पे प्रभुरिव गुरुरिव मनसिजशास्त्रे श्रमे भुजिष्येव ॥
गेहे श्रीरिव गुरुजनपुरतो मूर्तेव सा व्रीडा ॥ ३७८ ॥

" शय्यास्थानीं ती मला प्रभूप्रमाणें होय, कामशास्त्रांत गुरुप्रमाणें, गृहकृत्यांत सेवकाप्रमाणें, घरांत लक्ष्मीप्रमाणें आणि वडिल माणसांपुढें जणों मूर्तिमती लज्जाच!"

यस्य नास्ति विवेकस्तु केवलं यो बहुश्रुतः॥
स न जानाति शास्त्रार्थान् दर्वी पाकरसानिव ३७९

" ज्याला स्वतः विवेचनाचें सामर्थ्य नाहीं त्यानें जरी बहुत अध्ययन केलें नरी त्यास शास्त्रांतील गम्य असत नाहीं. ज्याप्रमाणें सैपाकांतल्या पळीला जातीनें तिखट मीठ गोड वगैरे कांहीं कळत नाहीं, तिचें काम नुसतें ढवळण्याचें!"

अर्थो नराणां पतिरंगनानां । वर्षा नदीनामृतुराट् तरूणाम् ॥
स्वधर्मचारी नृपतिःप्रजानां । गतं गतं यौवनमानयंति॥३८०॥

" अर्थसंचय हा पुरुषांचें, पति स्त्रियांचें, वर्षर्तु नदींचें, ऋतूंचा राजा जो वसंत तो वृक्षांचें, स्वधर्मास अनुसरून वागणारा राजा प्रजांचें यौवन पुनःपुनः त्यांस आणितो."

गौरवं प्राप्यते दानान्नतु वित्तस्य संचयात् ॥
स्थितिरुच्चैःपयोदानां पयोधीनामधः स्थितिः ३८१

" गौरव जें प्राप्त होतें तें द्रव्याच्या दानानें होते, संचयानें होत नाहीं. पहा कीं, मेघांची स्थिति आकाशांत आणि समुद्रांची भूमीवर!"

वस्त्रं यच्छतु वा नवा नरेशो।मम कर्णेऽपि च भारतीं करोतु ॥
रतिमिच्छतु वा नवा नवोढा।यदि केलीगृहदेहलीमुपैतु॥३८२॥

" राजा हा भला द्रव्य देवो किंवा न देवो, माझ्याशीं त्यानें कानगोष्ट मात्र करावी म्हणजे झालें; नूतन स्त्री ही रतेच्छा मनांत धरो अथवा न धरो, क्रीडामंदिराच्या उंबरठ्यावर तिनें पाऊल ठेवावें म्हणजे झालें!"

रे कूप जीवनागार यदि दातृत्वमिच्छसि ॥
तदा त्वं गुणवत् पात्रमेकं वा संनिधौ कुरु ३८३

"जीवनाचें ( उदकाचें — जीविकेस साधन जें द्रव्य त्याचें ) आगर असणाऱ्या हे कूपा! तुला जर दातृत्वाची कीर्ति संपादन करण्याची असेल तर तूं आपल्या जवळ एक गुणवत् पात्र( दोरी लावलेलें भांडें — गुणवान् पुरुष ) ठेव!"

गलच्चक्षु मिलज्जानु मस्खलच्च पदे पदे ॥
मक्षिकालक्षसंयुक्तं भट्टनट्टू विराजते॥३८४॥

कोणी भटजींच्या तट्टाचें वर्णन करतो:— " ज्याचे डोळे अर्धमुर्धे मिटलेले

आहेत, गुडघे एकमेकांस लागलेले आहेत, जें पावलोपावलीं अडखळतें आणि ज्यास मार्गांनीं पीडलेलें, असें म्हातारपण विराजमान होतें!”

कृत्वा विग्रहमश्रुपातकलुषं शय्यासनादुत्थिता ।
क्रोधार्ताऽपि विगृह्य गर्भभवनाद्द्वारं रुषा प्रस्थिता ॥
दृष्ट्वा चंद्रमसं प्रभाविरहितं प्रत्यूषवाताहता ।
हा रात्रिस्त्वरिता गतेति पतिना कांता प्रियस्योरसि ३८५

“ नवऱ्याशीं भांडून व रडून कढून फणकाऱ्यानें पलंगावरून उठली आणि तशीच रागानें महालाच्या दाराकडे जाऊं लागली; पण इतक्यांत प्रभाविरहित झालेला चंद्र तिच्या दृष्टीस पडला व पहांटचा गार वारा अंगाला लागला, तेव्हां खेद पावून पुनः माघारी आली आणि ‘ रात्र ही किती लवकर गेली ’ असें म्हणून कांतास आलिंगिती झाली!”

युगपत् स्वगंडचुंबनलोलौ पितरौ निरीक्ष्य हेरंबः ॥
तन्मुखमेलनकुतुकी स्वाननमपनीय परिहसन् पायात् ३८६

“ शिव व पार्वती या दोघांस आपल्या चुंबनाविषयीं एकदम उत्कंठ पाहून गणपतीनें काय केलें कीं आपलें तोंड एकदम मागें घेतलें; तेव्हां त्यांचींच मुखें परस्पर मिळालेलीं पाहून हंसणारा जो हेरंब तो तुमचें रक्षण करो!”

मय्येव जीर्णतां यातु यत्त्वयोपकृतं कपे ॥
नरः प्रत्युपकारार्थं विपत्तिमभिवांछति ३८७

रामाची मारुतीप्रत उक्तिः—“ हे कपे! तुझे जे मजवर उपकार आहेत ते माझेच ठायीं जिरून जावोत, ते फेडण्याची मी इच्छा करीत नाहीं; कां कीं प्रत्युपकार करायाचा म्हटला म्हणजे दुसऱ्याच्या विपत्तीची आशा करावी लागते!”

उडुराजमुखी मृगराजकटि-र्गजराजविराजितमंदगतिः ॥
यदि सा वनिता हृदये निहिता क्व जपः क्व तपः क्व समाधिगतिः ३८८

“चंद्रासारखें जिचें वदन, सिंहाच्या सारखी कंबर आणि गजराजाप्रमाणें विराजमान अशी मंदगति, अशी वनिता जर हृदयस्थळीं प्राप्त झाली, तर जप कोणीक-

डे, तप कोणीकडे आणि समाधि कोणीकडे!"

सच्छिद्रो मध्यकुटिलः कर्णः स्वर्णस्य भाजनं ॥
धिग्दैवं विमले नेत्रे पात्रं कज्जलभस्मनः ३८९

"काय दैवाची कृति आहे पहा! कीं जो कर्ण सच्छिद्र आणि मध्यें वांकडा त्याला सुवर्णभूषण मिळतें आणि विमल जीं नेत्रें तीं बिचारीं काजळाला पात्र झालीं आहेत!" 'सच्छिद्र,' 'कुटिल,' आणि 'विमल' यांचीं अर्थांतरें प्रसिद्धच आहेत.

विश्वेश्वरस्तु सुधिया गलितेऽपि भेदे। भावेन भक्तिसहितेन समर्चनीयः॥
प्राणेश्वरश्चतुरया मिलितेऽपि चित्ते। चैलांचलव्यवहितेन निरीक्षणीयः ३९०

"जो सुधी आहे त्यास आत्मज्ञान होऊन जीवेश्वरांच्या मधील भेद त्याचा जरी गलित झाला, तरी त्यानें विश्वेश्वराची पूजा भावानें व भक्तीनें अवश्य करावी; कीं ज्याप्रमाणें चतुर स्त्री ही परस्परांचें मन मिळालें असतांही वस्त्राच्छादित होत्सातीच आपल्या वल्लभाच्या दृष्टीस पडते!"

तव विरहमसहमाना सा तु प्राणान् विमुक्तवती ॥
किंतु तथाविधमंगं न लभमिति ते न मुंचंति॥ ३९१॥

"तुझा विरह सहन करण्यास असमर्थ होत्साती ती तर प्राणास टाकण्यास तयार झाली; पण असलें सुंदर शरीर आपणास मिळावयाचें नाहीं या लोभानें ते प्राणच तिला सोडीतात!"

दोषागमनमाशंक्य रविरेष तिरोहितः ॥
कथमिंदुः समायाति कुतः शंका कलंकिनः ३९२

"दोषागमन (रात्रीचें येणें— दोषप्राप्ति) पुढें होणार तों आगाऊच सूर्य आपला क्षितिजाखालीं दडून राहिला. पण त्याच समयास इंदूनें वर डोकें काढलें; ठीकच आहे, जो मुळींच कलंकयुक्त (दोन्ही अर्थ स्पष्टच आहेत) त्यास शंका कोठून प्राप्त होणार!"

तप्तं कैर्न तपोभिः फलितं तल्लोपनारीणाम् ॥
लोचनयुगले यासामंजनमासीन्निरंजनं ब्रह्म ३९३

" आजपर्यंत तपश्चर्या कोणी केल्या नाहींत? पण एका गोपींचीं तशी भाग्य फळाला आलीं असें म्हटलें पाहिजे; कां कीं त्यांच्या नेत्रपुटीं निरंजन जें परब्रह्म तें अंजन होऊन बसलें!"

आश्लेषशेषा रतिरंगनाना-मामोदशेषा कुचकुंकुमश्रीः॥
तूणीरशेषः कुसुमायुधोऽपि। प्रभातशेषा रजनी बभूव ३९४

" स्त्रियांच्या स्तनांतील केवळ आलिंगन मात्र शेष राहिलें, कुचांवर केलेल्या केशरलेपापैकीं केवळ सुगंध मात्र शेष राहिला, मदनापाशीं शेष काय तो भाता मात्र आणि रात्रीपैकीं पहाट मात्र उरली!"

गलिता पलिता रदावली। लवलीबद्धवली भवंति केशाः॥
न तथापि कथा रथांगपाणेः। श्रवणप्रीतिकरीति मंदरीतिः ३९५

" सुंदर जी दंतपंक्ति ती गळून गेली व केश हे लवलीप्रमाणें पांढरे होत आहेत; तथापि चक्रपाणि जो कृष्ण त्याची कथा कानास आवडत नाहीं;—अशी च मूर्खाची रीति होय!"

वागुच्चारोत्सवंमात्रं तत्क्रियां कर्तुमक्षमाः॥
कलौ वेदांतिनो भांति फाल्गुने बालकाइव ३९६

" सांप्रत कलियुगांत वेदांत बोलणारे पंडित कसे भासतात? कीं जशीं शिमग्यांतलीं पोरें तोंडानें यथेच्छ बडबड मात्र करतात, पण त्यांतील गम्य म्हणून त्यास बिलकूल माहीत नसतें!"

तुंगात्मना स्तुंगतराः समर्था। मनोरथान्पूरयितुं न नीचाः॥
धाराधरा एव धराधराणां। निदाघदाहं शमितुं न नद्यः ३९७

" उंच पर्वतांचे व स्वभावानें थोर असे लोक हेच लोकांचे मनोरथ पुरविण्यास समर्थ होतात; जे क्षुद्रांत नीच त्यांच्या हातून तें कार्य घडत नाहीं. पहा कीं, दृक्षांचा संताप दूर करण्याचें सामर्थ्य मेघांचेच ठायीं असतें नद्यांचे ठायीं असत नाहीं."

हरेः पदाहतिः श्लाघ्या न श्लाघ्यं खर रोहणं॥
स्पर्धाऽपि विदुषा युक्ता न युक्ता मूर्खमित्रता ३९८

" सिंहाचा पादप्रहारही श्लाघ्य होय, गर्दभावर आरोहण केलेलेंही श्लाघ्य नव्हे; याप्रमाणेंच विद्वान् पुरुषाबरोबर स्पर्धाही श्रेयस्कर होय; परंतु मूर्खाबरोबर मैत्री कामाची नाहीं."

निर्गुण इति मृत इति च द्वावेकार्थाभिधायिनौ विद्धि॥
पश्य धनुर्गुणशून्यं निर्जीवं यदिह शंसन्ति॥ ३९९॥

"निर्गुण मनुष्य हें मेल्यासारखेंच समजावयाचें: पहा, गुणरहित (श्लेषार्थ हा उघड आहे) असें जें धनुष्य तें असून नसून सारखेंच."

कर्कशतर्कविचारव्यग्रः किं वेत्ति काव्यहृदयानि॥
ग्राम्य इव कृषिविलग्नश्चंचलनयनावचोरहस्यानि ४००

"मनाला कठोरत्व देणारे जे तर्कविचार त्यांतच सदा जो गढलेला त्याला काव्याचें हृदय तें काय कळणार? जसें, नांगर धरणाऱ्या कुणब्यास चतुर कामिनीच्या भाषणांतील मर्म काय समजणार!"

अंतःप्रतप्तमरुसैतकदह्यमान-।
मूलस्य चंपकतरोः क्व विकासचिंता॥
प्रायो भवत्यनुचितस्थितिदेशभाजां।
श्रेयः स्वजीवपरिपालनमात्रमेव ४०१

"अतिशय तापलेलें जें मारवाडांतील वाळवंट त्याची धग ज्याच्या मूळाशीं निरंतर आहे अशा चंपकवृक्षाचा पुष्पविकास होईल ही आशा कशाला पाहिजे? अयोग्यस्थानीं जे जाऊन पडले त्यांनीं आपला प्राण रक्षण करून ठेवला ह्मणजे त्यांचें भाग्य समजावें!"

तथाभूदस्माकं प्रथममविभक्ता तनुरियं।
ततोऽनु त्वं प्रेयानहमपि हताशा प्रियतमा॥
इदानीं नाथस्त्वं वयमपि कलत्रं किमपरं।
मयाप्तं प्राणानां कुलिशकठिनानां फलमिदं ४०२

"पूर्वी आपली अशी स्थिति होती कीं, दोघांचीं शरीरें जणूं काय एक होतीं;

पुढें तूं माझा वल्लभ आणि मी दुर्भाग्या प्रियतमा इतका दोघांत भिन्नभाव झाला; आणि आतां तर तूं पति आणि मी स्त्री इतकाच संबंध राहिला आहे. तेव्हां वज्राप्रमाणें कठिण असे जे माझे प्राण त्यांचें हें फळ मला प्राप्त झालें आहे."

निर्मित्सुः सुदतीमजो विरचिते वक्त्रे शशिभ्रांतितः।
कोशीभूतनिजांबुजासनमधिष्ठातुं न शक्तो विधिः ॥
मध्यं विस्मृतवान् कुचौ च कठिनौ पीनौ नितंबौ कचान्।
वक्रान् निर्मितवान् मतिः स्फुरति हि स्वस्थे नृणां चेतसि ४०३

"ब्रह्मदेव या स्त्रीस जेव्हां निर्माण करूं लागला तेव्हां त्यानें प्रथमतः हिचें मुख केलें; त्याच्या योगानें काय झालें कीं चंद्राची शंका वाटून त्याच्या आसनाचें कमळ मिटूं लागलें;---तेव्हां आसनसंकोचामुळें पीडित होत्सात्या विधीनें राहिलेली सर्व रचना भराभर घाईनें आटपून टाकली. ती अशी कीं, स्तन आणि नितंब हे होते तसेच जाडी ठेवले, केस वांकडेच राहिले आणि कंबर करायास तर तो पुढां च विसरला! एकंदरीत चित्त अस्वस्थ असलें ह्मणजे कोणतेंही काम नीट होत नाहीं!"

देव त्वत्करनीरदे दिशि दिशि प्रारब्धपुण्योन्नतौ ।
चंचत्कांचनरत्नराजि तडिति स्वर्णामृतं वर्षति ॥
स्फीता कीर्तितरंगिणी समभवत्तृप्ता गुणिग्रामभूः ।
पूर्णं चार्थिसरः शशाम विदुषां दारिद्र्यदावानलः ४०४

"हे राजा! तुझा हस्तरूप मेघ दशदिशांचे ठायीं उत्कृष्ट उन्नति पावला असतां आणि स्फुरण पावणारीं जीं रत्नजडित सुवर्ण कंकणें त्यांची विद्युल्लते सारखी प्रभा पडून सुवर्णरूप उदकाचा वर्षाव झाला असतां, कीर्तिरूप नदीस पूर येऊन ती चोहोंकडे पसरली आहे, गुणिजनरूप भूमि वृष्टीनें तृप्त झाली आहे, याचकसमूहरूप सरोवरें तुडुंब भरलीं आहेत आणि विद्वज्जनांचा दारिद्र्यरूप दावानल विझून गेला आहे!

षड्गुर्गमरण्यमटंति विकटं क्रामंति देशांतरं ।
गाहंते गहनं समुद्रमटनक्लेशां कृषिं कुर्वते ॥
सेवंते कृपणं पतिं गजघटासंघट्टदुःसंचरं ।
सर्पंति प्रधनं धनांधितधियस्तल्लोभविस्फूर्जितं ४०५

"दुर्गम अरण्यांतून जाणे, भयंकर परदेशांतून फिरणें, गहन जो समुद्र त्याव-र पर्यटन करणें, शेतकीची दगदग करणें, कृपण धन्याची सेवा करणें, हत्तींच्या गर्दीमुळें संचार करण्यास भीतिदायक अशा रणांगणीं मरण पावणें, इतके सर्व प्रकार धनलुब्ध लोक जे करतात हा लोभाचा प्रभाव होय!"

व्यासादीन् कविपुंगवाननुचितैर्वाक्यैः सलीलं हसन्।
उच्चैर्जल्प निमील्य लोचनयुगं श्लोकान् सगर्वं पठन्॥
काव्यं धिक्कुरु यत्परैर्विरचितं स्पर्धस्व सार्धं बुधै-।
र्यद्यभ्यर्थयसे क्षणेन रहितः पांडित्यमाप्तुं बलात् ४०७

"जर तुला अंगीं विद्वत्ता नसतांही फुकाची पंडितगिरी मिळवायाची असेल तर पुढील गोष्टी करः— व्यासादिक महान् महान् कवीं विषयीं हवातसा चारगटपणा करून त्यांची थट्टा कर, मोठ्यानें बोल आणि डोळे मिटून मोठ्या डौलानें श्लोक म्हण, दुसऱ्यानें केलेल्या काव्याची निंदा कर आणि पंडितजनांशीं नेहेमीं स्पर्धा करीत जा!"

मूर्खत्वं सुलभं भजस्व कुमते मूर्खस्य चाष्टौ गुणाः।
निश्चिंतो बहुभोजकोऽतिमुखरो रात्रिंदिवं स्वप्नभाक्॥
कार्याकार्यविचारणांधबधिरो मानापमाने समः।
प्रायेणामयवर्जितो दृढवपुर्मूर्खः सुखं जीवति॥ ४०८॥

"रे वेड्या! मूर्खत्व संपादन करण्यास कांहीं आयास पडत नाहींत, व त्यापासून पुढील आठ लाभही आहेत तर हेंच आपल्या ठायीं दृढ ठेव. आठ गुण येणेंप्रमाणेंः— निश्चिंतपणा, यथेष्ट भोजन, अति मुखरत्व, रात्रंदिवस झोंप, कार्याकार्यविचाराविषयीं अंधत्व व बधिरत्व, मान व अपमान हे दोन्ही सारखे, प्रायः शरीरास आरोग्य असून गलेलठ्ठ होऊन पडणें;— इत्यादि प्रकारें मूर्ख हा सुखेंकरून राहतो!"

अनाकाशे चंद्रः सरसिजदलद्वंद्वसहितो।
गृहीतः पश्चार्द्धे कुटिलकुटिलैः सोऽपि तिमिरैः॥
सुधां मुंचत्युच्चैरनिशमथ संमोहजननीं।
किमुत्पातादीयं वदत जगतः कर्तुकुशला ४०९

हृदयानें ही उत्पात परंपरा निर्माण केली आहे काय? कोणती, तर आकाशा-

शिवाय चंद्र, त्यावर कमलपत्रांची जोडी, मागें कुटिल अंधकारसमूहानें तो पछाडलेला आणि असा चंद्र नेहेमीं अमृताचा वर्षाव करणारा, कीं ज्या अमृतवृष्टीनें उज्जीवन जें व्हावयाचें तें न होतां उलटें संमोहन होतें (पक्षीं–मूर्च्छा येते)! ५

पुष्पेषोरभिषेकहेमकलशौ हारप्रवाहापगा-।
चक्राह्वौ मदनोन्मदद्विपघनेः कुंभौ रतेः कंदुकौ ॥
कंदौ बाहुमृणालिकायुगलयोर्लीलालतासत्फले ।
नव्यौ रत्नसमुद्गकौ वहति सा लावण्यपूर्णौ स्तनौ ४१०

स्तनयुगुलावर उत्प्रेक्षाः—— "मदनाला मार्दवें माभिषेक करण्याचे हे सुवर्णकलश आहेत काय? अथवा मुक्ताहारप्रवाहरूप नदींतील हे चक्रवाक आहेत काय? किंवा मदनरूप मदोन्मत्त हत्तीचें गण्डस्थल, रतीचें क्रीडाकंदुक, बाहुरूप कमलनालांचे कांदे, लीलारूपलतेचीं सुंदर उत्कृष्ट फळें, किंवा लावण्यानें भरलेले हे नवे रत्नकरंडक आहेत काय?"

तन्वंग्या गुरुसन्निधौ नयनजं यद्वारि संस्तंभितं ।
तेनान्तर्गलितेन मन्मथशिखी सिक्तो वियोगोद्भवः॥
मन्ये तस्य निरस्यमानकिरणस्यैषा मुखे नोद्गता ।
श्वासामोदसमागतालिसरणिव्याजेन धूमावली ४११

"स्त्रियेनें गुरुजनांच्या समोर डोळ्यांतील अश्रु जे तसेच संस्तब्ध करून ठेवले ते आंतल्या आंत जिरल्यामुळें वियोगजन्य जो मदनाग्नि त्यावर ते पडले त्यायोगानें तो किंचित् विझून त्याची जी धूमावली निर्माण झाली ती निश्वाससुगंधास लुब्ध झालेल्या भ्रमरमालेच्या रूपानें जणों काय बाहेर पडली!"

तरुमूलादिषु निहितं जलमाविर्भवति पल्लवाग्रेषु ॥
निभृतं यदुपक्रियते तदपि महांतो वदन्त्युच्चैः ४१२

"वृक्षांच्या मुळांशीं जें उदक घालावें तें त्याच्या पल्लवाग्रांवर प्रगट होतें; ठीकच आहे कीं जे थोर आहेत ते गुप्तपणें केलेल्या उपकारास ही प्रसिद्धपणें मिरवतात!"

हृदयं कौस्तुभोद्भासि हरेः पुष्णातु वः श्रियम् ॥
राधाप्रवेशरोधाय दत्तमुद्रमिव श्रिया ४१३

"कौस्तुभानें शोभा पावणारें असें विष्णूचें हृदय तुमचें कल्याण करो; कीं त्या-चे ठायीं वरील रत्नाच्या मिषानें लक्ष्मीनें जणों काय मोहोरच करून ठेवली आहे, कीं राधेनें आंत प्रवेश करूनये म्हणून!"

पिनाकफणिबालेंदुभस्ममंदाकिनीयुता ॥
तथापि भवते मूर्तिरपवर्गानुसारिणी॥ ४१४॥

"हे शंभो! तुझी मूर्ति पिनाक (धनुष्य), फणी (सर्प), बालेंदु (बालचंद्र) भस्म आणि मंदाकिनी (स्वर्गंगा) यांनीं युक्त असतांही अपवर्गातें म्ह० मोक्षातें देणारी आहे." पिनाक, फणी, बालेंदु, भस्म आणि मंदाकिनी या शब्दांचीं आद्याक्षरें अनुक्रमानें पवर्गांतील आहेत हें उघडच आहे.

दूरं यस्यालोकाद्विरहिजनशोकापनयनं ।
यदंके सानंदं नयनमरविंदं विहरति ॥
नयस्यापैति श्रीः क्वचिदपि राहोरपि पुनः ।
स मे खेदं रामावदनहिमधामा शमयतु ४१५.

स्त्रीमुख व चंद्र यांचें व्यतिरेकवर्णन — "ज्याच्या आलोकानें (अवलोकनानें; प्रकाशानें) विरहिजनांच्या शोकाचें हरण तत्क्षणींच होतें; ज्याच्यापाशीं नयनरूप कमल आनंदानें विहार करतें आणि कचकलापरूप जो राहु त्याच्यायोगानें-ही ज्याचें तेज कमी होत नाहीं, तो स्त्रीमुखरूप चंद्रमा माझ्या संतापास दूर करो!" विरहिजनांचा ताप खऱ्या चंद्राच्या योगानें वाढतो, कमलें संकुचित होतात व राहु-ग्रासाची त्यास भीति असते, या तीन गोष्टी प्रसिद्ध आहेत.

मौलौ किंनु महेश मानिनि जलं किं वक्त्रमंभोरुहं ।
किं नीलालकवेणिका मधुकरी किं भ्रूलता वीचिका ॥
किं नेत्रे शफरी किमु स्तनयुगं मेंखद्रथांगद्वयं ।
शांकामिति वंचयन् गिरिसुतां गंगाधरः पातु नः ४१६

शिवानें गंगेस मस्तकीं धारण केली असतां त्याचा व पार्वतीचा संवाद —
"हे महेशा! हें मस्तकावर काय? — हे मानिनि! हें जल आहे; तोंड दिसतें आहे तें? — तें कमळ आहे; नील केशपाश दिसतो आहे हा? — तो मधुकरींचा

समूह आहे; भूलता दिसते आहे? — तो तरंग आहे; डोळे? — ते दोन मासे आहेत; स्तनयुग? — तें जलविहार करणारें चक्रवाकांचें जोडपें आहे; — याप्रमाणें साशंक झालेली जी पार्वती तिचें वंचन करणारा गंगाधर आमचें रक्षण करो!"

धन्यास्ते कवयो यदीयरसना रूक्षाध्वसंचारिणी।
धावंतीव सरस्वती द्रुतपदन्यासेन निःक्रामति ॥
अस्माकं रसपिच्छिले पथि गिरां देवी नवीनोदयत्-।
पीनोत्तुंगपयोधरेव युवतिर्मांथर्यमालंबते ॥४१६॥

"ते कवि धन्य होत की त्यांच्या जिव्हारूप कोरड्या रणरणीत रस्त्यावरून सरस्वती ही भराभर पावलें टाकीत धावतच निघून जात असते; पण आमची स्थिति अशी आहे की, जिचे पीनोत्तुंग पयोधर नवे उद्भूत पावले आहेत अशी युवति निसरड्या जागेवरून जात असतां जशी जपून हळू हळू चालते त्याप्रमाणें आमची वाग्देवी रसानें भिजून अशा मार्गावरून मंद मंद पदांनीं गमन करते!" 'रस' आणि 'पद' या शब्दांचे दोन दोन अर्थ सुगमच आहेत.

समये पयोधराणामपतितया नैव शक्यते स्थातुं ॥
उत्कंठितासि बाले नहि नहि सखि पिच्छिलः पंथाः ४१७

"या पयोधरकालीं (वर्षासमयीं) अपतिता मोठी दुःसह होय, म्हणजे पतिसमागमाशिवाय दिवस कंठणें मोठें कठीण आहे. ही कोणा एका तरुणीची उक्ति ऐकून तिची सखी तीस विचारते, 'अगे उत्कंठित झाली आहेस काय?' त्याला उत्तर उत्तर करते. "छे छे! चोहोंकडे चिखल झालेला म्हणून अपतितावस्था म्हणजे पडल्याशिवाय राहणें कठीण आहे असें मी म्हणतें!" हें छेकापन्हुतीचें उदाहरण होय.

भीतिर्नैव भुजंगपुंगवविषात्प्रीतिर्न चंद्रामृतात्।
नाशौचं नृकपालकंठलुलनात्क्षोभं न गंगाजलात् ॥
नोद्वेगश्चितिभस्मनो नच सुखं गौरीस्तनालिंगनात् ।
आत्मारामतया हिताहितसमः स्वस्थो हरः पातु वः ४१८

"ज्याला गळ्यांतील महासर्पांच्या विषापासून भीति नाहीं व शिरस्थ चंद्राच्या अमृतापासून आनंद नाहीं; गळ्यांत नरकपालांची माळा रुळत असल्यानें

ज्याला अपवित्रता नाहीं व जटाजूटस्थ गंगेच्या जलापासून पावित्र्य नाहीं; ज्याला चिताभस्म अंगास फांसल्यापासून उद्वेग नाहीं व गौरीच्या स्तनालिंगनापासून हरख नाहीं;- असा इष्टानिष्टाविषयीं उदासीन व आत्मस्थितीस पावल्यामुळें सदोदित स्वास्थ्य अनुभवणारा शिव तुमचें कल्याण करो!"

नायं प्रयाति विकृतिं विरसो न यः स्यात्।
न क्षीयते बहुजनैर्निनरां निपीतः ॥
जाड्यं निहंति रुचिमेति करोति तृप्तिं ।
नूनं सुभाषितरसोऽन्यरसातिशायी ४१९

"सुभाषितरसाची दुसऱ्या कोणत्याही रसास सर येणार नाहीं; पहा कीं, इतरांप्रमाणें हा कधींही विकार पावत नाहीं, विरस होत नाहीं, बहुतांनीं सेवन केला असतांही कमी होत नाहीं, जाड्याचें (मूर्खत्वाचें) हरण करतो, रुचीची वृद्धि करतो आणि आनंददायक होतो!"

दुर्जनहुताशदग्धं काव्यसुवर्णं विशुद्धिमुपयाति॥
दर्शयितव्यं तस्मान्मत्सरिमनसः प्रयत्नेन ४२०

"काव्यरूप सुवर्ण दुर्जनरूप अग्नींत दग्ध झालें असतां अत्यंत शुद्ध होतें; यास्तव मत्सरी मनाच्या मनुष्यांस तें आदरून दाखवावें!"

तएव पदविन्यासास्तएवार्थविभूतयः ॥
तथापि नव्यं भवति काव्यं ग्रथनकौशलात् ४२१

"तीच शब्दांची योजना व अर्थाचें गौरव, तथापि पदरचनेच्या चातुर्यानें काव्य नवेंसें भासूं लागतें!"

इह तुरगशतैः प्रयांतु मूर्खा । धनरहिता विबुधाः प्रयांतु पद्भ्यां॥
गिरिशिखरगताऽपि काकपंक्तिः। पुलिनगतैर्न समत्वमेति हंसैः ४२२

"मूर्ख हे शंभर घोड्यांवर बसून फिरोत व पंडित निर्धन होत्साते पायांनीं च चालोत; तरी पंडित जे श्रेष्ठ ते श्रेष्ठच; पहा कीं, पर्वतशिखरावर बसलेली काकपंक्तीही नदीच्या वाळवंटावर फिरणाऱ्या हंसांची बरोबरी करूं शकत नाहीं!"

कतिचिदुद्धतनिर्भरमत्सराः। कतिचिदात्मवचस्तुतिशालिनः॥
अहह केऽपि निरक्षरकुक्षय-स्तदिह संप्रति कं प्रति मे श्रमः ४२३

"कोणी पाहावें, तर त्यांच्या ठायीं मत्सर परिपूर्ण नांदत असून बरोबर उत्पंक-ठत असतो; कोणी पाहावें, त्यांस आपल्या स्वतःच्या कवितेखेरीज इतर कोणा-चीही पसंत नसून तिची कायती नेहमीं प्रशंसा; बाकी पुष्कळ तर बिचारे अक्षर-शत्रूच; तेव्हां काव्य जें करायाचें तें कोणासाठीं म्हणून करावें?"

स्थिरा शैली गुणवतां खलबुद्ध्या न बाध्यते॥
रत्नदीपस्य हि शिखा वात्ययाऽपि न नाश्यते ४२४

"जे स्वभावतःच सज्जन त्यांचें शील खलांच्या उपदेशानें बिघडत नाहीं; कसें? तर त्याप्रमाणें रत्नदीपाची ज्योत वावटळीच्याही वाऱ्यानें विझत नाहीं!"

केनांजितानि नयनानि मृगांगनानां ।
को वा करोति रुचिरांगरुहान् मयूरान्॥
कश्चोत्पलेषु दलसन्निचयं करोति ।
को वा करोति विनयं कुलजेषु पुंसु ४२५

"हरिणींच्या डोळ्यांत कोणीं अंजन घातलें आहे? मोरांचे पिसारे चित्रविचित्र कोणीं केले आहेत? नीलकमलांस पत्रशोभा कोणीं दिली? कुलज जे पुरुष त्यांच्या ठा-यीं विनय कोणीं आणला?"

माभूत्सज्जनयोगो यदि योगो मा पुनः स्नेहः॥
स्नेहो यदि विरहो मा यदि विरहो जीविताशा का ४२६

"प्रथमतः सज्जनांची गांठच पडूं नये, पडली तर स्नेह जडूं नये, तोही जडला, तर मग विरह तरी होऊं नये; कां कीं विरह झाल्यावर मग जीविताची आशा कशाला हावी?"

अनुकुरुतः खलसुजनावग्रिमपाश्चात्ययोः सूच्याः॥
विदधाति रंध्रमेको गुणमस्यापरोऽपि विदधाति ४२७

"खल आणि सज्जन हे सुईच्या पुढल्या व मागल्या भागांप्रमाणें होत; रंध्र

पाडणें हें पहिल्याचें काम व त्याचें आच्छादन करणें हें दुसऱ्याचें!"

यद्दन्ता दशन्ति दशना रसना तत्स्वादुसौख्यमनुभवति ॥
प्रकृतिरियं विमलानां क्लिश्यन्ति यदन्यकार्येषु ॥ ४२८ ॥

"हे दांत जें चावतात त्याचें मधुर सौख्य जिव्हा अनुभवते: निर्मल अंतःकरणाचे जे सज्जन त्यांचा स्वभावच हा, कीं दुसऱ्याच्या कल्याणाकरितां कष्ट सोसावे!"

लक्ष्मीर्यादोनिधेर्यादो नादो वादोचितं वचः ॥
बिभेति या धीवरेभ्यो जडेष्वेव निमज्जति ४२९

"लक्ष्मी ही समुद्रांतील जलचर आहे हें वचन वादास्पद नव्हे; का कीं, धीवरांस ( पक्षीं, बुद्धिमान् पुरुषांस ) भिते व जडांचे ठायीं निमज्जन पावते!" म्हणजे बुद्धिमंतांस प्राप्त होत नाहीं व जड म्हणजे मूर्ख यांजपाशीं वास करते. 'ड' आणि 'ल' यांच्या साम्यास्तव 'जलांत बुडून राहते' हा श्लेषार्थ उघडच आहे.

एकेन तिष्ठताऽधस्तादन्येनोपरि तिष्ठता ॥
दातृयाचकयोर्भेदः कराभ्यामेव सूचितः ४३०

"दाता आणि याचक यांजमधील भेद पालथा आणि उलथा हात यावरूनच सूचित होतो!"

लक्ष्मीपयोधरोत्संगकुंकुमारुणितो हरेः ॥
धन्यो बलिः स येनास्य भिक्षापात्रीकृतः करः ४३१

"बलीची धन्यता काय वर्णावी? कीं ज्यानें लक्ष्मी कुचाभोगकुंकुमानें रंगलेला जो हरीचा हस्त त्यास दानग्रहणार्थ भिक्षापात्र करविला!"

दुर्जनसहवासादपि शीलोत्कर्षं न सज्जनस्त्यजति ॥
प्रतिपर्व तपनवासी निःसृतमात्रः शशी शीतः ४३२

"दुर्जनांचा सहवास पडला असतांही साधु आपलें शील टाकीत नाहीं; पहा कीं, प्रति अमावास्येला चंद्राला सूर्याचा सहवास पडतो, पण त्याजपासून निघाला पुरे, कीं लागलीच आपलें शीतलत्व प्रगट करतो!"

विगृहीतः पराक्रांतो भूयोभूयश्च ...तः ॥

माधुर्यमेवावहति सुश्लोकइव सज्जनः ४३३

"उत्कृष्ट श्लोकाचा जसा विग्रह केला, पदें पाडलीं, किंवा पुनःपुनः निरनिराळा अन्वय लावला तरी त्याचें सौंदर्य कमी होत नाहीं, त्याप्रमाणेंच सज्जनाशीं विग्रह (कलह) केला, त्यास पदाक्रांत केला (म्ह० त्याची अवज्ञा केली), किंवा त्याची वारंवार खंडना केली, तरी त्याचें नैसर्गिक शील ढळत नाहीं।"

अपूर्वः कोऽपि कोपाग्निः सज्जनस्येतरस्य च ॥
एकस्य शाम्यति स्नेहाद्वर्धते ऽन्यस्य वारितः ४३४

"सज्जन व दुर्जन यांचा कोपाग्नि किती विलक्षण तऱ्हेचा आहे पहा! कीं एक स्नेहाच्या योगानें शमला जातो व दुसरा वारला असता वृद्धि पावतो!" 'स्नेह' शब्दाचा दुसरा अर्थ 'तेल' हा होय; व 'वारित' याचा अर्थ 'पाण्यापासून' असा होतो. तेलानें विस्तव विझणें व पाण्यानें वाढणें हें विलक्षण आहे हें उघडच आहे.

जलनिधौ जननं धवलं वपु-र्मुररिपोरपि पाणितले स्थितिः॥
इति समस्तगुणान्वित शंख भोः। कुटिलता हृदये न निवारिता ४३५

"हे शंखा! तुझें जन्म समुद्रांत झालें. तुझें शरीर पांढरें शुभ्र आहे, मुरारीच्या हस्ततलीं तुला सदोदित वास घडतो, याप्रमाणें समस्त गुणांनीं तूं युक्त असतां तुझ्या हृदयाच्या ठायींची कुटिलता कांहीं निघाली नाहीं!" शंखाचें अभ्यंतर वक्र असतें हें प्रसिद्धच आहे.

यत्रात्मीयो जनो नास्ति भेदस्तत्र न विद्यते॥
कुठारैर्दंडनिर्मुक्तैर्भिद्यंते तरवः कथं॥ ४३६॥

"जेथें घरचा भेद्या मिळाला नाहीं तेथें फूट पडत नाहीं; तर कुऱ्हाडीचे दांडे काढून घेतले तर झाडें कशीं तुटलीं जातील?"— 'कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ' ही म्हण प्रसिद्धच आहे.

द्यूतेन धनमिच्छंति मानमिच्छंति सेवया ॥
भिक्षया भोगमिच्छंति ते दैवेन विडंबितः ४३७

" द्यूत खेळून जे धनप्राप्तीची इच्छा करतात, सेवा करून मानाची अपेक्षा करतात आणि स्त्रियांनीचें अवलंबन करून भोगाची आशा करतात, ते हतभाग्य होत!"

अयश्चणकचर्वणं फणिफणामणेः कर्षणं ।
करेण करितोलनं जलनिधेः पदा लंघनम् ॥
प्रसुप्तहरिबोधनं निशितखड्गसंरोपणं ।
कदाचिदपि संभवेन्न कृपणस्य वित्तार्जनं ४३८

" लोखंडाचे हरभरे दातांनीं फोडणें, सर्पाच्या फणेवरील मणी हिसकावून घेणें, हातांत हत्ती तोलून धरणें, समुद्र पायांनीं उतरून जाणें, निजलेल्या सिंहास उंचबून जागे करणें, तीक्ष्ण तरवारीवर बसणें;— हीं सर्व संभवतील: पण कृपणाच्या वित्ताचें हरण करणें हें कधीं घडणार नाहीं!

तैलाद्रक्षेज्जलाद्रक्षेद्रक्षेच्छिथिलबंधनात् ॥
मूर्खहस्ते न दातव्यमेवं वदति पुस्तकम् ४३९

" पुस्तक ह्मणतें, माझें तेलापासून, पाण्यापासून व शिथिलबंधनापासून रक्षण कर; आणि मला मूर्खांच्या हातीं देऊं नको."

व्याधेस्तत्त्वपरिज्ञानं वेदनायाश्च निग्रहः ॥
एतद्वैद्यस्य वैद्यत्वं न वैद्यः प्रभुरायुषः ४४०

" वैद्याची वैद्यगिरी ह्मणजे इतकीच, कीं व्याधीचें निदान त्यानें ठरवावें व वेदना बंद करावी; वैद्य कांहीं आयुष्याचा धनी नाहीं."

पल्लवे नास्ति माधुर्यं सुधायां नास्ति शोणिमा ॥
विद्रुमे नास्ति मृदुता तत् त्रयं दयिताधरे ४४१

" पल्लवाच्या ठिकाणीं माधुर्य नसतें, अमृताचे ठायीं लालपणा नसतो आणि पोंवळ्याच्या अंगीं मार्दव नाहीं; पण हे तिन्ही गुण प्रियेच्या अधरोष्ठाचे ठायीं वास करतात!"

लोभमूलानि पापानि व्याधयो रसमूलकाः ॥
स्नेहमूलानि दुःखानि त्रयं त्यक्त्वा सुखी भवेत् ४४२

"सर्व पापाचें मूळ लोभ हा होय, व्याधीचें मूळ रस होत, दुःखाचें मूळ ऐहिक वस्तूंवर धरलेली ममत्व बुद्धि होय, वास्तव हीं तिन्ही सोडून देणें हा सुखाचा मार्ग होय!"

मार्जारो लभते न पंजरशुकालापेन कौतूहलं ।
कस्तूरीहरिणस्य सौरभतया व्याघ्रो न संतुष्यति ॥
प्रीतिर्नास्ति मयूरतांडवविधौ व्याधस्य दुष्टात्मभि-
र्व्याप्तायां भुवि संति केऽपि विरला संतो गुणग्राहकाः ४४३

"मार्जारास पिंजऱ्यांतील राघूच्या बोलण्याचें कौतुक वाटत नाहीं, वाघास कस्तूरीमृगाच्या सुगंधानें संतोष होत नाहीं, पारध्यास मोराचा नाच पाहून आनंद होत नाहीं. सारांश, दुष्टांनी भरलेल्या ह्या पृथ्वी हिचे ठायीं कोणी विरळ गुणग्राहक आहेत ते आहेत!"

परस्परास्परकरस्पर्शनभुवः । पयोधरौ पीनतरौ बभूवतुः ॥
तयोरसूयत्ययमुन्नतिं परा- मावेक्ष्य मध्यस्तनिमानमेति ४४४

"परस्पर समागमाच्या सुखानें स्त्रीचे वक्षोज पुष्टतर झाले. पण त्यांची उन्नति न साहून मध्य (कटिप्रदेश) हा मत्सरानें झिजून कृश झाला असें मला वाटतें!"

पात्रे त्यागी गुणे रागी विरागी विषयेष्वपि ॥
शास्त्रे बोद्धा रणे योद्धा पुरुषः पंचलक्षणः ४४५.

"पात्राचे ठायीं दान करणारा, गुणिजनांचे ठिकाणीं आदरबुद्धि धरणारा, विषयाविषयीं पराङ्मुख असणारा, शास्त्रांत निष्णात आणि रणांत शौर्य प्रकट करणारा,—हीं पांच महापुरुषाचीं लक्षणें होत."

एकेन राजहंसेन या शोभा सरसो भवेत ॥
न सा बकसहस्रेण परितस्तीरवासिना ४४६

"एका राजहंसानें जी सरोवरास शोभा येईल ती साऱ्या तीरासभोंवती जमलेल्या हजार बगळ्यांनी येणार नाहीं."

यथा खरश्चंदनभारवाही । भारस्य वेत्ता नतु चंदनस्य ॥
तथा हि विप्रः श्रुतिशास्त्रपूर्णो । ज्ञानेन हीनः पशुभिः समानः ४४७

" जसा गर्दभ चंदनाचें ओझें वाहणारा असला तरी त्याला ओझ्याचें मात्र ज्ञान, चंदनाचें नाहीं; त्याप्रमाणेंच वेद व शास्त्र यांत पारंगत असूनही जो ब्राह्मण ज्ञानशून्य तो पशुतुल्य समजावा."

तरुणि संहर संहर लोचने। तृणलवेषु कुठारपरिग्रहः ॥
मयि मनोभवमार्गणपीडिते। नहि सतामुचितं मृतमारणं ४४८

" हे तरुणि! आपला कटाक्ष आटोप आटोप; अगे! तृणलवावर कोणी कुठाराचा प्रयोग करतो काय? मदनाच्या बाणानें पीडित जो मी त्या मजवर हा दुसरा प्रहार कशास पाहिजे? सज्जन जे आहेत ते मेलेल्यावर घाव घालीत नसतात!"

चतुरः सखि मे भर्ता यल्लिखति स तत्परो न वाचयति॥
तस्मादप्यधिको मे स्वयमपि लिखितं स्वयं न वाचयति ४४९

" माझ्या पतीचें चातुर्य काय सांगू? तो जें लिहितो तें दुसऱ्यास वाचतां येत नाहीं." हें पहिलीचें वर्णन ऐकून दुसरी उत्तर करते. " आमचे यजमान तर याहूनही शहाणे आहेत. स्वतः लिहिलेलेंच त्यांस वाचतां येत नाहीं!"

प्रभुर्विवेकी प्रमदा सुशीला। तुरंगमः शस्त्रनिपातधीरः॥
विद्वान् विरागी धनिकः प्रदाता। भूमंडलस्याभरणानि पंच ४५०

" विवेकी राजा, सुशील कांता, शस्त्राचा घाव सोसण्यास खंबीर असा घोडा, वैराग्यशील विद्वान् आणि दानशूर धनिक,—हीं पांच भूमंडलाचीं भूषणें होत!"

पत्राणि जीर्णानि फलं विनष्टं। छाया गता पक्षिकुलैः प्रयातं॥
वसंत जानीहि तवाशयासौ। समुन्नतिं नैव जहाति वृक्षः ४५१

" पानें वाळून गेलीं, फळें गळालीं, छाया नाहींशी झाली, पक्ष्यांचे समुदाय आश्रय करीनातसे झाले,— पण इतक्याही उपर ज्यापेक्षां हा वृक्ष आपली उन्नति (उंची—पक्षीं, थोर स्वभाव) टाकीत नाहीं त्या अर्थी हे वसंता! हा तुझ्या आशेवर गुंतून राहिला आहे असें समज।"

करिवर संचर धीरं मा मर्दय मर्मराणि पत्राणि ॥
अस्मिन् गह्वरकुहरे सुप्तसटः केसरी वसति॥ ४५२॥

" हे हस्तिश्रेष्ठा ! हळूं हळूं चाल, झाडांचा पाला तुझ्या वाजवूं नको; कां कीं या दरीच्या आंत आयाळ झाडून गर्जना करणारा सिंह बसला आहे ! "

पुष्पादनंतरं स्यात्फलं लतायां प्रसिद्धमिति लोके ॥
चित्रं कनकलतेयं पुष्पोद्गमतः फलद्वयं पूर्वं ॥ ४५३ ॥

" वृक्षसृष्टींत पाहिलें असतां प्रथम फुलें येऊन नंतर फळें धरतात असा क्रम आढळतो; पण ह्या सुवर्णवेलीच्या ठायीं हा काय चमत्कार दृष्टीस पडतो पहा, कीं पुष्पोद्गमाच्या पूर्वींच फलद्वयाचा संभव ! "

अहमिहैव वसन्नपि तावकः-स्त्वमपि तत्र वसन्नपि मामकः ॥
हृदयसंगम एव सुसंगमो । न तनुसंगम एव सुसंगमः ४५४

" मी येथें असून ही तुझा आहे व तूं तेथें असून ही माझा आहेस; तस्मात् हृदयसंगम हाच खरा संगम. येर्‍हवीं शारीर समागम हा कांहीं वास्तविक संगम नव्हे ! "

गुरुजननयने पिधेहि निद्रे । त्वरितमिहास्तमुपेहि पद्मबंधो ॥
इति वदति मनोभवाभितप्ता । चिरसमयागतवल्लभा मृगाक्षी ४५५

" हे निद्रे ! गुरुजनांचे नेत्रनिमीलन कर, हे पद्मबंधो सूर्या ! तूं लवकर अस्तास जा, याप्रमाणें मदनानें विव्हल झालेली स्त्री, कीं जिचा वल्लभ फारां दिवसांनीं घरीं आला — ती वदती झाली ! "

परिमितविशिखो न चेन्मनोजो । यदि च हरो न हरेत्तदीयमंगं ॥
यदि मृदुकुसुमेषुरेष न स्या-दवनितले न किमाचरेत्तदानीं ४५६

" हा मदन जर परिमितशर ( पंचशर ) नसता, शिवानें त्यास अनंग केला नसता, आणि कोमळ पुष्पं हीं त्याचे बाण नसते, तर त्यानें पृथ्वीतलावर काय काय अनर्थ करून दिले असते ! "

चंद्र स्वैरं विहर गगने प्रेयसी नम्रवक्त्रा ।
नालांभोज त्वमपि विकसोन्मीलिताक्षी मृगाक्षी ॥
उक्तिं मुक्तां कुरु पिक निजां मानिनी मोचिनीयं ।
युष्मद्द्वारैः फलितमधुना यहृहीतोऽभिमानः ४५७

"हे चंद्रा! प्रियेनें रागानें तोंड खालीं केलें आहे, तेव्हां आतां तूं खुशाल गगनांत विहार कर. हे नीलकमला! तिनें आपले डोळे मिटले आहेत, यास्तव हा तुझा विकास पावण्याचा काल आहे. हे कोकिळा! मानिनीनें मौन अंगीकारिलें आहे, यास्तव तूं आपली वाणी प्रकट कर. तुमचीं भाग्यें हल्लीं फळास आलीं आहेत, कां कीं प्रियेनें मान धारण केला आहे!"

किं केकीव शिखंडमंडिततनुः किं कीरवत्पाठकः ।
किंवा हंसइवांगनागतिगुरुः शारीव किं सुस्वरः ॥
किंवा हंतशकुंतराजपिकवत् कर्णामृतं सिंचते ।
काकः केन गुणेन कांचनमये व्यापारितः पंजरे ४५८

"या कावळ्यास सोन्याच्या पिंजऱ्यांत जो ठेविला आहे तो काय समजून?—यास काय मोराप्रमाणें शोभिवंत पिसारा आहे? कां राघूसारखी मनुष्यवाणी आहे? कां हंसाप्रमाणें स्त्रियांसारखी यास गति आहे? कां साळुंकी सारखा सुस्वर आहे? कां पक्ष्यांचा नायक जो कोकिल त्याच्यासारखी कर्णमधुर वाणी आहे? याच्या अंगीं येवढा गुण तरी पाहणारानें काय पाहिला?"

मुंचद्धारं चिकुरनिकरं बिभ्रती पाणिगर्भे।
गात्राश्लिष्टस्तिमितवसनस्पष्टसर्वांगशोभा॥
स्नानोत्तीर्णा कमलनयना तिर्यगावर्तितास्या।
नो वा कस्या समदरसमाक्रांतमंतः करोति ४५९

"मोकळे सुटलेले केश हाताच्या पोकळींत जिनें धरले आहेत, जिचें वस्त्र अंगाबरोबर लगटून गेल्यामुळें जिच्या सर्व अवयवांची शोभा स्पष्ट दिसत आहे व जिनें आपलें तोंड तिरकस फिरविलें आहे, अशी स्नान करून बाहेर आलेली तरुणी पाहून कोणाचें अंतःकरण मदनाक्रांत होत नाहीं!"

अभिलषसि यदींदो वक्त्रलक्ष्मीं मृगाक्ष्याः।
पुनरपि सकृदब्धौ मज्ज संक्षालयांकम् ॥
सुविमलमथ बिंबं पारिजातप्रसूनैः ।
सुरभय यदि नो चेत्त्वं कुतः स्या मुखश्रीः ४६०

" हे चंद्रा ! तुला जर कमलनयनेच्या मुखाचें साम्य करायाचें असेल तर पुनः एक वेळ समुद्रांत बुडी मार आणि कलंक धुऊन टाकून आपलें बिंब लखलखीत कर; आणि त्यानंतर पारिजातकाच्या पुष्पांनीं तें सुवासित कर. असें न करशील तर मुखाची शोभा तुला कोठून लाभेल ? "

यद्यपि बद्धः शैलैर्यद्यपि गिरिमथनमुषितसर्वस्वः ॥
तदपि परत्रीतभूधररक्षायां दीक्षितो जलधीः ४६१

" जरी समुद्राचें बंधन ( सेतुबंध समयीं ) पर्वतांनींच केलें, जरी पर्वताच्या ( मंदराचलाच्या ) योगानेंच मंथन होऊन समुद्रांतील सर्व रत्नें हरलीं गेलीं, तरी त्यांच्या शत्रूपासून ( इंद्रापासून ) भय उत्पन्न झालें असतां, त्यांस रक्षण करण्याचें व्रत समुद्राचेंच!" मैनाक पर्वत समुद्रांत दडालेला आहे त्यास अनुलक्षून वरील आर्या आहे.

घृणा शंका भयं लज्जा जुगुप्सा चैव पंचमी ॥
कुलं शीलं तथा जातिरष्टौ पाशाः प्रकीर्तिताः ४६२

" दया, साशंकता, भय, लज्जा, तिरस्कार, कुल, शील आणि जाति हे आठ पाश होत; म्हणजे एकादें साहस कर्तव्य असतां, हीं आठ प्रतिबंधक होतात."

कल्याणि पाणिपतितानि विना विचार-
मेतानि मौक्तिकमुचितानि न मौक्तिकानि ॥
गुंजेति संजनयते यदिह भ्रमं ते ।
हस्तारविंदनयनोत्पलयोः प्रभैव ४६३

" हे सुंदरि ! तुझ्या हातांत जीं हीं मोतीं आहेत तीं अविचारानें फेकून देऊं नको. तुला तीं गुंजासारखीं वाटत असतील खरीं; पण तसें वाटण्याचें कारण तुझ्या हस्तांची ताम्रप्रभा व डोळ्यांची कालीमप्रभा ह्या होत ! "

महतो सुवृत्तयोः सखि हृदयग्रहयोग्ययोः समुच्छ्रितयोः ॥
सज्जनयोः स्तनयोरपि निरंतरं संगतं भवति ॥ ४६४ ॥

---

भर्तृहरीच्या 'नीतिशतकांत असा एक श्लोक आहे:—
मरावें कीं होमें करपतिस देऊनि सगळा ॥ महार्घ्य रत्नाच्या दुरुनि धरणी [illegible] ॥
पित्यातें संपाचीं स्तुति भय निःशंक भिडवें । म्हणे तो मैनाक [illegible] ॥

" जे थोर बुद्धीचे, सत्स्वभावाचे, लोकांच्या हृदयांत भरणारे, उन्नतिसंपन्न, अशा सज्जनांची निरंतर संगति राहते. कशी? तर जसें पृथुल, वर्तुल मनोरम आणि उन्नत अशा स्तनद्वयाचें अव्यवधान सान्निध्य असतें त्याप्रमाणें !"

स्वर्गापगाया स्तरलैस्तरंगैः। पौरांगनानां कुटिलैः कटाक्षैः॥
धर्मश्च कामश्च समेत्य तीरे। ह्यन्योन्यमायोधनमारभेते ४६५

" गंगेच्या तीरीं धर्म आणि काम हे दोघे येऊन एकमेकांशीं युद्ध करूं लागता तः एकाचें आयुध गंगेचे चंचल तरंग आणि दुसऱ्याचें पौरवधूंचे कुटिल कटाक्ष !"

मीमांसा पठिता न यैरुपनिषन्नैव श्रुता तत्त्वतः।
श्रीमच्छंकरभाष्यतो भगवती गीताप्यधीता न यैः॥
सिद्धांतापगतं शिरोमणिमतं ज्ञात्वापि किंचित्ततो।
भट्टाचार्यपदं गताः कथमहो लज्जां लभंते न ते ४६६

" ज्यांनीं मीमांसेचें अध्ययन केलें नाहीं, ज्यांनीं तत्त्वतः उपनिषच्छ्रवणही कधीं केलें नाहीं, ज्यांनीं श्रीमच्छंकराचार्यांच्या भाष्यावरून भगवद्गीतेचें परिशीलनही केलें नाहीं, ते लोक शिरोमणीच्या अपसिद्धांतरूप मताचें किंचित् ज्ञान होतांच बेधडक भट्टाचार्य हें उपपद आपल्या नांवाला लावून घेतात, तर त्यांस लज्जा कशी वाटत नाहीं?"

यत्रार्जवेन लघिमा गरिमाणं वक्रता तनुते॥
छंदःशास्त्र इवास्मिन् लोके सरलः सखे किमसि ४६७

" छंदःशास्त्रांत जसें आहे कीं, सरळ रेषेनें लघु मात्रा योजतात व बांकडी गुरु योजतात, तशी जगांतली स्थिति आहे; म्हणजे सरळ आचरणानें लघुत्व प्राप्त होतें व वक्रता दाखविल्यानें गौरव प्राप्त होतें, मग असें असतां, हे मित्रा ! तूं सरळतेनें कां वागतोस?"

भस्म[illegible]मंथनकदर्थनमुत्सहंते ।

---

मोरोपंतांच्या 'साकी रामायणांत पुढील चमत्कारिक उपमा आहे :—
मधु [illegible] त्या हि[illegible] ने [illegible] न गणी ॥
त्यांत [illegible] मध्यें [illegible] जैसें 'म' गणीं॥ ॥

मर्यादया नियमिताः किमु साधवोऽपि ॥
लक्ष्मीसुधाकरसुधाद्युपनीय तोये ।
रत्नाकरोऽपि गरलं किमु नोज्जगार ४६८

"सज्जन हे मर्यादेनें नियमित झालेले जरी असले तरी त्यांचा अतीच उपमर्द झाला असतां तो त्यांस सहन होत नाहीं. पहा कीं, समुद्र हा रत्नाकर खरा; पण लक्ष्मी, चंद्र, अमृत इत्यादि अर्पण केल्या नंतरही जेव्हां त्यास देवदैत्य सोडीनात; तेव्हां शेवटीं त्यानें विष बाहेर टाकलें!"

सम्यगनिष्पन्नः सन् योऽर्थस्त्वरया स्फुटीक्रियते ॥
स व्यंग्य एव भवति प्रथमो विनतातनूज इव ४६९

"विनतेचा पहिला झालेला मुलगा जो अरुण तो जसा गर्भाशयांत पूर्णावयव न होत्साता जन्मास आला व व्यंग (पांगळा) निपजला. त्याप्रमाणें जो अर्थ पूर्णत्वानें व्यक्त केलेला नसतां श्रोत्यांस किंवा वाचकांस त्वरित भासमान होतो, तो व्यंग्य समजावा."

व्यथयति नगमुपेतः स्वच्छप्रकृतीनवद्यलेशोऽपि ॥
उद्विजते ननु चक्षुः सकेन रजःकणेनापि ॥ ४७० ॥

"जे प्रकृत्या स्वच्छ असतात, त्यांस दोषाच्या लेशानें ही हीनत्व येतें; जसें रजःकण डोळ्यांत गेला असतां, तेवढ्यानेंही डोळा दुखूं लागतो!"

अशठमलोभमजिह्मं त्यागिनमनुरागिणं विशेषज्ञं ॥
यदि नाश्रयति नरं श्रीः श्रीरेव हि वंचिता तत्र ४७१

"सदय, निर्लोभ, सरळ, दाता, प्रीतियुक्त व मनुष्यांची ज्यास पारख आहे, अशा पुरुषाचा जर लक्ष्मीनें आश्रय केला नाहीं, तर तीच भिकारी फसवी असें म्हटलें पाहिजे!"

या स्वसयति पयोऽपि संध्यावपि निद्रसतें ॥
इंदिरा मंदिरा मन्ये* कथं तिष्ठति सा बुधे ४७२

* वरील पद्यांत कांहीं पाठदोष असावासें वाटतें.

" जी लक्ष्मी स्वतःचें गृह जें कमल त्यामध्येंही संध्याकाळपर्यंतच काय-ती राहते, ती दुसऱ्याच्या घरांत कशी दीर्घकाळ राहील ? "

दिग्वाससं गतव्रीडं जटिलं धूलिधूसरम् ॥
पुण्याधिका हि पश्यंति गंगाधरमिवात्मजं ४७३

" ज्यास पुण्य-विशेष घडला आहे असेच धन्य पुरुष शिवास व स्वपुत्रास दिगंबर, यथेच्छ वर्तन करणारा, जटाधारी आणि धुळीनें मळलेला असा पहातात." वरील विशेषणें दोहोंकडे सहजच लागणारीं आहेत

मलिनैरलकैरेनैः शुक्लत्वं मकटीकृतम् ॥
तद्रोषादेव निर्याता वदनाद्दनावलिः ४७४

" केश हे मूळचे मलिन ( काळे ) असतां त्यांनीं आपलें शुक्लत्व धारण केलें, या रोषानेंच जणू काय दंतपंक्ति निघून गेली ! "

श्रुतिः शिथिलतां गता स्मृतिरपि प्रनष्टाऽधुना।
गतिर्विपथमागता विगलिता द्विजानां ततिः ॥
गवामपि च संहतिः समुचितक्रियातश्च्युता ।
कृता नु जरया तया कलियुगस्य साधर्म्यता ४७५

जरेचें व कलियुगाचें साम्यः—" ( जरापक्षीं ) कर्ण मंद झाले आहेत, स्मृति नष्ट होत चालली आहे, नीट चालतां येत नाहीं, दांत पडले आहेत व इंद्रियांचे समुचित व्यापार त्यांजकडून होत नाहींत."

"( कलियुगपक्षीं ) वेदाचें माहात्म्य कमी झालें आहे, स्मृति लुप्तप्राय झाली आहे, सद्गतीचा मार्ग सुटला, ( विद्वान् ) ब्राह्मणांचे समुदाय दृष्टीस पडत नाहींत, गाईंना [illegible] करीत नाहींत."

[illegible]लत्वसंतः। कुन्ना म्रियंते जनकश्चिरायुः ॥
[illegible]। पश्यंतु लोकाः कलिकौतुकानि ४७६

" कलि[illegible] [illegible] आहेत पहा ! सज्जन दुःख पावतात, दुर्जन मजा मारतात; [illegible] पावतात, बापास दीर्घायुष्य होतें; परस्त्रीशीं स्ने-

हभाव आणि सज्जनाशीं वैर!"

सद्वंशजातं गुणकोटियुक्तं। धनुः कथं पार्थिव वामहस्ते ॥
शरः परप्राणविहारदक्षः। सपक्षपातोऽप्यधमो गरीयान् ४७७

" हे राजा! जें धनुष्य सद्वंशापासून (पक्षीं, उत्तम वेळूपासून) झालेलें व गुणकोटीनें (पक्षीं, दोरी व टोकें यांनीं) युक्त तें तूं डाव्या हातांत वागवितोस आणि जो बाण दुसऱ्याच्या प्राणाच्या नाशाविषयीं कुशल व पक्षपातयुक्त (पक्षीं, पंख लावलेला) त्यास उजव्या हातांत घेऊन गौरवितोस हा केवढा अन्याय!"

त्वत्वाश्रयस्थितिरियं तव कालकूट।
केनोत्तरोत्तरविशिष्टपदोपदिष्टा ॥
प्रागर्णवस्य हृदये वृषलक्ष्मणोऽथ।
कंठेऽधुना वससि वाचि पुनः खलानां ४७८

" हे कालकूटा! तुला उत्तरोत्तर वरच्या वरच्या स्थानाचा आश्रय करण्यास कोणीं शिकविलें? पूर्वी तूं सागराच्या हृदयाचे ठायीं वास करीत होतेंस, पुढें शिवाच्या कंठाचा आश्रय केलास आणि शेवटीं खलांच्या वाणीचेठायीं राहिलेंस!"

आपूर्येत पुनः स्फुरच्छफरिकासार्गर्भिभिर्वारिभि-।
र्भूयोऽपि प्रविजृंभमाणनलिनं पश्येम तोयाशयं ॥
इत्याशाशतनंतुबद्धहृदयो नक्तंदिनं दीनधीः।
शुष्यत्यानपशोषितस्य सरसस्तीरे जरत्सारसः ४७९

" जलाशय माशांच्या क्रीडेनें ज्यांत तरंग उत्पन्न होताहेत अशा उदकांनीं पुनः भरून जाईल व यांत कमळें विकसलेलीं मी पुनः पाहीन, अशा आशातंतूंनीं ज्याचें हृदय रात्रंदिवस बद्ध झालें आहे, असा वृद्धहंस या सरोवराच्या तीरीं दीन होत्साता उन्हाचा ताप सोशीत बसला आहे!'

वैद्या वदंति कफपित्तमरुद्विका[illegible]
ज्योतिर्विदो ग्रहगतिं परिवर्त[illegible]
भूताभिषंग इति भूतविदो [illegible]
प्राचीनकर्म बलवन्मुनयो [illegible] ४८०

" शरीरव्याधींची उपपत्ति चौघेजण चार प्रकारांनीं करतातः– वैद्य कफवातपित्तांचे विकार म्हणतात, ज्योतिषी सांगतात कीं हीं ग्रहगतींचीं फळें होत, मांत्रिक भूतचेष्टा म्हणून सांगतात आणि ऋषि प्राक्तन कर्मांपासून म्हणजे पूर्वजन्मींच्या आचरणापासून त्यांची उपपत्ति करतात ! "

काकः पद्मवने रतिं न कुरुते हंसो न कूपोदके ।
मूर्खः पंडितसंगमे न रमते दासो न सिंहासने ॥
कुस्त्री सज्जनसंगमे न रमते नीचं जनं सेवते ।
या यस्य प्रकृतिः स्वभावजनिता केनापि न त्यज्यते ४८१

" कावळ्यास कमलवनाची शोभा पाहून आनंद होत नाही. हंस हा कूपोदकाचे ठायीं रमत नाहीं. मूर्खाला पंडितांच्या समागमानें संतोष होत नाहीं, दासास राजसभा काय होय? व्यभिचारिणी स्त्री सज्जनांच्या संगतीनें सुख पावत नाहीं, तर नीच जनांचा समागम तिला आवडतो: एकंदरींत जी ज्यांची स्वभावसिद्ध प्रकृति ती कोणाच्यानें सोडवते? "

हस्ती वन्यः स्फटिकघटिते भित्तिभागे स्वबिंबं।
दृष्ट्वा दृष्ट्वा प्रतिगज इति त्वद्द्विषां मंदिरेषु ॥
दंताघातादलितदशनस्तं पुनर्वीक्ष्य सद्यो ।
मंदं मंदं स्पृशति करिणीशंकया विक्रमार्क ४८२

" हे विक्रमादित्या! तुझ्या शत्रूंच्या मंदिरीं वनांतला हत्ती जाऊन तेथील स्फटिकभिंतीचे ठायीं आपलें प्रतिबिंब पाहून हा दुसरा हत्ती आहे या बुद्धीनें त्यास टक्कर देतो; पण पुढें काय होतें कीं, वरील आघाताच्या योगानें त्याचे दांत मोडून गेले असतां पुनः त्याच भिंतीकडे तो मंद मंद जाऊन हस्तिनीच्या बुद्धीनें त्याच आपल्या प्रतिबिंबास गोंजारूं लागतो ! "

ग्रासो द्गलित सिक्थस्य का हानिः करिणो भवेत् ॥
पिपीलिका तु तेनैव सकुटुंबोपजीवति ॥४८३॥

" हत्तीनें घांस खातला असतां त्यांतील शीत जर गळून पडलें तर त्यांत त्याची हानि ती काय? पण त्या शितांनीच मुंगीच्या कुटुंबाचा निर्वाह होतो ! "

वें निष्पीडन करून तृषितांची पीडा दूर करतोस हें तुझें महत्त्व बरीक वर्णन करण्यासारखें स-रें!"

कंपंते गिरयः पुरंदरभिया मैनाकमुख्याः पुनः।
क्रंदंत्यंबुधरा स्फुरंति वडवावक्त्रोद्गता वन्हयः॥
भोः कुंभोद्भव मुच्यतां जलनिधिःस्वस्त्यस्तु ते सांप्रतं।
निद्रालुश्लथबाहुवल्लिकमलाश्लेषो हरिः सीदति ४८९

"हे अगस्त्या! तूं समुद्रास अंजलिगन करून माश्रूं पाहात आहेस, पण ही पहा काय तारांबळ उडून गेली आहे ती!—इंद्राच्या वज्रापासून भय पावलेले मैनाकादि पर्वत जे आजपर्यंत समुद्रांत स्वस्वरूप दडून राहिले होते ते आतां इंद्राच्या धाकानें कांपूं लागले आहेत, मेघ रडूं लागले आहेत, वडवाग्नि निराश्रय होणार यास्तव तो मुखावाटे ज्वाला टाकूं लागला आहे आणि निद्रावशें करून जिची मिठी सईल पडली आहे अशा लक्ष्मीनें आलिंगित जो हरि तोही दुःख पावत आहे;—तर तुला कांहीं दया येऊंदे व समुद्रास सोड कसा!"

भ्रूभंगे रचितेऽपि दृष्टिरधिकं सोत्कंठमुद्वीक्षते।
रुद्धायामपि वाचि सस्मितमिदं दग्धाननं जायते॥
कार्कश्यं गमितेऽपि चेतसि तनू रोमांचमालंबते।
दृष्टे निर्वहणं भविष्यति कथं मानस्य तस्मिन् जने ४९०

कोणी मानिनी आपल्या सखीस ह्मणतेः—"अगे! तो प्रियजन दृष्टीसमोर असला ह्मणजे मी आपल्याकडून कितीही मानधारण केला तरी तो पार कसा पडावा? पहा कीं, मीं आपल्याकडून जरी बळेंच कपाळाला आठ्या घातल्या, तरी माझी दृष्टि त्याच्या मुखाकडे लागून माझें हृदयगत औत्सुक्य प्रगट करते; मी मुकलंभ जरी बसलें तरी अंतर्गत हर्ष या मेल्या तोंडावर स्मिताच्या रूपानें आविर्भूत होतो; आणि मन कितीही कठीण केलें तरी अंगावर येणारा कांटा कशानें लपणार? तेव्हां वरील बाह्यचिन्हांनीं मानाचें कृत्रिमत्व व्यक्त होतें!"

जन्मस्थानं न खलु विमलं वर्णनीयो न वर्णो ।
दूरे पुंसां वपुषि रचना पंकशंकां करोति ॥
यद्यप्येवं सकलकरभिर्द्रव्यगर्वापहारी ।
को जानीते परिमलगुणः कोऽपि कस्तूरिकायाः ४९१

" कस्तुरीचें जन्मस्थान पाहिलें तर तें मोठें निर्मळ आहे असें नाहीं; वर्णही वर्णनीय आहे असें नाहीं; तिचा लेप अंगावर केला असतां चिखल लिंपला आहे कीं काय असा भास होतो: पण इतकें असून ती सान्या सुगंधीद्रव्यांच्या तोंडांत मारते; तेव्हां हा तिचा काय लोकोत्तर गुण आहे पहा! "

मौली मन्मणयो गृहं गिरिगुहा त्यागः किलात्मत्वचो।
निर्यत्नोपनतैश्च वृत्तिरनलैरेकत्र चर्येदृशी ॥
अन्यत्रानृजुवर्त्मता द्विरसना वक्त्रे विषं वीक्षणं ।
सर्पामंगलसूचकं कथय भो भोगिन् सुखं किं त्विदं ४९२

" हे सर्पा! तुझ्या मस्तकावर पहावें तों उत्तम रत्नें चमकताहेत, तुझें निवासस्थान पर्वतांच्या गुहा होत, त्याग ( पक्षीं, दान ) तर स्वतः आपल्या शरीराचाही तूं करतोस, तेंहेर्मांची तुझी वृत्ति पाहिली तर अयत्नसुलभ जो वायु त्यावर तुझा निर्वाह चालतो;—एकीकडे पहावें तों तुझी एकंदर चर्या अशी; पण दुसरीकडे पहा काय आहे तें!— कुटिलगति ( कपटाचरण ) दोन जिभा ( चहाडी ), तोंडांत विष ( क्रूर भाषण ) आणि अत्यंत अमंगलदायक दर्शन, तेव्हां तुझा खरा प्रकार तरी कोणता म्हणावा? "

का कस्य कति वा दंता मेषस्यांडं कियत्पलं ॥
गर्दभे कति रोमाणि व्यर्थैषा तु विचारणा ४९३

" कावळ्यास दांत किती असतात, मेंढ्याच्या अंडांत किती मांस असतें, गाढवाच्या अंगावर किती रोम असतात,--इत्यादि गोष्टींची विचक्षणा करीत बसणें म्हणजे मूर्खपणा आहे!"

नैषां संध्याविधिरविकलो नाच्युतार्चाऽपि सांगा।
न स्वे काले हवननियमो नापि वेदार्थचिंता ॥
न स्वहेलानियतमशनं नापि निद्रावकाशो ।
न द्वौ लोकावपि ननु भृशं राजसेवापराणां ४९४

" जे राजसेवेंत नियुक्त झालेले त्यांची संध्या पुरती व्हावयाची नाहीं, देवपूजा धड उरकावयाची नाहीं, यथाकाळीं होम हवन घडावयाचें नाहीं, वेदार्थाचें मनन क-

रण्यास त्यांस अवकाश नाहीं, वेळेवर जेवण नाहीं व झोंपही नाहीं:—सारांश, त्या हतभाग्यांस इहलोकींचें सुख लाभत नाहीं व परलोकींचेंही नाहीं!"

निर्वृत्ताध्वरकृत्य ऋत्विजमहोत्तीर्णापगो नाविकं।
युद्धांते स्मरं च सिद्धविजयो योद्धारमासस्थलः॥
वृद्धं वारवधूजनं च कितवो निर्घृष्टतद्यौवनो ।
ध्वस्तातंकचयश्चिकित्सकमपि द्वेष्टि प्रदेयार्थिनं ४९५.

" यज्ञकर्म उरकून गेलें असतां यजमानास ऋत्विज नकोसा होतो, नदी ओलांडून गेलेल्या उतारूस नाविक तृणवत् वाटूं लागतो, युद्ध समाप्त झालें कीं योद्धा म्हणजे कःपदार्थ होऊन जातो, एकदां स्थळ मिळालें म्हणजे मग वरास कोणी विचारीत नाहीं, विलासी लोक हे वारवधूंचा बहार भोगून मोकळे झाले म्हणजे मग त्यांस पुसततनासे होतात आणि रोगास दूर करून आपला झालेला पैसा वैद्य मागूं लागला कीं तो मार्जा रोग्यास दुस्मान वाटूं लागतो!"

स्वाधीना दयिता स्मुतावधि सुतोऽसौ षोडशाब्दावधि।
स्यात्कन्या करपीडनावधि स्नुतस्त्रीस्तद्दशात्वावधि॥
जामाता बहुलार्पितावधि सखा साधुप्रलापावधि।
शिष्यो गुह्यनिरूपणावधि परे चैते धनित्वावधि ४९६.

" जोंपर्यंत मुलगा झाला नाहीं तोंपर्यंत बायको आपल्या स्वाधीन, मुलगा सोळा वर्षांपर्यंत, मुलगी लग्न होई तोंपर्यंत, सून तीस यौवनदशा प्राप्त होई तोंपर्यंत, जांवई पुष्कळ जों पावतों पोंचतें आहे तोंपर्यंत, मित्र लोक आपणास बरें म्हणताहेत तोंपर्यंत, शिष्य गुरुकिल्ली सांगून दिली नाहीं तोंवर आणि सामान्यतः इतर लोक जवळ पैसा आहे तोंपर्यंत!"

तापं लुंपसि सर्वतो वितरसे मुक्ताफलं शुक्तिषु ।
क्षेत्रं सिंचसि किंच पल्लवयसि श्रीखंडमुख्यान् द्रुमान्॥
क्षारं क्षारमिदं जलं जलनिधेरादाय जीमूत हे ।
विश्वं जीवयसि ब्रवीतु जगति कोऽपि कस्ते गुणान् ४९७

" हे मेघा! तूं साऱ्या जगाचा ताप घालवितोस, समुद्रांतील शिंपांत मोती

उत्पन्न करतोस, शेतें शिंपतोस, चंदनादि वृक्षांस पल्लवित करतोस, समुद्राचें अति-शय खारट जें पाणी तें शोषून घेऊन विश्वाचें पुनरुज्जीवन करतोस; तेव्हां कोणी केवढाही मोठा वक्ता असला तरी तुझ्या गुणांचें यथास्थित वर्णन करणें केवढें दुराया-स आहे!''

स्निग्धेंद्रोपल सुंदरः कचभरो वक्त्रं सगोत्रं विधो-।
र्वक्षोजौ मणिकुंभडंबरमुषौ मध्योऽस्ति वा नास्ति वा॥
श्रोणी मंडलमूरुदर्वहमहो शोणाब्जतुल्ये पदे ।
सत्यं मंजुगिरो मरालमहिलाध्येयो गतिर्विभ्रमः ४९८

''तुळतुळीत इंद्रनीळाप्रमाणें सुंदर केशपाश, चंद्रासारखें रमणीय मुख, रत्न-कलशांच्या डौलाचें स्तन, मध्यभाग (कटिप्रदेश) हा सरासरी आहे किंवा नाहीं. मांड्यांस न झेंपणारा असा जघनभार, रक्तकमलतुल्य पाउलें, मंजुल स्वर आणि हं-सस्त्रियांनीं त्यास पाहून शिकावें असा गतिविलास!''

देवो हरिर्वहतु वक्षसि कौस्तुभं तत् ।
सत्यं च काचन पुनर्कमणेः प्रतिष्ठा ॥
यत्पादसंगतिसमर्पितसौरभाणि ।
धत्ते स एव शिरसा सरसीरुहाणि ४९९

''विष्णु हा कौस्तुभास स्वहृदयीं धारण करो; पण त्याच्याहून दिनमणीची प्रति-ष्ठा मला फार अधिक वाटते. कां तर, त्याच्या पादस्पर्शानें विकास पावून त्यांचा सुगंध प्रगट झाला आहे अशीं कमलें विष्णु आपल्या शिरीं धारण करतो!''

राज्यं येन पटांतलग्नतृणवत्त्यक्तं गुरोराज्ञया ।
पाथेयं परिगृह्य कार्मुकवरं घोरं वनं प्रस्थितः ॥
स्वाधीनः शशिमौलिचापविषये प्राप्तो न वै विक्रियां ।
पायाद्वः स विभीषणाग्रजनिहा रामाभिधानो हरिः ५००

''त्यानें वस्त्राच्या दशीला अडकलेल्या तृणाप्रमाणें आपल्या पित्याच्या आ-ज्ञेवरून राज्य सोडून दिलें, जो धनुष्य हेंच काय तें पाथेय (शिदोरी) बरोबर घेऊ-न घोर अरण्यांत गेला, ज्याला शंकरचापाच्या दर्शनेंकरून भीति न वाटतां तें त्या-नें सहज मोडून टाकलें आणि बिभीषणाच्या थोरल्या भावाचा ज्यानें वध केला

तो रामनामधारी विष्णु तुमचें रक्षण करो."

कुलाचला यस्य महीं द्विजेभ्यः। प्रयच्छतः सीमदृषत्त्वमापुः॥
बभूवुरुत्सर्गजलं समुद्राः। स रैणुकेयः श्रियमातनोतु॥५०१॥

" ज्याच्या पृथ्वीप्रदानसमयीं अष्टकुलाचल हे ब्राह्मणांच्या दानविषयक भूमीचे धोंडे झाले आणि समुद्र हे दानोदक झाले, तो रेणुकापुत्र तुम्हांस श्रेयस्कर होवो!"

पदव्यक्तिव्यक्तीकृतसहृदयानंदसरणी।
कवीनां काव्येन स्फुरति बुधमात्रस्य धिषणा॥
नवक्रीडावेशाव्यसनपिशुनो यः कुलवधू-।
कटाक्षाणां पंथाः स खलु गणिकानामविषयः ५०२

"शब्द श्रवणमात्रेंकरून सहृदयाच्या ठायीं उत्पन्न होणारा जो आल्हाद तो कवीच्या काव्याचे ठायीं ज्ञात्यास मात्र बुद्धिगोचर होतो कसा? तर ज्याप्रमाणें नूतन समागमाच्या योगानें प्राप्त झालेल्या रसिकत्वाचे दर्शक जे कुलवधूंचे कटाक्ष ते गणिकजनांस अगम्य असतात!"

ते भूमीपतयो जयंति नतयो येषां द्विषद्भूभृतां ।
ते वंद्या यतयो विशंति मतयो येषां परेब्रह्मणि ॥
ते श्लाघ्याः कवयो वयोमदभरव्याजृंभमाणांगना-
दृक्पाता इव तोषयंति हृदयं येषां गिरां संचयाः ५०३

"ते राजे धन्य, कीं ज्यांच्या पायांवर त्यांच्या शत्रूंस डोकें घासावें लागतें; ते यती धन्य, कीं ज्यांच्या बुद्धीस परब्रह्म हें गोचर झालें आहे; आणि ते कवि धन्य, कीं ज्यांचे वाग्विलास तरुणीच्या मदपूर्ण कटाक्षाप्रमाणें रसिकांच्या हृदयास हृष्ट करतात!"

त एवामी बाणास्तदपि हरलब्धं धनुरिदं।
स एवाहं पार्थः प्रमथितकरारातिनिचयः॥
इमास्तास्ता गोप्यो हरिचरणचिंतैकशरणाः।
ह्रियंते गोपालैर्विधिरपि बलीयान्‍ तु नरः ५०४

कृष्णावतार समाप्त झाल्यावर अर्जुनाची जी दुर्दशा उडाली तिचें तो खेदपूर्वक वर्णन करतो :-- "अरेरे! तेच ना हे माझे बाण, तेंच हें शिवापासून प्राप्त झालेलें धनुष्य, तोच हा मी अर्जुन, कीं ज्यानें दानवांचा फडशां संहार केला; आणि ही सर्व जुनीच सामग्री असतां कृष्णाच्या पायांशीं ज्यांचा एकभाव अशा त्या गोपी या वनचरांनीं हरून न्याव्या काय? तस्मात् दैव हें सबल होय, नराचा आपल्या पौरुषाविषयींचा अभिमान सारा खोटा!"

उत्सिक्तः कुसुमासवैः कुमुदिनीं राजप्रियां पुष्पिणी-
मालिंगन्निशि निर्भयं परिचयं कुर्वन् पुनः पल्लवैः॥
यावत्पंकजसौरभस्वमखिलं गृण्हन् लघु प्रस्थित-
स्तावत्कल्प उपस्थिते मरुदयं विष्वग्भयाद्धावति ५०५

"पुष्पमधूनें (पक्षीं, मद्यानें) झिंगून गेलेला असा वायु राजप्रिया (राणी; पक्षीं, चंद्रवल्लभा) जी कुमुदिनी ती पुष्पिणी (फुललेली; पक्षीं, अस्पर्शा) असतां तिला आलिंगन देऊन तिच्या पल्लवांशीं (पक्षीं, पदरांशीं) निर्भयपणें परिचय करीत होत्साता समग्र कमळांचें हरण करून जों हळूच जावयास निघाला आहे तों प्रभातकाळ समीप आलासा पाहून धावत्यां धावत्यां चोहोंकडे धांवतो!"

अलंकरोति हि जरा राजामात्यभिषग्यतीन्॥
विडंबयति पण्यस्त्रीमल्लगायकसेवकान् ५०६

"राजाचे मंत्री, वैद्य व संन्यासी यांस जरा ही भूषण आणते; तीच वारांगना, मल्ल, गायक व सेवक यांस विडंबनेस पात्र करते!"

गर्जन् हरिः सांभसि शैलकुंजे। प्रतिध्वनीनात्मकृतान्निशम्य॥
पदं बबंध क्रमितुं सरोषः। प्रतर्कयन्नन्यमृगेंद्रनादम्॥ ५०७॥

"पर्वतावरील एका कुंजांतील जलाशयाच्या कांठीं असतां सिंहानें मोठ्यानें गर्जना केली व तिजसरसे चोहोंकडे प्रतिध्वनि उठले; ते ऐकून सिंह त्वेषास चढून अन्य सिंहाच्या शंकेनें त्यावर झांप घालण्यास तयार झाला!"

उपानीतं दूरात्परिमलमुपाघ्राय मरुता ।
समापासी दृस्मिन्मधुरमधुलोभान्मधुकरः॥

परो दूरे लाभः कुपितफणिनश्चंदनतरोः।
पुनर्जीवन् यायाद्यदि तदिह लाभोऽयमतुलः ५०८

"हा मधुकर वाऱ्यावर वाहत आलेल्या परिमलास हुंगून मधुरमधूच्या लोभानें या चंदनाकडे आला आहे. आतां यास वरील लाभ होणें तर दुरापास्तच आहे, पण वरील वृक्षावर जो क्रुद्ध सर्प आहे त्याच्या तडाक्यांतून वांचून हा जीवंत माघारीं जावो म्हणजे यानें मोठी मिळविली!"

दष्टे जगद्वपुषि कालभुजंगमेन।
तत्रांधकारमिषमाविरभूद्विषं यत्॥
संजातलक्ष्मणि तदिंदुमणौ निपाय्य।
ज्योत्स्नामये पयसि तत् क्षिपति स्म धाता ५०९

"कालरूप भुजंगमानें (पक्षीं, कृष्णसर्पानें) जगद्रूप शरीरास दंश केला असतां अंधकाराच्या रूपानें जो विषार चोहोंकडे पसरला तो चंद्ररूप मण्याकडून शोषवून घेऊन चंद्रिकारूप दुग्धराशींत त्यास ब्रह्मदेव जणों काय टाकता झाला!"

सुधाधाम्नः कांतिस्तव वदनपंकेरुहगुणै-।
र्जितेव म्लानत्वं व्रजति सहता प्राणदयिते॥
वदत्येवं कांते दिवसविरहातंकचकिता।
तदंगे सल्लग्ना तव दिशतु राधा प्रियशतं ५१०

"हे प्राणप्रिये! तुझ्या मुखकमलाच्या कांतीनें जणूं काय लज्जित झालेली अशी ही चंद्राची शोभा म्लानत्व पावत आहे असें वाटतें, याप्रमाणें कृष्णाचें भाषण ऐकून संध्यासमय झालासा पाहून घाबरलेली व आपल्या वल्लभाच्या अंगावर जिनें अंग टाकून दिलें आहे अशी राधा तुम्हें बहुत कल्याण करो!"

श्लेषे केचन शब्दगुंफविषये केचिद्रसे चापरे-।
ऽलंकारे कतिचित्सदर्थविषये चान्ये कथावर्णके॥
आसर्वत्र गभीरधीरकविताविंध्याटवीचातुरी-
संचारे कविकुंभिकुंभभिदुरो बाणस्तु पंचाननः ५११

" कोणी कवि श्लेषांतच निपुण असतात. कोणी शब्दशास्त्रांत, कोणी रसांत, कोणी अलंकारांत. कोणी मोठ अर्थाचें निबंधन करण्यांत, किंवा कोणी कथानक बांधण्यांत: पण कवितारूप गहन विंध्याटवींत संचार करण्याविषयीं अत्यंत कुशल असा मदला म्हणजे कविगजांचा गर्व परिहार करणारा एक बाणरूप सिंहच होय!"

ये संसक्त विवादिनः परयशःशल्ये न सूक्ष्मकुशाः ।
कुर्वंति स्वगुणस्तवेन गुणिनां यत्नाद्गुणाच्छादनं ॥
तेषां रोषकषायितो द्गदृशां कोपोष्णनिःश्वासिनां ।
दीना गत्नशिरस्येव कृष्णफणिनां विद्या जनोद्वेगिनी ५११

" जे सर्वांत नेहमीं वाग्जल्प करणार, दुसऱ्याच्या कीर्तिश्रवणानें ज्यांच्या पोटांत शूळ उठतो व जे आपल्या गुणांची प्रशंसा करून दुसऱ्यांच्या गुणाचें आच्छादन करण्याविषयीं नेहमीं जपलेले असतात. अशांची विद्या रागानें ज्यांची दृष्टि लाल झाली आहे व जे उष्ण निःश्वास टाकतात. अशा कृष्णसर्पाच्या शिरोरत्नाप्रमाणें लोकांस अत्यंत भयावह होय!"

ज्योतिःशास्त्रमहोदधौ बहुतरान्सर्गापवादात्मभिः ।
कल्लोलैर्निबिडे कणान्कतिपयाल्लब्ध्वा कृतार्था इव ॥
दीर्घायुःसुतसंपदादिकथनैर्दैवज्ञपाशा इमे ।
गेहं गेहमनुप्रविश्य धनिनां मोहं मुहुः कुर्वते ॥ ५१३॥

" बहुत नियम व अपवाद या तरंगांनीं व्याप्त असा जो ज्योतिःशास्त्ररूप महासागर त्यांतले थोडेसे कण मात्र ज्यांनीं केवळ कृतार्थ होऊन बसलेले असे ते ज्योतिष्यांना ज्योतिषी ते दीर्घायुष्य, संतत, संपत इत्यादिकांविषयीं धनिकांस आशीर्वाद देत दारोदार हिंडतात!"

उपचारः कर्तव्यो यावदनुत्पन्नसौहृदाः पुरुषाः ॥
उत्पन्नसौहृदानामुपचारः कैतवं भवति ॥ ५१४ ॥

" जों पर्यंत कोणाशीं मैत्री जडली नाहीं तोंपर्यंत त्यास आदरसत्कारादि उपचार करावे: पण एकदां मैत्री जुळल्यावर मग वरील उपचार करणें हें ढोंग दिसतें!"

मांसं मृगाणां दशनौ गजानां। मृगद्विषां चर्म फलं द्रुमाणाम्॥

स्त्रीणां स्वरूपं च नृणां हिरण्यमेते गुणा वैरकरा भवंति ५१५

"मृगांचें मांस, हत्तींचे दांत, सिंह व वाघ यांचे कातडें, वृक्षांचें फळ, स्त्रियांचें सौंदर्य आणि धना ढ्यांचें द्रव्य,—हे सर्व गुण प्रत्येकाच्या नाशास कारणभूत होत."

दारेषु किंचित्स्वजनेषु किंचित्। गोप्यं वयस्येषु सुतेषु किंचित्॥
युक्तं न वा युक्तमिदं विचिंत्य। वदेद्विपश्चिन्महतोऽनुरोधात् ५१६

"कांहीं गोष्टी बायकोपासून गुप्त ठेवाव्या लागतात, कांहीं चाकरमाणसांपासून, कांहीं मित्रांपासून व कांहीं पुत्रांपासून: एकंदरींत कोणतीही गोष्ट युक्त आहे कीं अयुक्त आहे याचा विचार करून शहाण्या मनुष्यानें मोठें धोरण ठेवून बोलत असावें."

राष्ट्रस्य चित्तं कृपणस्य वित्तं। मनोरथं दुर्जनमानुषाणाम्॥
स्त्रियश्चरित्रं पुरुषस्य भाग्यं। देवो न जानाति कुतो मनुष्यः ५१७

"राष्ट्राची चित्तवृत्ति, कृपणाचें धन, दुर्जनांचें मनेप्सित, स्त्रियांचें कामचरित आणि पुरुषाचा भाग्योदय,—या पांचांचा देवासही थांग लागत नाहीं, मग माणसांचा काय पाड!"

संतश्चेदमृतेन किं यदि खलस्तत्कालकूटेन किं।
दातारो यदि कल्पशाखिभिरलं यद्यर्थिनः किं तृणैः॥
किं कर्पूरशलाकया यदि दृशः पंथानमेति प्रिया।
संसारेऽपि सतींद्रजालमपरं यद्यस्ति तेनापि किं ५१८

"जर सज्जनाचा समागम आहे तर अमृत कशाला पाहिजे? दुर्जनाशीं संबंध आहे तर कालकूटाचें काय प्रयोजन? दाते आहेत तर कल्पवृक्षांची काय गरज आहे? याचकापुढें तृणाची काय मातब्बरी आहे? प्रिया दृष्टीस पडली असतां कापराच्या काडीनें डोळे किती गार होणार? संसाराच्या विचित्र पसाऱ्यापुढें गारुड्याचा खेळ तो काय मारतो!"

कलहांतानि हर्म्याणि कुवाक्यांतं च सौहृदं॥
कुराजांतानि राष्ट्राणि कुकर्मांतं यशो नृणां ५१९

"कलह लागला कीं घर बुडालें, दुर्वचनाचा प्रयोग झाला कीं मैत्री आटपली, वाईट राजा आला कीं राष्ट्राची इतिश्री समजावी, दुष्कर्म पडलें कीं अब्रू खालीं आली!"

वित्तं परिमितमधिकव्ययशीलं पुरुषमाकुलीकुरुते ॥
ऊनांशुकमिव पीनस्तनजघनायाः कुलीनायाः ५२०

"जो हातांचा सढळ त्याला थोडा आदा असला म्हणजे फार पीडा होते; कीं ज्याप्रमाणें स्तन व जघन यांचा विस्तार कुलिन स्त्रियेस आखूड वस्त्रामुळें संकोचदायक होतो!"

येनाचलेन सरसीरुहलोचनायाः
स्त्रातः प्रभूतपवनादुदये प्रदीपः ॥
तेनैव सोऽस्तसमयेऽस्तमयं विनीतः।
क्रुद्धे विधौ भजति मित्रममित्रभावं ५२१

"कमलाक्षीच्या त्या पदराच्या योगानें वाऱ्यापासून दीपाचें प्रथमतः संरक्षण झालें, तोच पदर पुढें त्यास अस्तास पोंचविण्यास कारणीभूत झाला. तेव्हां दैव प्रतिकूळ झालें असतां मित्रही शत्रु बनतो!"

सहजमलिनवक्रभावभाजां। भवति भवः प्रभवात्मनाशहेतुः॥
जलधरपदवीमवाप्य धूमो। ज्वलनविनाशमनुप्रयाति नाशं ५२२

"जे स्वभावतःच मलिन व वक्र त्यांस उन्नति प्राप्त झाली असतां ते आपल्या जनित्याच्या नाशास कसे उद्युक्त होतात: पहा कीं, धुम हा मेघ बनला कीं, अग्नीच्या उपशमास कारण होऊन नंतर स्वतः लय पावतो!"

कल्पवृक्षोऽपि कालेन भवेद्यदि फलप्रदः॥
को विशेषस्तदा तस्य वन्यैरन्यमहीरुहैः ५२३

"कल्पवृक्ष ही जर अवकाशानें फलप्रद होऊं लागला, तर मग त्याच्यांत व इतर रानवट झाडांत काय अंतर राहिलें?"

वरं दारिद्र्यमन्यायप्रभवाद्विभवादपि ॥
शरीरे कृशता रम्या स्थूलता न तु शोथिता ५२४

"अन्यायानें मिळवलेल्या वैभवापेक्षां दारिद्र्य बरें; जसें स्थूळत्वापेक्षां किंवा सुजलेल्या अंगापेक्षां सडपातळपणा बरा!"

अंतर्विशाति मार्जारी शुनी वा राजवेश्मनि॥
बहिस्थस्य गजेंद्रस्य किमर्थः परिहीयते ५२५

" मांजरी व कुत्री ह्या दोघी खुशाल राजवाड्यांत प्रवेश करतात; आणि हत्ती पाहिला तर त्यास जागा बाहेर! पण असें असल्यानें हत्तीचें काय कमी होत आहे?"

पीयूषेण सुरा श्रिया मुररिपुर्मर्यादया मेदिनी।
शक्रः कल्परुहा शशांककलया श्रीशंकरस्तोषितः॥
मैनाकादिनगा निजोदरगृहे यत्नेन संरक्षिताः।
मच्चूलीकरणे घटोद्भवमुनिः केनापि नो वारितः ५२६

" समुद्रानें देवास अमृत दिलें, विष्णूस लक्ष्मीचें दान केलें, पृथ्वीस मर्यादा दिली, इंद्रास कल्पवृक्ष दिला, शंकरास चंद्राची कला देऊन संतुष्ट केलें आणि मैनाकादि पर्वतांस आपल्या उदराचे ठायीं ठाव दिला; पण ज्यावेळेस अगस्त्यानें त्याला प्राशनार्थ अंजलींत घेतलें त्यावेळेस वरच्यापैकीं एकानेंही त्याचें रक्षण केलें नाहीं!"

रत्नाकरे परिहृता वसतिः किमन्यत्।
अंगीकृतः कठिनवेधनदुःखभारः॥
वक्षोजकुंभपरिरंभणलोलुपेन ।
किं किं न तेन विहितं नवमौक्तिकेन ५२७

" मौक्तिकानें समुद्रांतली आपली वसती सोडून दिली; फार तर काय? पण वेधनसंस्काराचें महादुःखही सहन केलें! हें सर्व कशाकरतां? तर कुचकुंभपरिरंभणाविषयींची जी त्याची उत्कट इच्छा ती तृप्त करण्याकरतां!"

यथा देशस्तथा भाषा यथा राजा तथा प्रजा॥
यथा भूमिस्तथा तोयं यथा बीजं तथांकुरः ५२८

" जसा देश तशी भाषा; जसा राजा तशी प्रजा, जशी भूमि असेल तसें उदक असणार; आणि जसें बीं असेल त्या मानानें झाड निपजणार!"

सद्यः फलति गांधर्वं मासमेकं पुराणकम्॥
वेदाः फलंति कालेषु ज्योतिर्वैद्यं निरंतरं ५२९

" गायनविद्या तत्काल फलद्रूप होते; पुराणाची माप्ति महिन्यानें होते; वेदांचें फल कालांतरानें दृष्टीस पडतें; आणि ज्योतिष व वैद्य हीं निरंतर लाभप्रद होतात!"

न देवाय न धर्माय न बंधुभ्यो न चार्थिने॥
दुर्जनेनार्जितं द्रव्यं भुज्यते राजतस्करैः ५३०

" दुर्जनानें मिळविलेलें द्रव्य देवकार्य, धर्मकृत्य, संबंधिजन, किंवा याचक यांच्याकडे खर्च व्हावयाचें नाहीं; तर त्याचा उपभोग राजा किंवा तस्कर याजकडून व्हावयाचा!"

नैताः स्वयमुपभोक्ष्यसि मोक्ष्यसि चेज्जलद पत्रकुत्रापि॥
तत्किं तत्र न मुंचसि मुक्ता मुक्ता भवंति यत्रापः ५३१

" हे मेघा! जर हा जलसंचय तूं स्वतः उपभोगणार आहेस असें नाहीं व कोठें तरी यदृच्छेनें टाकून देणार, तर ज्या ठिकाणीं जलबिंदु सोडले असतां ते मौक्तिकरूप होतात तेथें वर्षाव संचयाचा तूं कां विनियोग करीत नाहींस?"

पाथोनिधिमधि पाथो वितरसि पाथोद किं तेन ॥
दिनकरकराभितप्तं चातकपोतं न तोषयसि॥५३२॥

" हे मेघा! तूं समुद्रावर दृष्टि करतोस, पण त्यापासून काय लाभ आहे? सूर्यकिरणांपासून संताप पावलेल्या बालचातकास तूं कां संतुष्ट करीत नाहींस?"

सरलयोः किल सख्यमुदाहृतं। कुटिलयोर्घटनैव कदाचन ॥
यदि भवेत्सरलेन खलेन वा। न चिरमस्ति धनुःशरयोरिव ५३३

"खरें सख्य जें व्हावयाचें तें दोघां सरळ स्वभावाच्या पुरुषांत होऊं शकतें; कधीं कधीं तें कुटिल स्वभावाच्या मनुष्यांतही सांपडतें. पण एक खळ आणि एक सरळ अशांची संगति घडली असतां ती फार वेळ टिकत नाहीं; यास उदाहरण कुटिल जें धनुष्य व सरळ जो बाण यांचें होय!"

राज्ये नहि सुखं दुःखं संधिविग्रहचिंतया ॥
पुत्रादपि भयं यत्र तत्र सौख्यं हि कीदृशं ५३४

"राज्यांत स्वस्थलाभ मुळीं नाहीं; निरंतर संधि (तह) व विग्रह (लढाई) यां-

ची चिंता असते. शिवाय जेथें मत्स्यक्ष पुत्रापासूनही भय तेथें स्करव तें काय?'

छायामन्यस्य कुर्वंति स्वयं तिष्ठंति चातपे ॥
फलंति वै परार्थे च नात्मनोर्थे महाद्रुमाः ५३५

"मोठाले वृक्ष हे दुसऱ्या करता छाया करतात आणि स्वतः उन्हांत राहतात; तसेच केवळ दुसऱ्याकरतांच ते फलद्रूप होतात!"

कः कौ के कं कौ कान् हसति च हसतो हसंति तन्वंग्याः ॥
दृष्ट्वा पल्लवमधरः पादौ पद्मं च कोरकान् दंताः ॥ ५३६ ॥

"सुंदर स्त्रीचे कोणकोणते अवयव कोणकोणाला हंसतात? तर अधर पल्लवाला हंसतो, पाय कमलांस व दांत कळ्यांस!"

अंतस्तिमिरनाशाय शाब्दबोधो निरर्थकः ॥
न नश्यति तमो नाम कृतया दीपवार्तया ५३७

"केवळ शाब्दिक बोधानें आंतलें अज्ञान नष्ट होत नाहीं; जसें 'दिवा दिवा' असा उच्चार केल्यानें अंधाराचा उजेड होत नाहीं!"

लोके कलंकमपहातुमयं मृगांको ।
जातो मुखं तव पुनस्तिलकच्छलेन ॥
तत्रापि कल्पयसि तन्वि कलंकरेखां ।
नार्यः समाश्रितजनं हि कलंकयंति ५३८

"चंद्र हा आपणास जडलेला कलंक दूर व्हावा म्हणून मुखाच्या रूपानें प्रगट झाला; पण हे स्त्रिये! त्यासही पुनः गोंदण्याच्या मिषानें तूं कलंकित करतेस; तस्मात् ज्यानें तुझा आश्रय केला तो कलंकयुक्त व्हावयाचाच!"

वासः प्रधानं खलु योग्यतायाः । वासो विहीनं विजहाति लक्ष्मीः ॥
पीतांबरं वीक्ष्य ददौ तनूजां । दिगंबरं वीक्ष्य विषं समुद्रः ॥ ५३९ ॥

"लोकांत मानमान्यता होण्यास वस्त्र हें प्रधान आहे; जो वस्त्रकळाहीन आहे त्याला लक्ष्मीचा लाभ दुरापास्त होय. पहा कीं, पीतांबर जो विष्णु त्याला

समुद्रानें आपली कन्या अर्पण केली: आणि शिव हा केवळ दिगंबर, यास्तव त्यास विष दिलें।"

आनंद तांडवपुरे द्रविडस्य गेहे ।
चित्रं वसिष्ठवनितामममाज्यपात्रं ॥
विद्युल्लतेव परिनृत्यति तत्र दर्वी ।
धारां विलोकयति योगबलेन सिद्धः ५४०

"आनंदाचें वसतिस्थान असें जें द्रविडाचें घर त्याच्या घरीं तुपाचा तपेला केवढा होता ह्मणाल तर अरुंधतीच्या येवढा!* तींत पळी कशी खालवर होती तर विद्युल्लतेप्रमाणें! आणि तुपाची धार जी पानावर पडत होती ती सिद्धानेंच योगबळेंकरून पहावी, इतरास अगोचर होय!"

स्वगृहे पूज्यते मूर्खः स्वग्रामे पूज्यते प्रभुः॥
स्वदेशे पूज्यते राजा विद्वान् सर्वत्र पूज्यते ५४१

"मूर्खास मान ह्मटला ह्मणजे त्याच्या घरांतल्या घरांत, अधिकाऱ्यास त्याच्या गांवांत, राजास त्याच्या देशांत; परंतु विद्वानास तो जिकडे जाईल तिकडे!"

अर्थाहरण-कौशल्यं किंस्तुमः शास्त्रवादिनां॥
अव्ययेभ्योऽपि ये चार्थान् निष्काम्यंति ह्यनेकशः ५४२

"जे शास्त्रवेत्ते आहेत त्यांची अर्थनिष्पादनाविषयीं जी निपुणता असते ती काय सांगावी! प्रत्यक्ष अव्ययांपासूनही ते अर्थ काढूं शकतात!" या श्लोकांत 'अर्थ' व 'व्यय' हे द्व्यर्थी शब्द होत हें उघडच आहे.

वक्त्रं पूर्णशशी सुधाधरलता दंता मणिश्रेणयः।
कांतिः श्रीर्गमनं गजः परिमलस्ते पारिजातद्रुमः॥
वाणी कामदुघा कटाक्षलहरी तत्कालकूटं विषं।
मन्ये सुंदरि हा श्रमाय मथितो मूढैः सुरैः सागरः ५४३

---

* सप्तर्षींचे उत्तरेकडे जे ठळक सात तारे आहेत त्यांतील सहावा वसिष्ठ, त्याच्या शेजारीं अरुंधती बारीक लुकलुकत असते. ही दिसेनाशी झाली ह्मणजे साहा महिन्यांनीं मनुष्य मरतें ही एक लौकिक कल्पना आहे हें आमच्या वाचकांस माहीत असेलच!

" मुख हें पूर्णचंद्र होय, अधरपल्लव हा सुधामय, दांतांची पंक्ति हीं जणूं रत्नेंच होत, शरीरसौंदर्य हें लक्ष्मी होय, गजगति गमनाचे ठायीं आहे, निःश्वासाचे ठायीं पारिजाताचा सुवास अधिष्ठित आहे, वाणी केवळ कामधेनूच आणि कटाक्ष हे कालकूटतुल्य होत;— मग इतकें सर्व आयतें सिद्ध असतां जेव्हां देवांनीं समुद्रमंथनाचा येवढा खटाटोप केला तेव्हां ते मूर्ख नव्हेत?"

इंदुं निंदति चक्रवाकयुगुलं भास्वांनिधिं कौशिकः।
स्वादु क्षीरमरोचकी सुकृतिनं पापी जडः पंडितम्॥
त्यक्तं सर्वजनैः खलः कटुवचा ग्राम्यः पुमान्नागरं ।
कः पैतामहगोलकेऽत्र निखिलैः संमानितो वर्तते ५४४

" चक्रवाकांचा जोडा चंद्रास निंदतो, दिवाभीत सूर्याचा तिरस्कार करतें, ज्याच्या तोंडाला रुचि नाहीं तो मधुर जें दुग्ध त्यास नांव ठेवतो. पापी पुण्यवंताची व मूर्ख पंडिताची निंदा करतो, कटुभाषण करणारा जो खल तो सर्वसंगपरित्याग केलेल्यास दोष देतो आणि गांवढळ मनुष्य शहरवासी पुरुषास वाईट म्हणतो;— तेव्हां या ब्रह्मांडगोलांत सर्वांनीं संमानित असा कोण आहे बरें?"

श्रिया गेहे मयाऽरण्ये रामस्त्यक्तस्त्वया पथि॥
बत मुद्रे पुरंध्रीणां प्रत्ययं कः करिष्यति ५४५

सीता हनुमंतानें खालीं टाकलेल्या मुद्रिकेकडे पाहून खेदानें म्हणते :—

" हे मुद्रे! राज्यलक्ष्मीनें रामाला गृहींच सोडिलें, मीं त्यास वनांत टाकून दिलें, आणि तूं त्यास मार्गांत सोडून आलीस; तेव्हां आतां स्त्रियांवर कोण विश्वास ठेवील?

तुंगपीनकुचकुंभशोभिता—द्रुस्तसश्चलितचेलपल्लवाः ॥
वेणुनादहृतचित्तवृत्तयः। चित्रवच्चलदृशोऽवस्थिरे॥५४६॥

" मुरलीच्या नादानें ज्यांच्या चित्तवृत्ति हरण झाल्या आहेत आणि उत्तुंग व पुष्ट अशा कुचकुंभांवरून स्रस्त झालेल्या पल्लवाचें ज्यास भान राहिलें नाहीं, अशा गोपी चित्रासारख्या तटस्थ उभ्या राहिल्या!"

किं तुतप्तं मया सि मतीच्छ मुग्धे च्युतं सालंकारम् ॥
मुगपाम्यच्युतमेव श्लेषैरेतैर्न मे हानिः॥ ५४७ ॥

" हे मुग्धे ! येवढ्या घाईनें काय चाललीस? हा तुझा दागिना गळून पडला. तरी त्याची तुला शुद्ध नाहीं काय?" ती उत्तर करते " मी मुळीं अच्युताच्या* ध्यानांत आहे: हे दागिने कितीही सांडले तरी मला त्यांची पर्वा नाहीं !"

अहंकारो धियं ब्रूते मा सुप्तं प्रतिबोधय ॥
उदिते परमानंदे न त्वं नाहं न वै जगत् ५४८

" अहंकार बुद्धीस सांगतो कीं, आत्मज्ञानजन्य जो परमानंद त्यास जागा करू नको: तो जागा झाला कीं, मी तूं व जगत् हीं तिन्हीं नष्ट होऊन जातील!"

केचिन्निद्रागताः केचित्कथयंति बहिर्गताः ॥
केचिदंतर्गताः केचित्तो जाने क्व गता इति ५४९

कोणा एकाद्या थोर मनुष्याच्या भेटीला कोणी गरीब मनुष्य गेला असतां त्याची हेटाळणी येणेंप्रमाणें चालते:— " कोणी ह्मणतात, यजमान निजले आहेत; कोणी सांगतात, बाहेर गेले आहेत ह्मणून; कोणी ह्मणतात, आंत कामांत आहेत: आणि कोणी मुळींच कानावर हात ठेवतात!"

सीताचिंताकुले रामे निद्रा निरगमद्रुषा ॥
कथमेकाकिनं जह्यामित्येवं न जहौ निशा ५५०

" रामास सीतेविषयीं चिंतातुर पाहून निद्रा ही मत्सरानें निघून गेली ; आणि रात्रीस वाटलें कीं, हा भगोदरच विरहातुर झाला आहे, तर याला एकट्याला सोडून कसें जावें? ह्मणून तीही जाईना." सारांश, रामास सीताविरहामुळें झोंप येईना व कांहीं केल्या रात्रही जाईना!

देहबुद्ध्या तु दासोऽहं जीवबुद्ध्या त्वदंशकः ॥
तत्त्वबुद्ध्या त्वमेवाहमिति मे निश्चिता मतिः ५५१

कोणी अद्वैतवादी परमेश्वरास ह्मणतो:— " देहबुद्धीनें पाहतां मी तुझा दास आहे, जीवबुद्धीनें पाहतां तुझा अंश आहे. आणि तत्त्वबुद्धीनें पाहतां मी आणि तूं स्वरूपतः एकच आहोंत, असा मी सिद्धांत करून ठेवला आहे!"

---

* 'अच्युत' ह्मणजे 'न सांडलेला', पर्यायें 'कृष्ण'!

हे हेमकार परदुःखविचारमूढ ।
किं मां मुहुः क्षिपसि वारशतानि वन्हौ ॥
दग्धे पुनर्मयि भवंति गुणा तिरेका ।
लाभः परं खलु मुखे तव भस्मपातः ५५२

"हे सुवर्णकारा! तूं परदुःखाविषयीं केवळ निश्चिंत आहेस. तूं मला शंभर दां अग्नींत कां टाकतोस? त्याच्या योगानें काय होतें आहे, कीं माझ्याठायीं अधिकाधिक गुण उत्पन्न होत आहेत, पण तुला स्वतःला लाभ म्हटला म्हणजे तोंडांत राख जात आहे येवढाच काय तो!"

ईशो पदप्रणयभाजि मुहूर्त्तमात्रं ।
प्राणप्रियेऽपि कुरु मानिनि या प्रसादं ॥
जानातु मत्प्रभुरसौ पदयोर्नताना-।
मस्मादृशामिव मनोरथभंगदुःखं ५५३

कोणी कवि लक्ष्मीस म्हणतो:—"प्रभूनें तुझ्या पायांवर मस्तक ठेवलें असतां घटकाभर मन घट्ट करून तूं तसाच कोप धारण कर; असें केलें असतां माझ्यासारख्या भक्तजनांचा मनोरथभंग केला असतां कसें दुःख होतें हें तरी अंमळ राजश्रीस कळूं दे!"

गुणिनि गुणज्ञो रमते नागुणशीलस्य गुणिनि परितोषः॥
अलिरेति वनात्कमलं न दर्दुरस्त्वेकवासोऽपि॥ ५५४॥

"जो गुणज्ञ असतो त्यास गुणिजनांच्या सहवासापासून आनंद होतो; व ज्याला गुणाची परीक्षा नाहीं त्याला त्याची पर्वाही नसते. कसे? तर भ्रमर हा वनांतून कमलाकडे झेंप घेत आदरून येतो; आणि नित्य ज्याचा त्याशींसहवास असा जो मंडूक त्याच्या कधीं ध्यानींमनींही ती गोष्ट येत नाहीं!"

सरसो विपरीतश्चेत्सरसत्वं न मुंचति ॥
साक्षरा विपरीतश्चेद्राक्षसा एव केवलं ५५५

जो सरस (रसिक) आहे तो विपरीत झाला तरी त्याचें सरसत्व जात नाहीं; पण जे नुसते साक्षर ('ज्ञानलव दुर्विदग्ध') आहेत ते विपरीत झाले अस-

तो केवळ राक्षस बनतात!" पण 'सरस' या अक्षरत्रयाचा विपर्यय 'सरस'-हाच होय; व 'साक्षराः' याचा विपर्यय 'राक्षसाः' असा होतो.

उत्कृष्टमध्यमनिकृष्टजनेषु मैत्री।
यद्वच्छिलासु सिकतासु जलेषु रेखा॥
वैरं क्रमाद्धममध्यमसज्जनानां।
यद्वच्छिलासु सिकतासु जलेषु रेखा ५५६.

"उत्तम, मध्यम आणि निकृष्ट लोकांशीं सख्य हें शिळेवर, वाळूवर आणि पाण्यावर काढलेल्या रेघेप्रमाणें आहे; आणि त्यांशीं वैर हें वरच्याच्या विपरीत क्रमाप्रमाणें दृष्टीस पडतें!"

यन्मनीषिपदांभोजरजःकणपवित्रितम्॥
तदेव भवनं नो चेद्भकारस्तत्र लुप्यते ५५७

"जें गृह विद्वज्जनांच्या चरणरजांनीं पवित्रित झालेलें तेंच भवन, नाहीं तर 'भवन' शब्दांतला भकार काढून टाकावा!"

क्व सरसि वनखंडं पंकजानां क्व सूर्यः।
क्व च कुमुदवनाली कौमुदीबंधुरिंदुः॥
चिरपरिचयबंधा प्रायशः सज्जनानां।
नहि विचलति मैत्री दूरतोऽपि स्थितानां ५५८

"सरोवरांत असणारा कमळांचा समुदाय कोठें आणि सूर्य कोठें? कुमुदांचें वन कोणीकडे आणि चंद्र कोणीकडे! तथापि चिरपरिचयाच्या योगेंकरून दृढ झालेली जी सज्जनांची मैत्री ती दूर असल्यानें ही विकार पावत नाहीं!"

अपराधादधिकं मां व्यथयति तव कपटरचनेयम्॥
शस्त्राघातो न तथा सूच्याक्षतवेदना यादृक् ५५९

"तूं माझा अपराध केलास याबद्दल मला इतकें वाईट वाटत नाहीं, पण तुझ्या कपटप्रयोगाचा फार संताप येतो; शस्त्राचा घाव तितकी वेदना देत नाहीं, कीं जितकी वेदना सुईच्या टोंचण्यानें होते!"

पश्यात्र नलिनीपत्रे बलाका परिदृश्यते ॥
हरिन्मणिमये पात्रे शुक्तिकेव प्रतिष्ठिता ५६०

"कमलपत्रामध्यें ही बगळी पहा कशी शोभते आहे, कीं जशी पाचेच्या भांड्यावर शिंप ठेवावी तशी !"

किटिस्तु धरणीधरः कति न संति भूदारकाः ।
गिरिस्तु कनकाचलः कति न संति भूभारकाः ॥
मरुत्तु मलयानिलः कति न संति झंझानिलाः ।
प्रभुस्तु विबुधाश्रयः कति न संति कुक्षिंभराः ५६१

"वराह हाच एक धरणीधर होय, नाहीं तर भूमीस विदारणारे डुकर काय थोडे आहेत? पर्वतांत पर्वत मेरु हाच होय, नाहीं तर भूभारभूत असे पुष्कळ आहेत! मलयानिल हाच वायु होय, नाहीं तर झंझावात काय थोडे आहेत? तसेंच, जो पंडितांस आश्रय देतो तोच प्रभु ह्मणावा; नाहीं तर उदरंभरि राजे पुष्कळ आहेत!"

रवेरस्तं तेजः समुदयति खद्योतपटली ।
मरालाली मूका कलकलमुलूका विदधते ॥
इदं कष्टं दृष्टुं शुचिरसहमानांबुजवती ।
मिलद्भृंगव्याजात्कवलयति हालाहलमहो ५६२

"सूर्याचें तेज अस्तंगत झालें आणि काजव्यांची मंडळी चमकूं लागली, हंसांचें कूजित बंद झालें आणि दिवाभीत शब्द करायाला लागले, ही परम शोचनीय स्थिति न साहून शुद्ध जी कमलिनी ती भ्रमरांच्या मिषानें जणों काय विषप्राशनच करीत आहेशी भासते!"

गतः स कालो यत्रासन् देवाः सेवानुवर्तिनः ॥
दशानन दशां पश्य तरंति दृषदोऽप्सि ५६३

"हे रावणा! ज्याकाळीं प्रत्यक्ष देव हे तुझे सेवक झाले होते तो काळ गेला; आतांच्या काळाचा महिमा पहा, कीं पाण्यावर दगड तरूं लागले आहेत!"

काकैः सह विरुद्धस्य कोकिलस्य कलागिरः ॥

खलसंगेऽपि नैष्ठुर्यं कल्याणः प्रकृतेः कुतः ५६४

" काकांचा आणि कोकिळाचा जरी विरोध आहे तरी कोकिळानें मधुरवाणी टाकली आहे कीं काय? नाहीं. खलांचा संसर्ग घडला असतांही सत्स्वभाव मनुष्य निष्ठुरत्व धारण करीत नाहीं!"

सखे साहजिकं प्रेम दूरादपि विजायते ॥
चकोरीनयनद्वंद्वमानंदयति चंद्रमाः ॥ ५६५ ॥

" हे मित्रा! साहजिक जें प्रेम तें दूर अंतरावरूनही जडतें; पहा. चकोरीच्या नेत्रयुग्मास आकाशस्थ चंद्र आल्हाद देतो!"

किं तया सुमहत्यापि श्रिया देशांतरस्थया ॥
रिपवो यां न पश्यंति सुहृद्भिर्या न भुज्यते ॥ ५६६ ॥

" दूरच्या देशांत असलेल्या संपत्तीचा काय उपयोग? कीं जी पाहून शत्रु झुरत नाहींत आणि मित्र जिचा उपभोग घेत नाहींत!"

सौहार्दस्वर्णरेखाणामुच्चावचभिदाजुषां ॥
परोक्षमिति कोऽप्यस्ति परीक्षानिकषोपलः ५६७

" मैत्रीरूप भिन्नभिन्न स्ववर्णरेखांची परीक्षा करण्याचा एक मोठा उत्कृष्ट निकष आहे; तो कोणता? तर परोक्ष!" म्हणजे कोणाचें आपणावर किती प्रेम आहे हें परोक्ष भाषणावरून तेव्हांच कळतें!

द्यूते पणः प्रणयकेलिषु कंठपाशः ।
क्रीडापरिश्रमहरव्यजनं रतांते ॥
शय्या निशीथसमये जनकात्मजायाः
प्राप्तं मया विधिवशादिदमुत्तरीयं ५६८

" जें सीतेचें उत्तरीय (शेला) द्यूताचे वेळेस पण लावायास उपयोगी पडत असे, प्रणयक्रीडेचे वेळीं जें कंठपाश होत होतें, रतावसानंतर जें श्रमपरिहार करणारें व्यजन होत होतें आणि मध्यरात्रीं प्रसंगवशात् शय्याही होत असे, तें आज मला दुर्दैवें

करून माप्त झालें!"

दातुरापत्ति संप्राप्तौ याचके समुपस्थिते॥
नास्तीति वाग्जीवितयोर्बहिर्निःसरणं रणः ५६९

"याचक याचना करायाला आला आणि दात्याला तर आपत्ति माप्त झालेली, तेव्हां 'नाहीं' ह्मणतांना दात्याच्या जीविताचा आणि वाणीचा झगडा होतो; ह्मणजे वरील शब्द उच्चारणें त्यास मरणप्राय होऊन जातें!"

मौखर्यं लाघवकरं मौनमुन्नतिकारकम्॥
मुखरं नूपुरं पादे कंठे हारो विराजते ५७०

"वाचाळपणा हा लघुत्व आणणारा आहे आणि मौन हें उन्नति देणारें आहे; पहा कीं, निरंतर शब्द करणारीं जीं नूपुरें त्यांचें अधिष्ठान पायांवर आणि मुका जो मौक्तिकहार तो कंठाचे ठायीं धारण केला जातो!"

त्वयि वर्षति पर्जन्ये सर्वे पल्लविता द्रुमाः॥
अस्माकमर्कवृक्षाणां जीर्णे पत्रेऽपि संशयः ५७१

"हे पर्जन्या! तूं वृष्टि केली असतां सारे वृक्ष पल्लवित झाले: पण आह्मी जे अर्कवृक्ष (रुई) त्या आह्मांस जीर्णपत्राविषयीं सुद्धां वानवा!"

जिव्हे प्रमाणं जानीहि भोजने भाषणेऽपि च॥
अतिभुक्तिरतीवोक्तिः सद्यः प्राणापहारिणी ५७२

"हे जिव्हे! भोजन व भाषण या दोहोंतही परिमित असत जा; कां कीं, अतिभोजन व अतिभाषण हीं दोन्हीं तात्काल प्राणहरण करणारीं होत!" ह्मणजे मर्यादा सोडून दोन्हींही केलीं असतां घात होतो!

संचारिणी कांचनवल्लरीव। विद्युल्लता वा पतिता नभस्तः॥
घृतस्य धारा पतिता न जाने। दिवं गता वाथ भुवं गता वा ५७३

कोणी विनोदी कवि तुपाच्या धारेचें वर्णन करतोः— "ही धार इतकी चंचल आहे कीं, जणों काय हलणारी सुवर्णवल्लीच, किंवा आकाशांतून पडलेली विद्युल्-

नाच; शिवाय तिचें रूप इतकें सूक्ष्म आहे कीं, ती पडली केव्हां तीही समजली नाहीं; पला तर असाही भ्रम झाला कीं, ती आकाशांत गुप्त झाली किंवा भूमींत गडप झाली. कोण जाणे!"

नेपथ्यादपि राजते हि नितरां व्यालुप्त भूषाननं।
संभोगश्रममीलितं विजयते चक्षुः कटाक्षादपि॥
गाढालिंगनकौतुकादपि नवं दोर्वल्लिविस्रंसनं।
मत्यालापरसादपि प्रियतरं मौनं कुरंगीदृशः ५७४

"रतिप्रसंगेंकरून ज्याचरची पत्रादिरचना विलुप्त झालेली आहे असें मुख पहिल्यापरीस अधिक खुलतें, संभोगश्रमास्तव निमीलित झालेलीं नेत्रें कटाक्षाहून अधिक शोभा देतात, गाढालिंगनाच्या स्फुरणापेक्षां बाहुद्वयाचें शिथिलत्व हें विशेष रमणीय वाटतें आणि मत्युत्तरापेक्षांही श्रांतताजन्य जें मौन तें प्रियकर होतें!"

सरसिरुहोदरसुरभावधरितबिंबाधरे मृगाक्षि तव॥
वद वदने मणिरदने तांबूलं केन लक्षणाम वयं॥ ५७५॥

"हे मृगनयने! कमलाच्या गाभ्याप्रमाणें सुवासिक आणि तोंडल्याचा गर्व हरण करणारा ज्याचा अधरोष्ठ आहे, तसेंच ज्यांतील दंतपंक्ति रत्नांप्रमाणें झळकते, अशा तुझ्या मुखाचे ठायीं तांबूल आहे कीं नाहीं हें आम्हीं कशावरून ओळखावें?" ह्मणजे तांबूलाच्या योगानें प्राप्त होणारे जे धर्म,—सुवास, अधररक्तिमा, आणि दंतशुभ्रता,— ते तुझ्या ठायीं स्वभावसिद्धच आहेत; तेव्हां अर्थातच तांबूलचर्वण हें पुनरुक्त होय!

गुरुषु मिलितेषु शिरसा प्रणमसि लघुषून्नता समेषु समा॥
उचितज्ञासि तुले किं तुलयसि गुंजाफलैः कनकम्॥ ५७६॥

"हे तुले! गुरूशीं तूं नम्रभाव प्रगट करतेस, लघूंशीं उन्नतेनें वागतेस आणि सामान्यांशीं बरोबरीनें राहतेस, ही तुझी उचितज्ञता प्रशंसा करण्यासारखी आहे खरी; पण गुंजेची आणि सोन्याची तुलना करतेस हें किती असमंजस आहे!"

ग्रंथिलतया किमिक्षोः किमपभ्रंशेन भवति गीतस्य॥
किमनार्जवेन शशिनः किं दारिद्र्येण दयितस्य॥५७७

" ऊंस गांठ्याळ असला ह्मणून काय झालें? गाण्यांत वर्णापभ्रंश झाला ह्मणून माधुर्याची काय हानि आहे? चंद्राची कोर वांकडी असली ह्मणून काय बिघडलें? वल्लभाच्या दारिद्र्यास्तव अनुरक्त स्त्रीचा प्रेमा उडेल काय?"

अप्युन्नमात्प्रलपतो बलाच्च परिजल्पतः॥
सर्वतः सारमादद्यादश्मभ्य इव कांचनं ५७८

" उन्नत भाषण करणारापासून किंवा मोठ्या कष्टानें जो बोलतो त्यापासून सार काढून घेत असावें; कसें? तर दगडांतून सोनें काढतात त्याप्रमाणें!"

किंपुष्पं किं फलं चास्य करीरस्य महात्मनः॥
येन वृद्धिं समासाद्य न कृतः पत्रसंग्रहः ५७९

" या महात्म्या करीराची काय थोरवी सांगावी? कीं ज्यानें वृद्धीसमयीं नुसता पत्रांचाही संग्रह केला नाहीं; मग पुष्पाची किंवा फळाची गोष्ट तर दूरच!"

पुराणांते श्मशानांते मैथुनांते च या मतिः॥
सा मतिः सर्वदा चेत्स्यात्को न मुच्येत बंधनात् ५८०

" पुराणश्रवणानंतर, श्मशानयात्रेच्या नंतर आणि मैथुनावसानीं जी मनाची स्थिति होते ती जर सदोदित राहील, तर संसारबंधनापासून कोण मुक्त होणार नाहीं?"

दूरस्थाः पर्वता रम्या वेश्या च मुखमंडने॥
युद्धस्य वार्त्ता रम्या च त्रीणि रम्याणि दूरतः ५८१

" डोंगर दुरून साजरे, वेश्येचें रमणीयत्व नेवढें चेहेरेपट्टीवर पाहून घ्यावें, आणि युद्धाची वार्त्ता मात्र रम्य; या तिहींचा साक्षात् प्रसंग करण्याच्या भरीस कोणी पडूं नये!"

न स्वल्पमप्यध्यवसायभीरोः करोति विज्ञाननिधिर्गुणं हि॥

अंधस्य किं हस्ततलस्थितोऽपि। प्रकाशयत्यर्थमिह प्रदीपः ५८५

"ज्याला कृति करून दाखविण्याचा दम नाहीं त्याच्यापाशीं केवळ ज्ञानाचें मोठें कोठारही जरी असलें तरी त्यापासून कांहीं निष्पन्न होणार नाहीं. पहा कीं. अंधळ्यानें आपल्या हातावर जरी दिवा घेतला असला तरी त्यापासून त्यास पदार्थ-दर्शन होणार आहे काय?"

अजनमरुतः श्वासश्रेणीमिमामुपचिन्वते।
मलयजरसो धाराबाष्पं प्रपंचयितुं प्रभुः॥
कुसुमशयनं कामास्त्राणां करोति सहायतां।
द्विगुणगरिमा कामोन्माथः कथं नु विरंस्यति ५८६

"विंझण्याचा वारा हा निश्वाससंतानास वाढवितो. चंदनाचा रस हा अश्रुधारां-ची वृद्धि करतो आणि पुष्पशय्या ही कामायुधांस साह्य मात्र होते; मग अशा यो-गानें कामाची बाधा ही दुणावली असतां ती दूर कशी व्हावी?"

आदाय वारि परितः सरितां मुखेभ्यः।
किं तावदर्जितमनेन दुरर्णवेन॥
क्षारीकृतं च वडवादहने हुतं च।
पातालकुक्षिकुहरे विनिवेशितं च ५८७

"चोहोंकडून नद्यांच्या मुखांपासून जलौघ घेऊन दुष्ट समुद्रानें काय मिळवि-लें बरें? येवढें मात्र केलें कीं, मूळचें गोडें पाणी होतें तें खारट करून टाकलें, कां-हीं वडवाग्नीच्या मुखीं घातलें आणि कांहीं पाताळाच्या खबदाडींत ठेवून दिलें!"

शक्रादरक्षि यदि पक्षियुगं तथापि।
मैनाक संति तव नेह गतागतानि॥
निःसत्त्वता च निरपत्रपता च किंतु।
पाथोनिधौ निवसता भवतार्जितानि ५८८

"हे मैनाका! तुला समुद्रानें आपल्या पोटांत घेतल्यामुळें तुझ्या पंखाचा बचाव झाला हें खरें; पण पूर्वीप्रमाणें आतां तुला आकाशांत संचार कोठें करतां येतो आहे?

त्याप्रमाणेंच सागराश्रय केल्यानें तुझें दुर्बलत्व व निर्लज्जत्व जगत्प्रसिद्ध झालें हें तूं कसें जाणत नाहींस ?

तृषां धरायाः समयत्यशेषां। यः सोऽंबुदो गर्जति गर्जतूच्चैः॥
यस्त्वेष कस्यापि न हंति तृष्णां। स किं वृथा गर्जति निस्त्रपोऽब्धिः ५८९

"जो मेघ पृथ्वीची सारी तृषा शमवितो तो गर्जतो हें ठीकच आहे, तो खुशाल मोठ्यानें गर्जना करो: पण जो अदृत्त कोणाचीही तहान भागवीत नाहीं तो समुद्र निर्लज्जाप्रमाणें व्यर्थ गाजतो हें काय?"

क्रौंचः क्रीडतु कुर्दतां च कुररः कंकः परिष्वज्यतां।
मद्गुर्माद्यतु सारसश्च रसतु मोड्डीयतां टिट्टिभः॥
भेकाः संतु बका वसंतु चरतु स्वच्छंदमारिस्तटे।
हंहो पद्मसरः कुतः कतिपयैर्हंसैर्विना श्रीस्तव ५९०

"हे पद्मसरोवरा! तुझे ठायीं क्रौंच हा क्रीडा करो, कुरर खिदळो, कंक तुला आलिंगन देवो, मद्गु तुझ्या उदकाचें सेवन करून मत्त होवो, सारस शब्द करो, टिट्टिभ उडो, बेडूक व बगळे हे तुझ्या आश्रयानें असोत व आरि हा तुझ्या तीरा स्वच्छंदेंकरून विहार करो; पण हें सर्व असूनही कांहीं हंस जर तुझ्याजवळ नाहींत तर तुला कोठली शोभा?"

यावद्यावद्भवति कलया पूर्णकामः शशांक-।
स्तावत्तावद् द्युतिमयवपुः क्षीयते सा मृगाक्षी॥
मन्ये धाता घटयति विधुं सारमादाय तस्या-।
तस्माद्यावन्न भवति सखे पूर्णिमा तावदेहि ५९१

"चंद्राची एकेक कळा जों जों वाढत जाते तों तों मृगनयनेच्या कांतिमय शरीराचा ऱ्हास होतांना दृष्टीस पडतो, यावरून असें वाटतें कीं ब्रह्मदेव हा तिच्या शरीरलावण्यापासून चंद्रास निर्माण करतो; तर हे मित्रा! जोंवर पूर्णिमा दूर आहे तोंवर तूं तिला जाऊन भेट!"

संचारो रतिमंदिरावधि सखीकर्णावधि व्याहृतं।
चेतः कांतसमीहितावधि महामानोऽपि मौनावधि॥

हास्यं चाधरपल्लवावधि पदन्यासावधि प्रेक्षितं ।
सर्वं मावधि नावधिः कुलभुवां प्रेम्णः परं केवलं ५९२

"कुलस्त्रियांचा संचार म्हटला म्हणजे पतिमंदिरापर्यंत, भाषण सखीच्या कानीं पडे तोंपर्यंत, मनाचा व्यापार पतिवांछित जाणण्यापर्यंत, अनिच्छापित मान म्हटला म्हणजे मौनधारण, हसणें अधरपल्लवावेरी आणि पाहणें पाऊल टाकण्या-पर्यंतः एका गोष्टीस मात्र त्यांच्या ठायीं मर्यादा नाहीं, ती गोष्ट कोणती? तर पति-विषयक प्रेम!"

सत्यमेव गदितं त्वया विभो। जीव एक इति यत्पुरावयोः॥
अन्यदारनिहिता नखव्रणा-न्यावके वपुषि पीडयंति मां ५९३

"हे प्राणनाथा! आपण जें मला सांगितलें कीं तुझा व माझा देह हे एकच आ-हेत हें सर्वथा खरें आहे. यास प्रत्यंतर पहा कीं, अन्य स्त्रीनें आपल्या शरीरास केले-ली नखक्षतें तिसऱ्या ठिकाणीं मला येऊन टोंचतीं!"

विप्रियमप्याकर्ण्य ब्रूते प्रियमेव सर्वदा सुजनः ॥
क्षारं पिबति पयोधेर्वर्षत्यंभोधरो मधुरमंभः ५९४

"सज्जन पुरुष अप्रिय भाषण श्रवण करूनही नेहमीं प्रियच बोलत असता-तः ज्याप्रमाणें मेघ हा समुद्रातें क्षारोदक पीऊन मधुर जलाचाच वर्षाव करतो!"

मेरुर्दूरगतो महान् हिमगिरिः प्रालेयमाच्छोऽभवत्।
चंद्रः श्रीसहितोऽपि याचकभयात्क्षीणत्वमालंबते॥
कौपीनं धृतवान् हरोऽपि सहसा विष्णुर्जले संस्थितो।
वारां राशिरपेयतामुपगतः को नाम दातुं क्षमः ५९५

"मेरु याचकांस भिऊन दूर सरला, हिमालय हिमाच्छादित होऊन बसला, चंद्र हा लक्ष्मीयुक्त खरा, पण तोही वरील भयानें क्षीण झाला, शिवानें कौपीन धा-रण केलें. विष्णु पाण्यांत जाऊन दडला आणि समुद्र हा अपेय झाला, तेव्हां आ-तां दाता उरला तरी कोण?"

कृष्णा ते कचसंहतिरंबुजनयने तथाधरः शोणः ॥

त्वं स्मरतरंगिणी कथमभितस्तापी न ते वियोगः स्यात् ५९६

" हे कमलनयने! तुझी वेणी ही कृष्णा ( नदीविशेष; पक्षीं, काळी ) आहे; तुझा अधरोष्ठ हा शोण ( नदविशेष; पक्षीं. आरक्त)आहे आणि तूं स्वतः सुरतरंगिणी-(देवनदी; पक्षीं, कामिनी ) आहेस; मग तुझा वियोग हा तापी ( नदविशेष; पक्षीं ताप देणारा ) कसा नसेल ? "

स्निग्धमालप सुरूक्षमेव वा। त्वत्कथैव सखि मे रसायनम्॥
शीतलं सलिलमुष्णमेव वा। पावकं हि शमयेदसंशयम् ५९७

" हे सखि! तूं गोड बोल किंवा कठोर भाषण कर; तुझें भाषण हेंच मला आल्हाद देते. पहा कीं, उदक हें थंड असो अगर ऊन असो, तें अग्नीचा उपशम करणारच!"

स्मरमध्ये वाग्भंगैर्वचनविधिमंगी कुरु न वा ।
स्मितज्योत्स्नाकांतं कुरु वदनमेतन्मयि न वा ॥
त्रिलोकीमूर्द्धन्या यदि विविध पुण्याधिकतया ।
मया दृष्टासि त्वं तदिह सफलं मेऽजनि जनुः ५९८

" हे सिंहमध्ये! तूं कुटिलोक्तीचें भाषण कर अथवा न कर; किंवा मजकडे पाहून स्मितचंद्रिकेनें विराजमान असें मुख कर किंवा करूं नको; माझें जन्म येवढ्यानेंच सफळ झालें, कीं त्रैलोक्यांत सौंदर्यानें श्रेष्ठ अशी जी तूं ती माझ्या विविध पुण्यांच्या कमाईनें आज माझ्या दृष्टीस पडलीस!"

भानुबिंबमिदमस्तगामि च। मोदयत्कुमुदबंधुमंडलम् ॥
दृश्यते रतिपतेः प्रवासिनां। क्रोधरक्तमिव लोचनद्वयम् ५९९

"एकीकडे अस्तास जाणाऱ्या सूर्याचें बिंब व दुसरीकडे उदय पावणारें चंद्रबिंब दिसत आहे; हीं प्रवासिजनांस रतिपतीचीं दोन आरक्त झालेलीं नयनेंच काय असीं भासतात ! "

सहते वारवातपातानाजानेयः कशां नैव ॥
सहते विपत्सहस्रं मानी नैवापमानलेशमपि ६००

"जातिवंत घोडा हा रणांगणावर शेंकडों बाणांचे घाव सहन करतो, पण चाबकाचा फटकारा त्यास बिलकुल सहन होत नसतो; तसेंच जो मानी आहे तो हजारों विपत्तींस दाद देत नाहीं, पण कोणाचें फट म्हटलेलें त्यास खपत नाहीं!"

दृढतरगलकनिबंधः कूपनिपातोऽपि कलश ते धन्यः॥
यज्जीवनदानैस्त्वं तर्षामर्षं नृणां हरसि॥ ६०१ ॥

"हे कलशा! तुझ्या मानेला फांस लावून लोक तुला विहिरींत टकलून देतात असें जरी आहे तरी तूं धन्य आहेस; कां कीं तृषेनें पीडलेल्यांस तूं जीवनाचें दान करतोस!"

प्राप्य प्रमाणपदवीं को नामास्ते तुलेऽवलेपस्ते ॥
नयसि गरिष्ठमधस्तात्तदितरमुच्चैस्तरां कुरुषे॥ ६०२॥

"हे तुले! तुला सर्व लोक प्रमाण समजूं लागले येवढ्यानें तुझ्या अंगीं हा केवढा ताठा आला पहा! कीं वजनदारांचें पारडें खालीं बसवून हलक्यास तूं उंच पदवीला पोंचवितेस!"

को हि तुलामधिरोहति शुचिना दुग्धेन सहजमधुरेण॥
तप्तं विकृतं मथितं तथापि यत्स्नेहमुद्गिरति॥ ६०३॥

"स्वभावेंकरून मधुर जें दुग्ध त्याची सर कोणास येणार आहे? पहा कीं, त्यास तापविलें, त्यांत विरजण घातलें, त्याचें मथन केलें, तरी शेवटीं काय? स्नेहाचा (लोण्याचा) च आविर्भाव करतें!"

जगति विदितमेतत्काष्ठमेवासि नूनं ।
तदपि च किल सत्यं कानने वर्धितोऽसि ॥
नवकुवलयनेत्रीपाणिसंगोत्सवेऽस्मिन् ।
मुसल किसलयं ते तत्क्षणाद्यन्न जातं ६०४

"हे मुसळा! साऱ्या जगास माहितच आहे कीं तूं काष्ठ आहेस, शिवाय तूं मुळींच अरण्यांत वाढलेलें आहेस; तेव्हां या नवकुवलयनेत्रीच्या करस्पर्शाचा महालाभ तुला झाला असतां तुला जे तत्क्षणीं अंकुर फुटले नाहींत तें ठीकच आहे!"

भेकेन क्वणता सरोषपरुषं यत्कृष्णसर्पानने।

दातुं कर्णचपेटमुज्झितभिया हस्तःसमुल्लासितः॥
यच्चाधोमुखमक्षिणी विदधता नागेन तूष्णीं स्थितं।
तत्सर्वं विषमंत्रिणो भगवतः कस्यापि लीलायितं ६०५

"कृष्णसर्पावर रागानें जळफळून व त्यास टाकून बोलून त्याच्या मुसकाडींत देण्याकरतां बेडकानें जो बेलाशक आपला पंजा वर उचलला आणि अशा समर्थी नागानें खालीं मान घालून डोळे मिटून वरील प्रकार जो सहन केला,— हें सर्व हे महामांत्रिका! तुझ्या अद्भुत सामर्थ्यानें फल होय!"

तृषार्त्तैः सारंगैः प्रति जलधरं भूरि विरुतं।
घनैर्मुक्ता धारा सपदि पयसस्तान् प्रति मुहुः॥
खगानां के मेघाः क इह विहगा वा जलमुचा-
मयाच्यो नार्त्तानामनुपकरणीयो न महतां ६०६

"तृषार्त्त झालेल्या पक्ष्यांनीं मेघाकडे पाहून फार आक्रोश केला आणि मेघांनींही त्यांजवर दया करून जळधारांनीं त्यांचा संताप शमविला; आतां वस्तुतः पाहतां मेघ हे पक्ष्यांचे कोण व मेघाचे पक्षी हे कोण? पण जे दुःखित होतात त्यांस सर्वांपाशीं याचना करणें आहे व थोर आहेत त्यांस उपकार करतांना आप्त किंवा अनाप्त हा कांहीं एक विचार नसतो!"

शिला बाला जाता चरणरजसा यत्कुलशिशोः।
स एवायं सूर्यः सपदि निजपादैर्गिरि शिलाम्॥
स्पृशन् भूयो भूयो न खलु कुरुते कामपि वधूं।
कुले कश्चिद्धन्यः प्रभवति नरः श्लाघ्यमहिमा ६०७

"ज्या सूर्याच्या कुलांत उत्पन्न झालेल्या एका कुमारानें आपल्या पादस्पर्शें करून शिलेची स्त्री केली, तो नित्य प्रतिपर्वतावर पादन्यास करून भ्रमण करीत असतो, पण अद्याप त्याच्या प्रभावानें एकही स्त्री बनली नाहीं;— तेव्हां हें च खरें कीं एकाची सर दुसऱ्याला येत नाहीं; नांव करून जाणारा असा पुरुष एकेक कुलांत एकेकदांच होऊन जातो!"

दीप्यंतां ये दीप्ये पतिता मणयश्च वीरपुरुषाश्च॥
तेजःस्वविनाशाय तु भवति तृणानामिव लघूनां ६०७

" जसे रत्नदीप प्रकाशार्थ निर्माण केलेले असतात त्याप्रमाणें जे वीर्यसंपन्न पुरुष आत्मप्रभाव गाजवण्याकरतां या भूलोकावर सृष्टिकर्त्यानें पाठविलेले असतात ते आपलें शौर्य प्रगट करीत; पण त्यांचें पाहून हलक्यानें आपली पर्दुमकी दाखवूं पाहणें हें पेटलेल्या गवताप्रमाणें आहे,– केवळ आत्मविनाश हेंच त्याचें फळ!"

शमयति गजानन्यान् गंधद्विपः कलभोऽपि सन्।
भवति सुतरां वेगोदग्रं भुजंगशिशोर्विषम्॥
भुवमधिपतिर्बालावस्थोऽप्यलं परिरक्षितुं ।
न खलु वयसा जात्यैवायं स्वकार्यसहो भर: ६०९

" गंधगज हा तरुण असतांही इतर हत्तींचा पराभव करतो, त्याप्रमाणेंच नागाच्या पोराचें विष वेगंकरून तीव्रतर असतें; तेव्हां यावरून स्पष्ट आहे कीं राजा हा बाल्यावस्थेंत असला तरी त्याच्या अंगीं पृथ्वीचा भार पाळण्याचें सामर्थ्य असतें तें वयेंकरून प्राप्त होत नसतें, तर हा जातिगुणच समजायाचा!"

जिह्वैकैव सतामुभे फणवतां स्रष्टुश्चतस्रश्च ता-।
स्ताः सप्तैव विभावसोर्नियमिताः षट्कार्त्तिकेयस्य च॥
पौलस्त्यस्य दशाभवन् फणिपतेर्जिह्वासहस्रद्वयं।
जिह्वालक्षशतैककोटिनियमो नो दुर्जनानां मुखे ६१०

" सज्जनांस जिव्हा एकच असते, सर्पांस दोन असतात, ब्रह्मदेवास चार आहेत, अग्नीस सात व कार्तिकस्वामीस साहा आहेत, रावणास दहा होत्या आणि शेषास दोनहजार आहेत; पण दुर्जनांच्या तोंडांत किती लक्ष, किंवा कोटी आहेत याचा कांहींच नेम सांगवत नाहीं!"

यः पृष्ठं युधि दर्शयत्यरिभटश्रेणीषु यो वक्रता-।
मस्मिन्नेव बिभर्ति यश्च किरति क्रूरध्वनिं निष्ठुरः॥
दोषं तस्य तथाविधस्य भजतश्चापस्य गृह्णन् गुणं।
विख्यातः परमेष एव नृपतिः सीमा गुणग्राहिणां ६११

" हे राजा! तुझ्या गुणग्राहकत्वाचें काय वर्णन करावें? पहा, हें तुझें धनुष्य युद्धाचेठायीं शत्रूवीरसमुदायास आपली पाठ दाखवितें, तुझेच ठायीं आपलें वक्र

ल प्रगट करतें आणि निष्ठुर होत्सातें क्रूरध्वनि करतें; पण तें असें दोषयुक्त ( पक्षीं, भुजांचा आश्रय करणारें ) असतांही त्याचा तूं गुण ( पक्षीं, दोरी ) ग्रहण करतो-स!"

नालिंगंति कुचद्वयं भवदिभप्रोत्तुंगकुंभद्वय-।
त्रासाद्वेणिलतासु नैव दधति प्रीतिं नवासिभ्रमात्॥
भ्रूभंगान् भवदीयदुर्धरधनुर्भीत्या भजंते न ते।
वैरिक्षोणिभुजो निजांबुजदृशां भूमंडलाखंडल ६१२

"हे पृथ्वींद्रा! तुझे शत्रु तुझ्या हत्तींच्या उंच गंडस्थळाच्या भ्रमानें आपल्या स्त्रियांस आलिंगन करीनातसे झाले, तुझ्या खड्गाच्या भ्रमानें त्यांस स्त्रियांच्या कबरीभाराकडे पाहण्याची प्रीति वाटूं लागली आणि तुझ्या भयंकर धनुष्याच्या भ्रांतीनें त्यांस स्त्रियांच्या भ्रुकुटि भयप्रद होऊं लागल्या आहेत!"

मधुरमिव वदंति स्वागतं भृंगनादै-।
र्नतिमिव फलनम्रैः कुर्वतोऽमी शिरोभिः॥
ननु ददत इवार्घं पुष्पवृष्टिं किरंतः ।
कथमतिथिसपर्यां शिक्षिता शाखिनोऽपि ६१३

"हे आश्रमवृक्षही अतिथींची पूजा करावयास शिकले आहेत काय! पहा हे भृंगाच्या गुंजारवानें जणूं काय मधुर भाषणयुक्त स्वागत करतात, फलांनीं नम्र झालेल्या माथ्यांनीं हे जसे काय नमन करतात आणि पुष्पवृष्टीच्या मिषानें अर्घ्यप्रदानच करिनाहेतसे दिसतात!"

मकरीविरचनभंग्या राधाकुचकलशपीडनव्यसनी॥
ऋजुमपि रेखां कुंपन् बल्लववेषो हरिर्जयति॥ ६१४॥

"पत्रावलीची विरचना करण्याच्या मिषानें राधेच्या कुचपीडनाविषयीं लालस आणि सरळरेषा आली असतांही ती मोडून टाकणारा, असा बल्लवरूपी हरी जय पावतो!"

कल्लोलिस्फूर्जदंभोधर विपुलतडिद्दंभगंभीरनादै-।
रंभः संभारसंभावनकुतुकिकुलं चातकानां मनुत्यन्॥
ऊर्ध्वं विन्यस्तचंचूपुटमुपरि परिभ्राम्यदुत्तानवातै-।

रंभो दोन्मुक्तमंभः कणमपि न चिरात्प्राप्य नम्रं भियोऽभूत् ६१५

" मेघांचा गडगडाट व विजांचा चमचमाट पाहून चातकसमुदायास मोठी आशा उत्पन्न झाली कीं आतां जलवृष्टीची रगाईच रगाई होऊन जाईल; यास्तव ते उड्डं बागडूं लागले व वर आपल्या चोंचा करून झंझावाताबरोबर मिसळून भ्रमण करूं लागले; पण सरते शेवटीं मेघांपासून बिचाऱ्यांस एकही जलकण न मिळाल्यामुळे ते होऊन लज्जायमान होत्साते सर्व जागच्याजागीं चीप बसले !"

पततु नभसो गच्छत्वस्तं निमज्जतु वारिधौ।
व्रजतु वरुणागारद्वारं प्रभाभिरनादृतः॥
तदपि तरणिर्दत्वा पादं शिरःसु महाभृतां।
दलिततिमिरव्रातः प्रातः पुनः सकुदेष्यति ६१६

" सूर्य हा आकाशापासून पतन पावो, अस्तास जावो, समुद्रांत बुडो किंवा निष्प्रभ होत्साता वरुणगृहाच्या द्वारीं जावो; तरी येवढें निश्चित आहे कीं, तो अंधकारसमूहाचा नाश करून व पर्वतांच्या शिखरांवर पाय ठेवून पुनः उदयास येणार !"

पक्षद्वंद्वविराजितोऽहममलं मीनान् प्रसेवे सदा ।
पुष्टांगः स कलादिभिः परिवृतश्चंद्रः समः किं मम ॥
सर्वस्थाणुशिरोगतोऽहममलं चंद्रं बको हासते ।
मात्सर्येण दुरात्मकोऽपि सुजनं दृष्ट्वा सदा हासते ६१७

" मी चंद्राप्रमाणें पक्षद्वयानें ( दोन्ही अर्थ उघडच आहेत ) विराजमान आहें, मी नेहेमीं मीनराशि ( मत्स्यसमूह; पक्षीं, राशिविशेष ) भोगीत असतों, शिवाय मी पुष्टांग आहें आणि चंद्राला तर कळा लागतात ( नेहेमीं न्यूनाधिक होत असतो ), मग चंद्र माझी बरोबरी कशी पावेल? तसेंच मी सर्व स्थाणूंच्या ( वृक्षांचीं खोडें: पक्षीं, शिव ) शिखरीं वास करतों;— याप्रमाणें स्वच्छ जो चंद्र त्यास बगळा हा हासतो! सारांश, दुर्जन हा मत्सरभावानें भलत्याशींच बरोबरी करून त्याचा उपहास करीत असतो!"

समाप्त.

# किताबखान्यांत

## खालीं लिहिलेलीं पुस्तकें मिळतील.

| पुस्तक | रु. आ. पै. |
|---|---|
| परशुरामपंत भाऊ पटवर्धन यांचें चरित्र. | १ |
| संस्कृत कविपंचक कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं केलें तें— | |
| दंडी, कालिदास, सुबंधु, बाणभट्ट प्रत्येकास | ०६ |
| भवभूति | ०८ |
| थोर पुरुषांचे आणि स्त्रियांचे पवाडे. | १०८ |
| अनंतफंदीकृत लावण्या | ०८ |
| घाशिराम कोतवाल | १ |
| सुगमार्थदर्श व्याख्या कालिदास कृत रघुवंश सर्ग दुसरा; शिकण्यास सुलभ होण्यास्तव कै० परशुरामपंत तात्या यांनीं तपासून छापविला | ०१० |
| विनोदमहदाख्यायिका | ०१२ |
| शिष्यजनविलाप आणि विष्णुनिधन काव्य | ०४ |
| विष्णुगुणादर्श | ०२ |
| विष्णुविरहशतक | ०२ |
| मुंबई इलाख्याचा नकाशा | ०२०६ |
| हिंदुस्थानचें भूगोलपत्रक | ००९ |
| मुंबई इलाख्याचें भूगोलपत्रक | ००९ |
| मराठी नकाशाचें पुस्तक ( नकाशे १२ रंगविलेले ) | १—०४ |
| निबंधमालेंतील सुभाषित | ०१४ |
| मुक्तामाळा | ०४ |
| चातुर्य आणि मनोरंजन | ०५ |
| मनुष्याचें कर्तव्यकर्म. | ०२०६ |

# सुभाषितांचें

## शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | श्लोक. | अशुद्ध. | शुद्ध. | पृष्ठ. | श्लोक. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | १२ | चंडद्युतिः | चंडद्युतिर् | १६ | १२ | शिक्षितां | शिक्षिता |
| १ | १८ | कोणीं | कोणी | १७ | शेवटीं | जेतव्य मनयोः | जेतव्यमनयोः |
| २ | १ | आहें | आहे | | | केन न जाते | केन न जाने |
| २ | २१ | धडपणी | धडपणीं | | | | |
| ३ | ५ | कोणींच | कोणीच | १९ | १५ | निदेमी | नेदेमीं |
| ३ | ११ | ते | तें | १९ | २२ | मीन· | मीनः |
| ३ | १३ | वाक्यारूप्यांचो- | वाक्यारूप्याचो- | १९ | २३ | पर्णाशनः | पर्णाशनो |
| | | पकारेऽपि | पकारेऽपि | १९ | २४ | खरीं | खरी |
| ३ | १५ | करणारे | करणारें | २० | ४ | कांय? | काय? |
| ४ | २१ | पांचेचे | पाचेचे | २० | ४ | शिवायं | शिवाय |
| ४ | २४ | घानस्नान | धानस्नान | २० | ८ | काहीं | कांहीं |
| ४ | २५ | मही भृत् | महीभृत | २० | १८ | अन्यदेहविलम्ब | मन्यदेहविलम्ब |
| ५ | १० | कवी | कवि | | | त्वशिनापात् | त्वगनापात् |
| ५ | १५ | कवीं | कवि | २० | २० | कोणी | कोणीं |
| ६ | २ | सिंहाचे | सिंहाचें | २० | शेवटीं | अलं- | अलंकार होय |
| ७ | ६ | कवी | कवि | २१ | १६ | अर्थान् | अर्थात् |
| ७ | १३ | कवी | कवि | २२ | १ | कोणी | कोणीं |
| ८ | १४ | कोणीं | कोणी | २३ | १४ | कठीण | कठिण |
| ९ | ६ | असमसिद्धचं | असमसिद्धच | २३ | २१ | पडले | पडलें |
| ९ | २१ | कोणी | कोणीं | २४ | १३ | हरि | हरिः |
| १० | ७ | फेंकलीं | फेंकली | २५ | १० | पायांशी | पायांशीं |
| ११ | २ | धार्मिक | धार्मिक | २५ | ११ | कांही | कांहीं |
| १२ | ११ | सरोवरांशीं | सरोवराशीं | २५ | ११ | कानांशी | कानांशीं |
| १२ | २० | जाणें | जाणे | २५ | १२ | कानाशीं | कानांशीं |
| १४ | २१ | सुरामत्त कळहः | सुरामत्तकलहः | २५ | १२ | काडीगोडाची | काडीगांडाचीं |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध | पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २५ | १३ | शेवटी | शेवटीं | ४२ | १६।१७ | नेहेमी | नेहेमीं |
| २६ | २१ | जहास. | जहाम | ४३ | १७ | नेहेमी | नेहेमीं |
| २७ | २१ | कर्णो | कर्णौ | ४३ | १८ | नेहेमी | नेहेमीं |
| २८ | ६ | उघडी | उघडीं | ४५ | १३ | वाग्वादश्चार्थ | वाग्वादश्चार्थ |
| | | | | | | संबंध: | संबंध: |
| २८ | २० | कृष्ण | कृष्ण: | | | | |
| २८ | २१ | पिक काकयो: | पिककाकयो: | ४६ | १० | कपोतिकाऽकु- | कपोतिकाऽकु- |
| २९ | ३ | अंगुल्या: | अंगुल्या | | | नलया | लनया |
| २९ | १६ | ठायी | ठायीं | ४६ | ११ | दृष्ट | दृष्ट |
| ३० | २ | ठिकाणी | ठिकाणीं | ४६ | १२ | तेनाहत: | तेनाहतस् |
| ३० | ११ | नावेचे | नावेचें | ४६ | १५ | नाही | नाहीं |
| ३० | १४ | नेहेमी | नेहेमीं | ४६ | २२ | सज्जनांचीच | सज्जनांचीच |
| ३१ | २ | नलिनी | नलिनीं | ४६ | शेवटीं | पाप तापंच | पाप तापंच |
| ३१ | ३ | कमळे | कमळें | ४७ | १ | पानकाचे | पानकाचें |
| ३१ | १० | आहे | आहें | ४७ | ९ | नहमीं | नेहेमीं |
| ३१ | १५ | ।।। | । | ४७ | २१ | दुर्दशा | दुर्दशा |
| ३२ | १५ | वैदेहेति | वैदेहीति | ४८ | ३ | चौरै: | चोरा: |
| ३२ | १८ | कोणीं | कोणी | ४९ | १४ | बुधो | बुधो |
| ३२ | १९ | मी | मीं | ५० | १ | फेकलेला | फेंकलेला |
| ३२ | २० | फुलानीं | फुलांनीं | ५० | १० | तुझे | तुझें |
| ३७ | १६ | स्कवर्णाचें | स्कवर्णाचे | ५१ | ४।५ | पट्टव:।तस्मातर् | पट्टवस्तस्मातर् |
| ३८ | १८ | सान्द्रसिंदूरजि- | सान्द्रसिंदूरजि- | ५१ | १६ | राहावे | राहावें |
| | | त्वया | त्वया | ५१ | शेवटीं | दुर्दशा. | दुर्दशा कविनो |
| ३९ | ११ | केस | केंस | | | | त्याप्रमाणें. |
| ४० | १० | केस | केंस | ५२ | ६ | मुरारी | मुरारि |
| ४० | २२ | तुझे | तुझें | ५२ | ७ | भारवी | भारवि |
| ४० | शेष | पंडितांनी | पंडितांनीं | ५३ | ३ | मसगीं | मसंगीं |
| ४१ | १ | ध्येनांगतद्येऽपि | ध्येनांगतद्येऽपि | ५४ | ४ | रविपादैरनधि-ष्ठित: | रविपादैरनधि-ष्ठित: |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध | पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ५४ | ८ | माज्ञाये | आज्ञायाये | ७७ | २२ | ढेकूण | ढेकूण |
| ५४ | १८ | द्विजिव्हो | द्विजिव्हः | ७८ | शेवटीं(टी) | भधिपत्य | आधिपत्य |
| ५५ | ३ | मारखे | मारखें | ७९ | २ | आवरतान | आंवरतान |
| ५६ | २ | द्वारे | द्वारि | ७९ | १४ | वत्साचें | वत्सांचें |
| ५६ | ९ | बहिस्थीयतां | बहिःस्थीयतां | ७९ | २१ | माझ्या | माझ्यां |
| ५७ | १ | तमोरुभिदिनं | तमोभिरुदिनं | ८० | १७ | पंचैनेऽतिपवि- | पंचैनेऽतिपवि- |
| ५७ | ४ | श्रेष्ठानीं | श्रेष्ठांनीं | | | त्रकः | त्रकाः |
| ५७ | १७ | मीं | मीं | ८१ | ११ | बांलाविलें | बांलाविलें |
| ५८ | १४ | मीमासानिपुणं | मीमांसानिपुणं | ८१ | १७ | पांड्यांचें | पांड्यांचें |
| ५९ | २० | पांवळाची | पांवळांचीं | ८१ | १८ | दोन्ही | दोन्हीं |
| ५९ | २१ | मोनी | मोनीं | ८२ | ३।४ | स्त्रियांचीच | स्त्रियांचीच |
| ५९ | २३ | अर्थात् | अर्थात् | ८२ | ६ | निष्ठेचेन् | निष्ठेचेन् |
| ६० | १ | बापाशी | बापाशीं | ८३ | १ | वंचु | वंचु |
| ६० | १६ | नपनाय | पननाय | ८३ | ५ | चोंचानून | चोंचीनून |
| ६३ | २१ | केस | केश | ८४ | ७ | कुचनदी | कुचनदीं |
| ६६ | ६ | धम्मीलच्युत | धम्मिल्लच्युत | ८५ | १६ | भोठाची | भोंठाची |
| ६७ | २०।२१ | उपायानीं | उपायांनीं | ८५ | २२ | स्त्रियाप्रमाणें | स्त्रियांप्रमाणें |
| ६७ | २२ | ने | नें | ८५ | २४।२५ | कवीप्रमाणें | कविप्रमाणें |
| ६९ | २३ | प्रणामांतः | प्रणामांतं | ८६ | ८ | सुमहोनयोत्सवो | सुमहानयोत्सवो |
| ७० | ६ | कठीण | कठिण | ८८ | ७ | ठायी | ठायीं |
| ७० | ९ | ठायी | ठायीं | ८८ | १६ | भाठी | भांठी |
| ७० | १३ | च्छंद्सा | छंद्सा | ८८ | २१ | मा न | मान |
| ७० | शेवटीं | करने | करनें | ८८ | २२ | सततमहिमिभां | सततमहिमिभां |
| ७२ | १५ | पांपरी | पांपरी | ८८ | २८ | [illegible] | [illegible] |
| ७५ | ३ | पुसां | पुसां | ८९ | १५ | टेंकून | टेंकून |
| ७५ | १२ | जाणें | जाणे | ९० | शेवटीं | माडे | माडें |
| ७५ | १० | पटां | पटं | ९१ | ८ | विरक्त | विरक्ताः |

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध | पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ९२ | १ | हर्त्तानीं | हर्त्तीनां | १०९ | १६ | हसणारा | हंसणारा |
| ९२ | १९ | मध्यानि | मध्यामि | १११ | १ | कोणी | कोणीं |
| ९२ | २० | रसभसंदीना- | सरभसंदीना- | १११ | २४ | स्वर गोड्णं | स्वरगोड्णं |
| | | नमो | नमो | ११२ | १३ | सैनक | सेऊन |
| ९२ | २५ | मंथनकाचें | मंथानकाचें | ११२ | शेवटीं | दोघांची | दोघांचां |
| ९३ | ८ | जाणें | जाणे | ११३ | १३ | कंस | कंस |
| ९३ | ६ | जाणें | जाणें | ११३ | २३ | संगेवरं | सगेवरं |
| ९३ | १९ | गरोरुहवने | सरोरुहवनें | ११४ | १ | जाणे | जाणें |
| ९४ | ६ | कचभाराचे | कचभाराचें | ११५ | १५ | मुखे नोहता | मुखेनोहता |
| ९५ | १२ | नपेकरून | नपेंकरून | ११६ | १० | दुनं | द्रुनं |
| ९६ | २२ | मवाहि | मयाहि | ११६ | १० | ओंकापनयनं | ओंकापनयनं |
| ९६ | २७।२८ | तेथे | तेथें | ११६ | १४ | ससं | स सं |
| ९७ | ४ | शेपूटअसली | शेंपूटअसलं | ११७ | १७ | कठीण | कठिण |
| ९७ | १८ | हेही | हेंही | ११७ | १८।१९ | उत्तर उत्तर | उत्तर |
| ११० | २६ | अशी | अशीं | ११७ | २० | कठीण | कठिण |
| १०१ | ८ | संवदना | संवदतां | ११८ | २१ | यज्ञां | यज्ञां |
| १०१ | १६ | ओंठालाओंठ | ओंठालाओंठ | ११८ | २४।२५ | काकपंक्ती | काकपंक्ति |
| १०१ | १७ | खुरे | खुरैः | ११९ | २३ | पाश्चत्ययोः | पाश्चात्ययोः |
| १०१ | २१ | रंगाचे | रंगांचे | १२० | २२ | घडंला | घडला |
| | | | | १२१ | शेवट | विडंबितः | विडंबिताः |
| १०२ | १०।११ | अक्षरं | अक्षरें | १२२ | १० | जागेकरणें | जागेंकरणें |
| १०२ | २१ | मुखांनी | मुखांनीं | १२२ | १८ | ठरवावे | ठरवावें |
| १०२ | २२ | तमाखुं | तमाखु | १२२ | २२ | नसनें | नसनें |
| १०४ | १४ | पक्ष्यांचे | पक्ष्यांचें | १२२ | शेवटीं | त्यक्ता | त्यक्त्वा |
| १०७ | २ | पानसज्ज मिमं | पातसज्जमिमं | १२३ | २ | निन्हा | तिन्हीं |
| १०७ | ३ | केस | कैंस | १२३ | ७ | केऽनि विरला | केऽपि विरलाः |
| १०७ | १९ | राहता- | राहतात. | १२३ | १४ | झाले | झालें |
| १०८ | १० | नेते | होतें | १२३ | २३ | सभोंवता | सभोंवतीं |